# महाराष्ट्रकविचरित्र

भाग २ रा.

लेखक

**जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर**

भरतपूरचा वेढा, कवनकुतूहल, नेपाळवर्णन, सं० प्रणयानंद नाटक, इसापनीति,
महाराष्ट्रकविचरित्र भाग १ ला, इ० पुस्तकांचा कर्ता.



प्रकाशक

**दामोदर सांवळाराम आणि मंडळी**

प्रिंटर्स, पब्लिशर्स, एजंटस्, ठाकुरद्वार–मुंबई.

सन १९१३ इ०

किंमत १ रुपया.



# प्रस्तावना.

प्रस्तुत ग्रंथाचा पहिला भाग इ० स० १९०८च्या जानेवारी महिन्यांत प्रसिद्ध झाला, तो महाराष्ट्रांतील बहुजनसमाजाच्या प्रेमादरास पात्र झाला, याबद्दल मला मोठा आनंद वाटतो. महाराष्ट्रांतील प्रमुख पत्रांनीं केलेला गौरव, डे० व्हृ० ट्रॉ० सोसायटीकडून मिळालेलें बक्षीस आणि मद्रासपासून नागपूरपर्यंतच्या कांहीं सज्जनांनीं खाजगी पत्रें पाठवून प्रदर्शित केलेला संतोष, ह्या गोष्टी लक्षांत घेतां, माझा हा अल्प प्रयत्न महाराष्ट्रीयांस पसंत पडला आहे, असें धरून चालण्यास कांहीं हरकत नसावी, असें मला वाटतें. चरित्रग्रंथ कोणत्या रीतीनें लिहावे, यासंबंधानें कांहीं इंग्रजी लेखकांनीं जे नियम घालून दिले आहेत, त्या नियमाबरहुकूम महाराष्ट्रकविचरित्र हा ग्रंथ मी लिहीत नाहीं, याबद्दल एका मार्मिक गृहस्थांनीं 'सरस्वतीमंदिर' मासिक पुस्तकांत एक ४० पृष्ठांची लांबलचक टीका लिहून मजवर मोठा गहजब केला होता. परंतु सदर गृहस्थांस खूष करण्याचा प्रयत्न माझ्या शक्तीबाहेरचा असल्यामुळें, तो करण्याच्या भानगडींत मी पडूं इच्छीत नाहीं. कारण, ज्या मनुष्यापाशीं नूठभर तांदुळसुद्धां नाहींत, त्याच्यापुढें एखादा सूपशास्त्राचा मोठा ग्रंथ ठेवून, त्यांत सांगितलेल्या पद्धतीवर पाकनिष्पत्ति करण्याची जर त्याला कोणी सूचना केली, तर ती जितकी हास्यास्पद दिसेल, तितकीच, महाराष्ट्रकविचरित्र-लेखनाच्या बाबतींत इंग्रजी चरित्रग्रंथांचें अनुकरण करण्याची सूचनाही हास्यास्पद दिसेल. गौतमबुद्ध, शंकराचार्य, कालिदास, विक्रम, भोज, अशोक आणि शिवाजी या जगत्प्रसिद्ध नररत्नांच्या चरित्रांसंबंधाच्या विश्वसनीय आणि भरपूर माहितीचाही जेथें अभाव आहे, तेथें आमच्या अप्रसिद्ध जुन्या साधुकवींचीं चरित्रें बासवेलकृत जॉन्सनचरित्राच्या धर्तीवर न लिहिल्याबद्दल लेखकावर कडक टीकेची आग पाखडणें हें अरसिकतेचें व वाङ्मयाभिवृद्धीच्या तीव्र जाणीवेच्या अभावाचें द्योतक होय असें मला वाटतें. अस्तु.

पहिल्या भागाप्रमाणेंच याही भागांत मीं अलौकिक चमत्कारांसंबंधाच्या कथांचा समावेश केला आहे. चमत्कारवर्णनाची जी जुनी परंपरा अव्याहत चालत आली आहे, ती मोडण्याचें कांहीं प्रयोजन आहे, असें मला बिलकुल वाटत नाहीं. पहिल्या भागांत दैवी चमत्कारांचा समावेश केल्याबद्दल कित्येक टीकाकारांकडून माझ्यावर जो कडक टीकांच्या तोफांचा मारा करण्यांत आला होता, त्याची धूम्रमय कृष्णछटा पार निवळल्यावर पुनः एकदां त्या समरक्षेत्राचें विचारदृष्टीनें सूक्ष्म अवलोकन केल्यानंतरही, त्या बाबतींतील माझ्या पूर्वीच्या विचारस्थानापासून यत्किंचित्‌ही ढळण्याची मला आवश्यकता वाटली नाहीं; उलट, त्यानंतर, अर्वाचीन काळांतही जगाच्या सुधारलेल्या म्हटल्या जाणाऱ्या कांहीं भागांत अद्भुत चमत्कारवजा वाटणाऱ्या ज्या कित्येक गोष्टी शास्त्रज्ञ लोकांच्या निदर्शनास येत चालल्या आहेत, त्यांच्या योगानें चमत्कारांच्या बाबतींतल्या माझ्या विचारस्थानाच्या स्वाभाविक दृढत्वास व समर्पकतेस पर्यायानें चांगली पुष्टीच मिळत आहे, हें पाहून मला फार समाधान वाटतें. कारण, चमत्कारांवरच साधुत्व अवलंबून आहे, असें प्रतिपादन करणाराची खरी जागा म्हणजे वेड्यांचें इस्पितळ होय, ही गोष्ट जशी कोणाही विचारी मनुष्यास नाकबूल करितां येणार नाहीं, त्याचप्रमाणें चमत्कारांची शक्यता शास्त्रज्ञ लोकांच्या प्रयत्नानें आणि अनुभवानें दिवसेंदिवस अधिकाधिक सिद्ध होत चालली आहे, याही गोष्टीकडे कोणत्याही खऱ्या तत्त्वजिज्ञासूनें डोळेझांक करून चालावयाचें नाहीं. एका काळीं चमत्कार म्हणजे सब झूट समजणाऱ्या सुशिक्षित हिंदी गृहस्थांचीं मतेंही या बाबतींत कशीं बदलत चाललीं आहेत, हें "इंडियन सोशल रिफॉर्मर" पत्रांतल्या पुढील उद्गारांवरून व्यक्त होत आहे. सदर पत्रकर्ते आपल्या पत्राच्या ता० ९ फेब्रुवारी १९१३ च्या अंकांत 'येशू ख्रिस्तानें केलेले चमत्कार' या इंग्रजी पुस्तकावर अभिप्राय देतांना म्हणतात. "So far as we are concerned, we do not doubt that miracles are possible, for the reason that the state of our knowledge of the laws of Nature is as yet very imperfect. Every decade almost brings to light new laws of Nature unknown in the previous decade, and we have to read just our conception of what is natural with reference to the fresh addition to our knowledge." "इंडियन सोशल रिफॉर्मर" कर्त्यांचें हें मत अयथार्थ आहे, असें कोण म्हणेल? अस्तु.

या भागांत निरनिराळ्या २१ मराठी कवींचीं चरित्रें, त्यांच्या कवितेचें गुणदोषविवेचन व निवडक उतारे, यांसह दिलीं आहेत. हीं चरित्रें ज्या गृहस्थांच्या व ग्रंथांच्या साहाय्यानें लिहिलीं आहेत, त्यांची यादी पुढें दिली आहे:-

१ रत्नाकर—यांची माहिती रा. चांदोरकर वकील, धुळें, यांनीं पाठविली.

२ **हरीबुवा भोंडवे**–हस्तलिखित ग्रंथ.

३ **नरहरि मोरेश्वर**–काव्यसंग्रह.

४ **चंद्रात्मज रुद्र**–समालोचक.

५ **महीपति**–रा. शंकर तुकाराम शालिग्राम यांनीं दिलेली माहिती व कवीचे ग्रंथ.

६ **मुरारी**—रा. पांगारकर यांचा सरस्वतीमंदिरांतील लेख.

७ **शहामुनि**—सिद्धांतबोध, जुन्या वह्या, रा. पांगारकर यांचा मुमुक्षूं-तील लेख.

८ **शुभराय महाराज**—या कवीची माहिती, सोलापुरचे वकील रा. रा. जगन्नाथ मोरेश्वर सामंत बी. ए. एल्. एल्. बी. यांनीं पाठविली.

९ **गोपाळ**—रा. पांगारकर यांचा सरस्वतीमंदिरांतील लेख.

१० **भारती विश्वनाथ**—नाभिकपुराण.

११ **विठ्ठल नरसिंह**—काव्यसंग्रह.

१२ **अनंतफंदी**—रा० शंकर तुकाराम शाळिग्रामप्रकाशित अनंतफंदीच्या लावण्या, भाग १ ला.

१३ **होनाजी बाळा**—रा० शंकर तुकाराम शाळिग्रामप्रकाशित होनाजी बाळाकृत लावण्या, जुनी वही.

१४ **नागेश महादेव मटंगे**—काव्यसंग्रह.

१५ **नगाजी महाराज**—यांचें चरित्र, रा० रा० श्रीहरि देवराय देशपांडे, वरोरा, यांनीं दिलें.

१६ **भैरव अवधूत ज्ञानसागर**—ह० प० गजाननबुवा ज्ञानसागर, मु. विटें, यांनीं ग्रंथ पाठविले, त्यांच्या आधारानें ह्या कवीचें चरित्र लिहिलें आहे.

१७ **जीवन्मुक्तशिष्य काशीनाथस्वामी**—भगवद्गीतेवरील जीवन्मुक्ती टीका.

१८ **पांडुरंग केशव दाढी**—या कवीच्या अद्भुतरामायण या ग्रंथाची हस्तलिखित प्रत, सेंदुरजन, वऱ्हाड, येथील एका सद्गृहस्थांनीं पाठविली.

१९ **रामचंद्र भोजराव देशपांडे**.—वंशजांकडून मिळालेली माहिती व हस्तलिखित ग्रंथ.

२० **परशुराम ढवळे**—काव्यसंग्रह.

२१ **हंसराजस्वामी**—भारतवर्षीय अर्वाचीन कोश, हंसराजकृत ग्रंथ, अर्वाचीन कविता, पूर्वार्ध.

वरील सर्व ग्रंथकारांचा व सद्गृहस्थांचा मी अत्यंत आभारी आहें. याशिवाय बेळगांव येथील वकील रा. रा. नागेश वासुदेव गुणाजी बी. ए. एल.एल. बी. यांनीं बरेंच साहाय्य केलें, त्याबद्दल त्यांचे आभार मानतों. माझे परम मित्र रा. रा. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर बी. ए. यांनीं आपल्या सगळया लेखांचा मला खुशाल उपयोग करूं दिला, याबद्दल त्यांचा मी फार ऋणी आहें.

या भागांतील चरित्रें कवींच्या कालक्रमाप्रमाणें दिलीं आहेत व आजपर्यंत ज्यांची कविता अप्रसिद्ध होती, अशा कवींचीं चरित्रें अगोदर दिलीं पाहिजेत, हें धोरण लक्ष्यांत ठेवून ह्याही भागाची रचना केली आहे. हीं चरित्रें सर्वस्वी पूर्ण आहेत, असें कोणी समजूं नये; जसजशी माहिती मिळत जाईल तसतशी त्यांत सुधारणा करावी लागेल.

ह्याही भागास, गगनबावडा संस्थानचे अधिपति **श्रीमंत माधवराव मोरेश्वर ऊर्फ बाळासाहेब पंत अमात्य** यांनीं द्रव्यरूपानें उत्तेजन दिलें असून, पुढील भागांसही त्याप्रमाणें उत्तेजन देण्याचें अभिवचन दिलें आहे, याबद्दल श्रीमंतांचा मी अत्यंत आभारी आहें.

इंदूर येथील सरदार रावबहादूर माधवराव विनायक किबे एम्. ए. यांनीं द्रव्यरूपानें आणि माझे परम मित्र रा. हरि नारायण आपटे यांनीं उत्तेजनरूपानें जें साहाय्य केलें, त्याचा अत्यंत आभारपूर्वक उल्लेख करणें, हें मी आपलें कर्तव्य समजतों. शेवटीं:—

आपुलिया बळें नाहीं मी बोलत ।
सखा भगवंत, वाचा त्याची ॥ १ ॥
साळुंकी ते कैसी बोले मंजुळवाणी ।
शिकविता धणी वेगळाची ॥ २ ॥
काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें ।
परि त्या विश्वंभरें बोलविलें ॥ ३ ॥
**तुका** म्हणे त्याची कोण जाणे कळा ।
वागवी पांगुळा पायांविण ॥ ४ ॥

ह्या श्रीतुकारामबुवांच्या अमृतवाणीनें ही अल्प प्रस्तावना पूर्ण करितों.

**मुंबई**, ता० २५ एप्रिल १९१२.

**ज. र. आजगांवकर.**



# ग्रंथार्पण.

**श्रीमंत राजश्री माधवराव मोरेश्वर**

ऊर्फ

**बाळासाहेब पंतअमात्य**

हुकुमतपन्हा

**संस्थान गगनबावडा**

यांस,

त्यांची गुणग्राहकता, अत्यंत शुद्धाचरण, औदार्य, स्वभावसौजन्य,
इत्यादि, राजेलोकांचे ठायीं दुर्मिळ अशा अनेक सद्गुणास
लुब्ध होऊन हा ग्रंथ अत्यंत सन्मानपूर्वक
समर्पण करितों.

श्रीमंतांचा नम्र सेवक,

**ग्रंथकर्ता.**

# अनुक्रमणिका.

# महाराष्ट्र-कवि-चरित्र

## भाग २ रा.

### रत्नाकर.

'दीपरत्नाकर' या नांवाचा एक ओवीबद्ध अध्यात्मग्रंथ छापून प्रसिद्ध झाला आहे, त्या ग्रंथाचे कर्ते 'रत्नाकर' हे सुमारें १८९ वर्षांपूर्वी होऊन गेले. या कवीची वंशावळ रा० चांदोरकर यांनीं कृपा करून मजकडे पाठविली, ती येणेंप्रमाणें:—

**महातबा + गंगाबाई**— १ हिराजी— २ हरिहर + अजुबाई— ३ **रत्नाकर** + सावित्री— ४ जयदेव— ५ एकनाथबुवा— ६ शिवनाथ— ७ कृष्णनाथ— ८ रामनाथ— ९ भय्याबोवा.

हे भय्याबोवा बऱ्हाणपूर येथें होते, ते थोड्या दिवसांपूर्वी कैलासवासी झाले. त्यांस बालाजी संस्थानचे अधिपति म्हणत असत. यांचें उपनांव सदावर्ते, गोत्र भार्गव, यजुर्वेदांतर्गत मानवसूत्र शाखा मैत्रायणीय. रत्नाकरांचा समाधिशक १६४१, आश्विन वद्य १३, बुधवार. यांचे गुरु रामानंद हे गृहस्थाश्रमी असून शेकदार, अमीन इत्यादि हुद्यांचीं कामें त्यांजकडे होतीं. मुल्हेरच्या बाजूस शोध केल्यास, या रामानंदांची विशेष माहिती मिळू शकेल, असें रा० चांदोरकर यांचें म्हणणें आहे. वर दिलेली हकीकत बऱ्हाणपुर येथें मिळाली. **कळवण** नामक ठिकाणीं रत्नाकरासंबंधानें माहिती मिळाली, तींत वंशावळ वर दिल्याप्रमाणें असून संप्रदायपरंपरा, पुढीलप्रमाणें आहे.

रत्नाकर, ( शिष्य )—जयदेव—( पुत्र ) ( पांडुरंग )—( पुत्र ) पुंडलिक—( पुत्र ) महिपति—( पुत्र ) नारायण ऊर्फ बाळाजी.

नारायण ऊर्फ बाळाजी हे अत्यंत वृद्ध गृहस्थ, रा. चांदोरकर हे कळवणास गेले होते, त्यावेळीं म्हणजे ता. १० आगष्ट १९०४ रोजीं हयात होते. त्यानंतरची हकीकत समजली नाहीं.

गिरिजानदीच्या तीरीं चंडीपुर नामक गांव आहे, तें रत्नाकरांचें वसतिस्थान होय. रत्नाकरांस त्यांच्या वयाच्या दुसऱ्याच वर्षी वाचा फुटून ते हरिस्मरण करूं लागले, अशी आख्यायिका आहे. त्यांस श्रीज्ञानेश्वरांचा साक्षात्कार झाला होता व नंतर त्यांस रामानंद गुरु भेटले. रामानंदांनीं रत्नाकरांस उपदेश दिला, तो काल येणेंप्रमाणें:—संवत् १७६०, सुभानुनाम संवत्सरे, आषाढ वद्य ११.

रामानंद स्वामीची समाधि खानदेश जिल्ह्यांत साक्री तालुक्यांत 'पानखेड' म्हणून गांव आहे, तेथें आहे; व तेथेंच रत्नाकरांनीं आपला दीपरत्नाकर ग्रंथ लिहिला. रत्नाकरांचे एकंदर ग्रंथ १४ आहेत, त्यांपैकीं पुढील ग्रंथ रा. चांदोरकर यांस उपलब्ध झाले असून, त्यांपैकीं ६ व ७ हे ग्रंथ शिवायकरून, बाकीचे ग्रंथ त्यांचे संग्रहीं आहेतः—१ दीपरत्नाकर ( प्रकाशित ) २ सिद्धांतरत्नाकर ३ वैराग्यरत्नाकर, ४ उपदेशरत्नाकर, ५ भिक्षुगीत, ६ भागवत, ७ रत्नाकरी गीता. यांखेरीज अभंग, पद्यें वगैरे किरकोळ कविता बरीच असून, त्यांपैकीं कांहीं कविता रा. चांदोरकर यांजपाशीं आहे. मराठी कवितेशिवाय या कवीचे कांहीं ग्रंथ गुजराथी भाषेंत आहेत, ते त्यांनीं आपल्या गुजराथी शिष्यांकरितां लिहिले आहेत.

दीपरत्नाकराशिवाय या कवीचे इतर ग्रंथ अप्रकाशित आहेत व ते माझ्या अवलोकनांत आले नाहींत. दीपरत्नाकराचे अध्याय १९ व ओव्या ३३७० आहेत. कवीचे इतर ग्रंथही असेच विस्तृत असतील, तर या कवीची एकंदर कविता सुमारें ४०,००० होईल,

असें वाटतें. रत्नाकरांची बहुतेक सगळी कविता अध्यात्मपर आहे; अर्थात् रसाच्या दृष्टीनें तिचें परीक्षण करावयाचें नाहीं. रत्नाकरांची भाषा साधी असून, त्यांची दृष्टांत देण्याची शैलीही उत्तम आहे. त्यांचा पारमार्थिक अधिकारही मोठा दिसतो. दीपरत्नाकरांत रत्नाकर रामानंदस्वामींस प्रश्न विचारीत आहेत व त्यांचीं उत्तरें रामानंदस्वामी देत आहेत, अशी प्रश्नोत्तरसंवादरूपानें त्याची उभारणी केली आहे.

अनुभवावांचून शाब्दिक ज्ञान व्यर्थ आहे, गुरुकृपेविना खरा ब्रह्मानुभव प्राप्त होणें शक्य नाहीं, ह्या मुद्दयाचें विवरण करतांना कवि म्हणतात:—

ओव्या.

जैसें धन आहे घराभीतरीं । तें लिहिलें आहे वहीवरी ॥
जें चवथ्या कोंपऱ्यासि निर्धारीं । कढईभरी आहे कीं ॥ ८३ ॥

तें वाचितांचि झालें समाधान । परि न जायचि दुर्बळपण ॥
तैसें विद्याभ्यास करितां जाण । नोहे ज्ञान सर्वथा ॥ ८४ ॥

चारी कोंपरे घरासि जाण । परी तें कोणते कोंपऱ्यास आहे धन ॥
हें त्यासी नाहीं ज्ञान । म्हणवोन दुर्बळ ते ॥ ८५ ॥
तैसी नाना विद्यांची उत्पत्ति । वेदशास्त्रादि पढती ॥
त्याचा अर्थही सांगती । परि ते स्थिति पालटेना ॥ ८६ ॥

सुतासि जें जें पढविलें । तें तेंचि तो बोले ॥
परी अर्थ अन्वयातें चुकलें । तैसें झालें विद्वाना ॥ ८७ ॥

स्वयें ब्रह्मचि आहेती । नित्य ब्रह्मामाजीच असती ॥
जैसे पक्षी गगनींच उडती । परी ते नेणती गगनातें ॥ ८८ ॥

कापुर नेणे परिमळासी । साखर नेणेंचि गोडीसी ॥
दीप नेणे प्रकाशासी । दशा तैसी झाली जनां ॥ ८९ ॥

आकाश नेणे अवकाशालागोन । अग्नीसी नेणे इंधन ।
या[ं]चें करितां मंथन । प्रगटे आपण अग्नी तो ॥ ९० ॥

ज्या काष्ठीं प्रगटला पावक । त्या काष्ठातें जाळोन करी राख ॥
तैसें ब्रह्मज्ञानें होय देख । तर्कातर्क जळालेती ॥ ९१ ॥
तैसें गुरुज्ञानें करितां शास्त्रमंथन । तेथें अनुवाच्य प्रगटे हुताशन ॥
तेणें शब्दब्रह्मातें जाळोन । झाला आपण नाहींच ॥ ९२ ॥
जोंवरी काष्ठासी काष्ठपण । तोंवरीच अग्नी आपण ॥
काष्ठ निःशेष जातां जळोन । जाय विझोन आपणही ॥ ९३ ॥
तैसा जोंवरी आहे देहाभिमान । तोंवरीच शब्दब्रह्माचें भान ॥
उठतां चौदेहांचें ठाण । शब्द जाण निःशब्द होये ॥ ९४ ॥
जोंवरी शब्द निःशब्द झाला नाहीं । तोंवरी ज्ञान तेंचि अज्ञान पाहीं ।
जैसे वेडे स्मरण करितां कांहीं । परि नाहीं भावभक्ति ॥ ९५ ॥
आधीं आत्मत्वाचें विस्मरण । तोचि भूतसंचार जाण ।
त्यावरी विद्याभिमानाचें मद्यपान । मग शब्दब्रह्म आपण जल्पत ॥ ९६ ॥
तरी त्याचें जें जें जल्पन । तें तें अविद्याचि मिथ्या जाण ।
ऐसें जाणोनि आपण । सहज होवोन राहें रे ॥ ९७ ॥

दीपरत्नाकर, अध्याय ८.

## खालील विवेचन पहाः—

जैसा जलामाजीं उभा राहत । तों आपणासी जळामाजीं देखत ॥
बुडालों म्हणूनि बोंब मारित । नाहीं हेत आपुला ॥ ९८ ॥
आपण तडीस उभा राहे । जळासि त्यासी संबंध काय ।
जळ पाहतां आपुला भास होय । म्हणोनि मारी तो हांका ॥ ९९ ॥
तो जरी जळामाजीं बुडता । तरी बुडाला कोण म्हणता ? ।
बोंबेचा नाद कैसा होता । तैसी तुजला अहंता नाथिली ॥ १०० ॥
तूं जरी देह असतासी । तरी देहकर्मासी न जाणतासी ॥
पापपुण्यें न वर्ततासी । धरीं मानसीं खूण हे ॥ १०१ ॥
तैसा जो जळीं बुडाला । तो बोंबेसकट गेला ॥
मग आठव नाहीं त्याला । वाहवला प्रवाहीं ॥ १०२ ॥
मी मेलों ऐसिया प्रेता । कोणीं देखिलें सांगतां ? ॥
हे अवघी मिथ्या वार्ता । होईं आतां सावध ॥ १०३ ॥

मी बुडालों ऐसें बोंबलत । म्हणून तो बुडाला नाहीं सत्य ॥
तैसा तूं देह सलिलीं आपला देखत । म्हणून मानिसी देह मी ॥ १०४ ॥
तो थडीस असतां बुडालों म्हणत । तैसा तूं असशी देहातीत ॥
म्हणवोनि देह कर्मातें जाणत । मानी सत्य वचनासी ॥ १०५ ॥
मी अज्ञान ऐसें जे म्हणत । तरी काय अज्ञान अज्ञाना दावित ॥
तरी देह मानी रे असत्य । ज्ञान म्हणत अज्ञान मी ॥ १०६ ॥
मी देह या भ्रमेंकरून । ज्ञानचि म्हणे मी अज्ञान ॥
जैसा जळीं देखे आपणा आपण । बुडालों म्हणूनि बोंबलत ॥ १०७ ॥
तैसा तूं देहसंगेंकरोन । मिथ्या मानोन घेसी बंधन ॥
मग मी म्हणसी अज्ञान । करा पावन मजलागीं ॥ १०८ ॥
अज्ञान म्हणतां ज्ञान आहे । तैसा देह म्हणतां विदेही पाहें ।
म्हणवोन देहकर्म जाणताहे । मुळींच आहे साक्षित्वें ॥ १०९ ॥

एकंदरींत, अत्यंत सोप्या भाषेंत आणि अगदीं व्यावहारिक उपमा देऊन वेदांतविषय सुलभ करून सांगण्याची कवीची शैली वाखाणण्यासारखी आहे. योगवासिष्ठ, पंचदशी, त्रिपुरारहस्य ज्ञान-खंड, इत्यादि संस्कृत भाषेंतले अध्यात्मग्रंथ समजून घेणें ज्यांस कठीण जात असेल, त्यांना दीपरत्नाकरासारखे साधे प्राकृत ग्रंथ चांगले उपयोगी पडतील, यांत संशय नाहीं.

दीपरत्नाकराच्या चौथ्या अध्यायांत कवीनें आपली गुरुपरंपरा दिली आहे, ती येणेंप्रमाणें:—

१ **आदिनाथ ( शंकर )**—२ मच्छिंद्रनाथ—३ गोरक्षनाथ—४ मुक्ताबाई—५ चांगदेव—६ विमलानंद—७ जनकानंद—८ नृसिंहानंद—९ पुरुषोत्तम—१० मुक्तानंद—११ एकानंद—१२ सिद्धानंद—१३ रामानंद—१४ रत्नाकर.

वरील परंपरेंत मुक्ताबाईचे गुरु गोरक्षनाथ होते, असें म्हटलें आहे. शिवकल्याणस्वामींनीं ज्ञानदेवकृत अमृतानुभवावर नित्यानंदैक-दीपिका नामक विस्तीर्ण टीका लिहिली आहे, तींत त्यांनींही

मुक्ताबाईनें गोरक्षनाथांकडून गुरूपदेश घेतला, असें स्पष्ट सांगितलें आहे:—

ओव्या.

असो हे एका हेलावयाची मातु । आतां तोचि श्रीगोरक्षनाथु ॥
जो श्रीआदिनाथाचा नातु । मच्छेंद्रद्वारा ॥ १ ॥
तो तैसाचि रसु वोसंडला । तंव मुक्ताबाईया प्राशिला ॥
प्राशून तैसाचि उरला । तो वटेश्वरा दिधला ॥ २ ॥

शके १२१२ ( इ० स० १२९० ) त मुक्ताबाई विद्यमान होती. तेव्हांपासून रत्नाकरापर्यंत गुरुपरंपरेच्या ९ पिढ्या गेल्या. रत्नाकराची दहावी पिढी होय. प्रत्येक पिढीस ४० वर्षे धरलीं, तर सरासरीनें रत्नाकराचा काल शके १६१२ येतो व रा० चांदोरकर यांस कवींच्या वंशजांकडून व शिष्यसंप्रदायाकडून मिळालेल्या कालाशीं हा काल थोडया फार वर्षांनीं जुळतो. पण रा० बाळकृष्ण लक्ष्मण पाठक यानीं प्रसिद्ध केलेल्या दीपरत्नाकराच्या अखेरीस असलेल्या ग्रंथसमाप्तिकालनिदर्शक ओव्या पुढें दिल्या आहेत, त्यांतील काल वरील कालाशीं जुळत नाहीं. दोन कालांत १३३ वर्षांचें अंतर राहतें; तेव्हां या कोड्याचा उलगडा कसा होणार ? ग्रंथाची भाषा पाहिली तर ती अगदीं अर्वाचीन, फार तर १०० वर्षां-पूर्वींची दिसते. ग्रंथाच्या शेवटच्या ओव्या:—

संवत अठरारों पन्नास । शके सतरारों पंचेचाळिस ॥
समाप्त झालें ग्रंथलेखन निःशेष । यथामति जाणिजे ॥ १ ॥
कार्तिक कृष्ण चतुर्दशीसी । इंदुवासर विशेषीं ॥
त्या दिवशीं ग्रंथ सिद्धीसी । सद्गुरुकृपें पावला ॥ २ ॥
ग्रंथ संग्रहितो सत्यजलोकमल दुबेन । यजमानकृत्य जाफराबादेन ॥
सन बाराशें तेत्तिसेन । ग्रंथ समाप्ति पावला ॥ ३ ॥
सिद्धानंदाचेनि प्रसादें । बोले रामानंद पदें ॥
रत्नाकराचेनि संवादें । ग्रंथ विनोदें चालिला ॥ ४ ॥

ह्या ओंव्यांपैकीं पहिल्या दोन ओंव्यांत निर्दिष्ट केलेला काळ ग्रंथरचनाकाल म्हणून कवीनें स्वतः दिला असला, तरी त्यांत कांहीं-तरी चुकी झालेली असावी. संवत् १८९० व शक १७४५ दिला आहे. संवत् व शक वर्षांत १३५ वर्षांचें अंतर असतें. वरील शकांत फक्त १०५ वर्षांचें अंतर आहे. बरें, ग्रंथसंग्रह करणार [ लेखक ] ' सत्यजलोकमल दुबे ' यांनीं ग्रंथलेखनसमाप्तीचा काल म्हणून हा काल दिला असेल, तर त्यांनीं सुरुसन १२३१ दिला आहे, तोही वरील शकांशीं जुळत नाहीं ! एकंदरींत ह्या शेवटच्या तीन ओंव्यांत दिलेला काल, त्या ओंव्या शुद्ध नसल्यामुळें, विश्वसनीय नाहीं, हें उघडच दिसतें. प्रस्तुत लेखाच्या आरंभीं कवीची वंशावळ दिली आहे, तींत रत्नाकरापासून आतांपर्यंत ६ पिढ्या झाल्याचा व पुढें शिष्यशाखा दिली आहे तींतही रत्नाकरापासून आजपावेतों पांच पिढ्या झाल्याचा दाखला मिळतो. प्रत्येक पिढीस ४० वर्षें धरलीं, तर पांच पिढ्यांच्या हिशेबानें रत्नाकराचा काल शके १६३१ येतो व रा० चांदोरकरांनीं कवीचा जो निधनकाल दिला आहे, त्याच्याशीं हा काल जुळतो. तेव्हां दीपरत्नाकराच्या छापील प्रतीच्या अखेरीस नमूद केलेला काल चुकीचा आहे, असें स्पष्ट म्हणण्यास हरकत नाहीं.

रा० चांदोरकर यांजपाशीं प्रस्तुत कवीचे अनुभवरत्नाकर व ब्रिज भागवत असे दोन ग्रंथ आहेत. त्यांचे काल अनुक्रमानें संवत् १७६४ ( शके १६२९ ) व संवत् १७६३ ( शके १६२८ ) असे आहेत. यावरूनही छापील दीपरत्नाकराचे अखेरीस दिलेला काल चुकीचा आहे, हें उघड होतें. महिपतिकृत भक्तलीलामृताच्या ४८ व्या अध्यायांत एका रत्नाकराचें चरित्र आहे, पण त्याचा प्रस्तुत चरित्राशीं कांहीं संबंध दिसत नाहीं.

---

# हरिबुवा भोंडवे.

ज्यांची शिष्यशाखा मोठी व काव्यरचना विस्तृत असतांही ज्यांची प्रसिद्धि विशेष नाहीं अशा संतकवींपैकीं हरिबुवा भोंडवे हे एक होत. हल्लींचे वारकरी आपल्या भजनांत रामदासस्वामींच्या कवितेचा उच्चारही करीत नाहींत, असें सांगतात; परंतु हरिबुवा हे रामदास-सांप्रदायी असूनही पंढरीचे वारकरी होते; इतकेंच नव्हे, तर त्यांची पालखी अद्यापि प्रतिवर्षी पंढरपुरास नेमानें जाते व तेथें तिचा उजव्या बाजूचा मान आहे, हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे.

हरिबुवांनीं एकलक्ष साठ हजार अभंग लिहिले, त्यांपैकीं ३००* अभंगांत व आपल्या ज्ञानसागर ग्रंथाच्या शेवटच्या अध्यायांत त्यांनीं आपलें चरित्र दिलें आहे, तें येणेंप्रमाणें:—

'अहमदनगर जिल्ह्यांत पारनेर येथें हरिबुवांचा जन्म शके १६३० च्या सुमारास झाला. हे जातीनें शिंपी असून वैष्णवमताचे होते. यांचें आडनांव भोंडवे. हरिबुवांच्या पत्नीचें नांव गोडाई. यांना रखमाबाई व ताराबाई अशा दोन मुली होत्या. रखमाबाईनेंही कांहीं अभंग केले आहेत. बुवांच्या वडिलांचें नांव केरेश्वर व आईचें बचाई. हरिबुवांनीं आपली गुरुपरंपरा दिली आहे, ती येणेंप्रमाणें:—

१ परमात्मा—२ वशिष्ठ—३ श्रीरामचंद्र—४ श्रीसमर्थ रामदासस्वामी—
५ माधवदास—६ केशवदास—७ पुरुषोत्तम—८ शिवराम—९ हरिबुवा.

---

१ हे अभंग मीं पाहिलेले नाहींत. थोड्या वर्षांपूर्वी मुंबईंत रा० काशीनाथ रावजी धोंगडे हे 'सन्मणिमालाकवितासंग्रह' नामक मासिक पुस्तक काढीत असत, त्यांत त्यांनीं सदर अभंगांच्याआधारानें हरिबुवांचा लहानसा चरित्रलेख दिला आहे.

हरिबुवांनीं आपल्या गुरूंचा उल्लेख आपल्या ग्रंथांत पुष्कळ ठिकाणीं केला आहे. पुढील ओव्या पहाः—

धन्य शिवराम सद्गुरु। हरि तयाचा दास किंकरू ॥
तयानें उतरिला पैलपारू। भवसागरू तारोनियां ॥
शिवराम सद्गुरुकृपेनें। ग्रंथ समाप्तीसि आला जाण।
जे कां करिती श्रवण मनन। निजात्मज्ञान त्यांसि होय ॥
आतां असो हें बोलणें। शिवरामकृपे हरि म्हणे ॥
कळसा आलें निरूपण। श्रोतीं सावधान मनें परिसावें ॥

ह्या शिवरामस्वामीसंबंधानें विशेष माहिती हरिबुवांच्या ग्रंथांत मिळत नाहीं. धुळें येथील सत्कार्योत्तेजक सभेनें प्रसिद्ध केलेल्या 'रामदासी कविता, भाग १ ला' या ग्रंथाच्या आरंभीं समर्थ संप्रदायांतील निरानिराळ्या मठपतींची व शिष्यवर्गाची नामावळी दिली आहे, तींत 'शिवराम' हें नांव अनेक ठिकाणीं आलें आहे; परंतु त्यांतले कोणते शिवरामस्वामी हरिबुवांचे गुरु होते, हें समजणें कठीण आहे.

हरिबुवा कीर्तन करीत असत, तेव्हां त्यांचे पुढील शिष्य त्यांच्या मागें उभे राहत असत. गैबी, संतु तेली,* काशीपतिबुवा, कामराजबुवा, केरेश्वरबुवा, मल्हारबुवा, विठोबा, नथोबा, सदाशिव, खंडोबा, जानबा. यांत हरिबुवांचे दोन बंधूही होते. हरिबुवा लहानपणापासून शिवणकामावर आपल्या बंधूंसमवेत आपला चरितार्थ चालवित असत. पुढें कांहीं दिवसांनीं त्यांस भेदिक लावण्या करण्याचा छंद लागला, परंतु लवकरच हा छंद वाईट असून कलियुगांत भवसागर तरून जाण्यास हरिनामस्मरणासारखा सुलभ मार्ग नाहीं, ही गोष्ट त्यांच्या लक्ष्यांत येऊन त्यांनीं पंढरपुरची वारी घेतली व अभंग रचण्यास प्रारंभ केला. शिवरामस्वामी

---

* तुकाराम बुवांच्या शिष्यवर्गांतले 'संतु तेली' निराळे.

रामदासी यांचा उपदेश घेतला असतांही हरिबुवांनीं वारकरी संप्रदाय चालविला, यावरून हे दोन्ही संप्रदाय परस्परविरुद्ध मताचे आहेत, असें दिसत नाहीं. रामदासस्वामींचे शिष्य दिनकरबुवा रामदासी यांनीं व खुद्द श्रीसमर्थ रामदासस्वामी यांनींही पंढरपुरच्या विठ्ठलावर शेंकडों अभंग रचले आहेत, यावरूनही हीच गोष्ट सिद्ध होते. खरे रामदासी व खरे वारकरी, राम आणि विठ्ठल यांत कांहीं भेद आहे असें मानतील, हें मुळींच संभवत नाहीं व या तत्त्वास धरूनच हरिबुवांचें वर्तन होतें. त्यांनीं आपली वारी कधीं चुकविली नाहीं. वारकरी झाल्यापासून बुवांचें लक्ष्य शिवणकामाकडे असावें तसें नसे, पण ईश्वरकृपेनें तें काम त्यांजकडून फार चांगल्या रीतीनें होत असल्यामुळें, जहागीरदार व शेटसावकार वगैरे श्रीमंत लोक आपलीं शिलाईचीं कामें बहुधा त्यांजकडेच देत असत. हरिबुवांचा हा उत्कर्ष त्यांच्या शेजारच्या जातबंधूंस खपत नसे, त्यामुळें ते त्यांना पुष्कळ वेळां विनाकारण त्रास देत असत. परंतु 'निंदा आणि स्तुति, आम्हा समानचि चित्तीं' असें मानणाऱ्या हरिबुवांनीं निंदकांच्या कृत्यांकडे कधीं लक्ष्यही दिलें नाहीं. कुटुंबपोषणापुरतें काम करून इतर वेळांत श्रीहरीचें एकांतभजन करण्यासाठीं पारनेराजवळ पाराशर नामक डोंगर आहे, त्याजवर हरिबुवा दोन दोन तीन तीन दिवस जाऊन राहत असत. ते डोंगरावर असतां त्यांची पत्नी गोडाई त्यांचें जेवण तेथें घेऊन जात असे. साधुश्रेष्ठ तुकारामबुवा भंडारा डोंगरावर व श्रीसमर्थ रामदासस्वामी डोंगराच्या घळींत बसून ईश्वराराधन करीत असत, हें प्रसिद्धच आहे. यावरून एकांतभजनाचा महिमा फार मोठा आहे हें उघडच सिद्ध होतें. संसार, घरदार मोडून परमार्थसाधनासाठीं*

* हल्लीं प्रार्थनासमाजिस्टांत सुद्धां, वर्षांतून एक दोन दिवस एकांतभजनासाठीं एखाद्या एकांतस्थळीं जाण्याचा परिपाठ आहे, ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे.

रानावनांत जाऊन राहणें हें हल्लींच्या कांहीं सुशिक्षित लोकांस गौण वाटतें; परंतु चित्तवृत्ति हातीं येण्यास, मनाची पूर्ण एकाग्रता होण्यास व भव्य सृष्टिसौंदर्याच्या शुभ दर्शनानें वृत्तींस उदात्तता येऊन सृष्टिकर्त्याविषयीं उत्कट भक्तिभाव जागृत होण्यास, पवित्र नदीकांठ, पर्वतांचीं उत्तुंग शिखरें, अरण्यांतल्या प्रचंड गुहा आणि सत्पुरुषांच्या पादस्पर्शानें पुनीत झालेले भूप्रदेश यांच्यासारखीं अन्य स्थळें नाहींत, हें सगळ्या साधुसंतांनी स्वतःच्या अनुभवावरून लिहून ठेवलें आहे. ‘ आश्रमासी स्थान कोपी गुहा ’ असें तुकाराम-महाराजांचें वचन आहे. स्वतःच्या उद्धारासाठीं सगळा जन्म रानांत घालविणें निराळें व आत्मोद्धार होऊन लोकोद्धार करण्याइतका अधिकार संपादन करण्यासाठीं कांहीं दिवस अरण्यवास स्वीकारणें निराळें हें मात्र लक्षांत ठेवलें पाहिजे.

हरिबुवांचे ग्रंथ पाहिले म्हणजे हे मोठे प्रेमळ हरिभक्त व ज्ञानी पुरुष होते, ही गोष्ट सकृद्दर्शनींच लक्षांत येऊन त्यांच्यासंबंधानें मनांत मोठी पूज्यबुद्धि उत्पन्न होते. हरिबुवांनीं केलेल्या अद्भुत चमत्कारांच्या पुष्कळ कथा उपलब्ध आहेत, त्या सगळ्या येथें न देतां फक्त एकच कथा देतों:—

हरिबुवा एकदां पंढरीस असतां, ते कवित्व करतात म्हणून इतर वारकरी त्यांचा द्वेष करूं लागले. एका कुटिल मनुष्यानें तर अशी अफवा उठविली कीं, हरिबुवा पंढरींत अभंग रचून म्हणेल तर त्यास चावडीवर नेऊन कैद करण्यांत येईल. हें वर्तमान गोडाईकडून बुवांस कळतांच ‘ मी आजपासून अभंग करणार नाहीं ’ असें म्हणून ते राउळांत गेले, व केलेल्या कवित्वाबद्दल श्रीपांडुरंगाची त्यांनीं क्षमा मागितली. हरिबुवांची सप्रेम भक्ति व प्रेमळ काव्य पाहून पंढरीनाथ फार संतुष्ट झाले होते; लोकांच्या निंदेस भिऊन

हरिबुवांनीं कवित्व करण्याचें सोडून द्यावें, ही गोष्ट भगवंतांस रुचली नाहीं. मग हरिबुवांच्या स्वप्नांत जाऊन 'तूं कवित्व करण्याचें सोडूं नकोस' अशी आज्ञा देवानें त्यांस केली व त्याप्रमाणें हरिबुवांनीं स्वप्नावस्थेंतच पांच अभंग रचून ते देवांस म्हणून दाखविले. तें ऐकून पांडुरंगास मोठें समाधान वाटलें. मग, तुळसी व बुका हरिबुवांस देऊन देव म्हणाले,–'तुझी कविता प्रासादिक आहे, ती रचण्याचें तूं सोडूं नकोस.' बुवांनीं, ही आज्ञा शिरसामान्य केली. जागृत झाल्यावर, आपला काव्यरचनाक्रम चालू ठेवण्याचा त्यांनीं निश्चय केला व पुढें हजारों अभंग रचिले. पारनेरास आल्यावर, आतां हें गांव सोडून एकाद्या रम्य तीर्थस्थानीं वास करावा या हेतूनें हरिबुवा जुन्नर तालुक्यांत नारायणगांवीं येऊन राहिले.

**हरिबुवांनीं लिहिलेले ग्रंथ येणेंप्रमाणें:—**

१ ज्ञानसागर, ओवीबद्ध, अध्याय २८, संख्या १७,३५४
२ हरिबोध, „ „ १८ „ २,५९९
३ पंचीकरण,
४ संसारतोडा.
५ स्वरोदय.
६ स्फुट अभंग ... ... ... ६८०००.

सन्मणिमाला कवितासंग्रहांत हरिबुवांची माहिती दिली आहे, तींत हरिबुवांनीं १,६०,००० अभंग लिहिले असें म्हटलें आहे, परंतु बुवांचे वंशज ह० भ० प० रामचंद्र पांडुरंग मठपति, रामदासी, संस्थान नारायणगांव, यांनीं एका कागदावर हरिबुवांच्या ग्रंथांची यादी दिली आहे. तींत '६८०००' अभंग बुवांनीं रचले, असें म्हटलें आहे. यांपैकीं ९,००० अभंग सन्मणिमाला कवितासंग्रहकर्त्यांस मिळाले होते, ते व हरिबुवांचे इतर ग्रंथ छापण्याचा त्यांचा

इरादाही होता; परंतु हें मासिकपुस्तक पुढें बंद पडल्यामुळें, ती गोष्ट तशीच राहिली.

हरिबुवांची कविता प्रासादिक, अधिकारपूर्ण आणि प्रायः शुद्ध अशी आहे. हरिबुवांनीं दुसरे कितीही चमत्कार केले असले, तरी ज्ञानसागरासारखा[1] ग्रंथ त्यांनीं लिहिला, हा सर्वांत मोठा चमत्कार होय असें मला वाटतें. ज्ञानसागर ग्रंथांत अध्यात्मविद्येचें आणि योगशास्त्राचें विवेचन इतक्या उत्तम प्रकारें केलें आहे कीं, हा ग्रंथ जर छापून प्रसिद्ध झाला नाहीं, तर महाराष्ट्र वाङ्मयाची मोठी हानि झाली, महाराष्ट्रीय आपल्या कर्तव्यास जागले नाहींत, असें म्हणावें लागेल. ज्ञानसागर हा ग्रंथ हरिबुवांनीं दुसऱ्या कोणत्याही ग्रंथाचा आधार न घेतां, केवळ गुरुप्रसादप्राप्त स्वानुभवानेंच लिहिला आहे. हरिबुवा मोठे विद्वान् होते असें दिसत नाहीं; त्यांचे सगळे ग्रंथ केवळ स्वयंस्फूर्तीनें रचलेले आहेत; व 'माझ्या तोंडून देव हें सगळें वदवितो,' असें त्यांनीं पुनः पुनः सांगितलें आहे. हरिबुवांच्या वंशजांनीं व शिष्यसांप्रदायी लोकांनीं हरिबुवांचे ग्रंथ अवश्य छापून प्रसिद्ध करावे, अशी त्यांस माझी विनंति आहे.

येथें कोणी असा प्रश्न करील कीं, मराठी भाषेंत शेंकडों अध्यात्म-ग्रंथ झाले असून, त्यांतले पुष्कळ ग्रंथ छापून प्रसिद्धही झाले आहेत; मग आणखी हरिबुवांचे अध्यात्मग्रंथ छापण्याची आवश्यकता काय आहे ? तर या प्रश्नास उत्तर इतकेंच कीं, इंग्रजी वाङ्मयांतही एकाच विषयावर अनेक विद्वानांनीं अनेक ग्रंथ लिहिले असून ते सगळे प्रसिद्धही झाले आहेत. शिवाय ग्रंथाचा विषय जरी एकच

---

१ ह्या ज्ञानसागराशिवाय, विटें येथील ज्ञानसागर स्वामींचा एक व नारायणस्वामी जालवणकरांचा एक, असे आणखी दोन ज्ञानसागर ग्रंथ उपलब्ध आहेत. हे दोन्ही ग्रंथ अध्यात्मपर असून, पहिला अद्याप अप्रकाशित आहे व दुसरा प्रसिद्ध झाला आहे.

असला तरी तो विषय विशद करून सांगण्याची प्रत्येक ग्रंथकाराची हातोटी निराळी असते; आणि सारख्याच योग्यतेच्या व सारख्याच अनुभवाच्या ग्रंथकारांनीं एकाच विषयावर लिहिलेल्या ग्रंथांपैकीं अमुक चांगला आणि तमुक वाईट, हें ठरविणेंही सामान्य माणसाच्या सामर्थ्याबाहेरचें असतें. अशा स्थितींत ते सगळेच ग्रंथ छापून प्रसिद्ध व्हावे, हें अधिक इष्ट होय. कां कीं, तसें झाल्यावर ज्या त्या वाचकाच्या ग्रहणशक्तीप्रमाणें व आवडीनिवडीप्रमाणें त्यास त्यांतला वाटेल तो ग्रंथ स्वतःच्या उपयोगासाठीं पसंत करितां येईल. असो.

'हरिबोध' या ग्रंथाचे अध्याय १८ आहेत. मला मिळालेल्या पोथींत सात, आठ व नऊ हे तीन अध्याय कमी आहेत. ज्ञानसागर ग्रंथ फार मोठा—सुमारें १७,५०० ओंव्यांचा—असल्यामुळें, त्यांतलीच माहिती संक्षेपरूपानें हरिबोध ग्रंथांत दासबोधाच्या पद्धतीवर गुरुशिष्यसंवादरूपानें दिली आहे. ज्ञानसागर हा ग्रंथ एकंदरींत फार सुंदर आहे. ज्ञानसागर व हरिबोध या ग्रंथांशिवाय हरिबुवांचे इतर ग्रंथ आहेत, ते माझ्या पाहण्यांत आले नाहींत. हे सगळे ग्रंथ बुवांच्या सांप्रदायी लोकांत मात्र प्रसिद्ध आहेत, इतरत्र त्यांची फारशी प्रसिद्धि नाहीं. हरिबुवांनीं ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत व तुकाराम-रामदासांचे ग्रंथ पुष्कळ वेळां लक्ष्यपूर्वक वाचले होते, असें त्यांच्या ग्रंथांवरून दिसतें. त्यांच्या ग्रंथांतल्या कित्येक उपमा व वर्णनें ज्ञानेश्वरींतल्या व दासबोधांतल्या उपमांशीं व वर्णनांशीं अगदीं सदृश आहेत. ज्ञानसागर ग्रंथ नानाप्रकारच्या दृष्टांतांनीं आणि अध्यात्मज्ञानानें भरलेला आहे. १९ व्या अध्यायांत दिवसाची रात्र व रात्रीचा दिवस करून, दिवसा फिरणाऱ्या लोकांस चोर समजून सुळावर चढविणाऱ्या बेबंद राजाची गोष्ट दिली आहेत, ती फार मनोरंजक व बोधप्रद आहे. ज्ञानसागर ग्रंथ पारनेर येथें शके १६९५ इ.)

स. १७७३ ) विजयनामसंवत्सरे, मार्गशीर्ष वद्य ११ शुक्रवार, या दिवशीं लिहून झाला; त्याचे शेवटचे अध्यायांत हरिबुवांनीं आपल्या वंशाचा वृत्तांत दिला आहे. त्यावरून असें दिसतें कीं, हरिबोध ग्रंथ पुरा झाल्यावर भगवदाज्ञेनें ज्ञानसागर ग्रंथ हरिबुवांनीं लिहिला. हरिबोध ग्रंथ शके १६९० त पूर्ण झाला व ज्ञानसागर १६९५ त पारनेर येथें पूर्ण झाला. शके १६९९ त हरिबुवा नारायणगांवीं समाधिस्थ झाले. यावरून नारायणगांवीं त्यांनीं दोनचार वर्षेंच वास्तव्य केलें, असें दिसतें. हरिबुवांनीं आपला व आपल्या पत्नीचा ' हरि ' आणि ' हरीची गोडी ' या शब्दांनीं उल्लेख केला आहे. यावरून त्यांचें आपल्या पत्नीवर किती प्रेम होतें व तीही कशी अधिकारिणी पतिव्रता होती, हें स्पष्ट दिसतें. स्त्री–पुरुष हा भेद देहांचा आहे, पण अंतरंग एकच आहे त्यांची ताटातूट होऊं शकत नाहीं, अशी स्त्री-पुरुषसमता हरिबुवांनीं प्रस्थापित केली आहे. आपल्या पत्नीसंबंधानें आमच्या बहुतेक कवींचें मत याच प्रकारचें होतें, हें निरंजनमाधव, वामनपंडित, मोरोपंत, एकनाथ, नामदेव, चोखामेळा, इत्यादिकांच्या चरित्रांवरून उघड होतें.

हरिबुवांनीं आपल्या अंतकाळीं ज्ञानसागराचा २१ वा अध्याय वाचविला व तुकारामबुवांप्रमाणें आपल्या शिष्यवर्गास उपदेश केला. निर्याणापूर्वीं कित्येक दिवस ' आमची देहावसानाची वेळ जवळ आली ' अशी सूचना त्यांनीं आपल्या आप्तेष्टांस दिली होती. शके १६९९ हेमलंबी नाम संवत्सरे, वैशाख शुद्ध १, गुरुवारीं दोनप्रहरीं बुवा समाधिस्थ झाले. ' गोडाईसह विमानांत ( मखरांत ) बसून ते स्मशानांत गेले ' असें म्हटलें आहे. यावरून गोडाईनें सहगमन केलें असावें असें वाटतें. त्यावेळीं नारायणगांवीं मीना नदीच्या वाळवंटांत हजारों लोक जमले होते व हरिनामाचा गजर सारखा चालू होता. हरिबुवा समाधिस्थ होऊन आज १३३ वर्षें झालीं.

तेव्हांपासून आजपर्यंत त्यांची पालखी प्रतिवर्षी पंढरपुरास जात आहे. तेथें गोपाळपुऱ्यांत संतांच्या हजिरीच्या ठिकाणीं हरिबुवांच्या पालखीचा मान उजव्या बाजूचा आहे, यावरून संतांचें माहेरघर जें पंढरपुर तेथेंही हरिबुवांची गणना अग्रेसर संतमंडळांत केली जाते, हें उघड होतें.

महिपति, निरंजन माधव, मोरोपंत, देवनाथ, सोहिरोबा, अमृतराय, शिवदिन केसरी, हे संत व कवि हरिबुवांचे समकालीन होत.

आतां हरिबुवांच्या ग्रंथांतले कांहीं वेंचे देऊन हा लेख पुरा करितों.

ज्ञानसागर ग्रंथाच्या आरंभींच हरिबुवांनीं मंगलाचरण केलें आहे तें पाहिलें म्हणजे ईश्वरासंबंधाची त्यांची कल्पना किती उदात्त होती, हें लक्ष्यांत येईल—

### ओव्या.

जयजयाजी निर्गुण निराकारा। तूंचि परात्पर सोयरा।
अक्षय पदींचिया दातारा। चिदंबरा विलासिया ॥ १ ॥
जयजयाजी अनादिसिद्धा। निर्विकार तूं आवधा [ ? ]।
तुजसि न लागेचि ... धा। अक्षयपदा अभंगा ॥ २ ॥
क्षयातीत तूं निर्गुण। निश्चळ निर्मळ तूं पूर्ण।
सर्वांठायीं चैतन्यघन। व्यापुनी त्रिभुवन नांदसी ॥ ३ ॥
तुजसी आदि-अंत नाहीं। रूप न दिसेचि कांहीं।
... रवी देही ना विदेही। कांहीं नाहीं तोचि तूं ॥ ४ ॥
तुजसी नाहीं मूळ ना डाळ। कैंचें जाति वर्ण कुळ।
तुजवांचूनि रितें स्थळ। अळुमाळ असेना ॥ ५ ॥
कांहीं नाहीं तें तुझें रूप। तेंचि म्हणावें स्वरूप।
निखळ कोंदाटलें अमूप। पुण्यपाप ज्यासि नाहीं ॥ ६ ॥
जेव्हां कांहींच नव्हतें। तेव्हां तुझें रूप होतें।
स्वयंभू संचलें आइतें। परात्पर तें निजरूप ॥ ७ ॥

तुझी अघटित करणी । नव्हतीं आकाश धरणी ।
नव्हतीं तेज पवन पाणी । चारी खाणी त्या कैंच्या ? ॥ ८ ॥
चंद्र सूर्य नव्हते दोन । कैंचें तेथ तारांगण ।
ग्रहनक्षत्रांचें प्रमाण । न दिसे जाण कोठेंही ॥ ९ ॥
अवघा होता धुमधुमकार । नव्हता ब्रह्मा—हरि—हर ।
कैंचें तेथ चराचर । नाहीं आकार म्हणोनी ॥ १०
नव्हते सप्तही सागर । कैंचा मेरु आणि मांदार ।
कैंचे गिरि पर्वत थोर । धरेसी आधार नव्हता ॥ ११ ॥
तों कैंचा स्वर्ग कैंचा नरक । कैंचे यमदूत कुंभीपाक ।
कोणासि लागे काळधाक । जनलोक नसतां पैं ॥ १२ ॥

\+ + + +

पदार्थमात्र जें जें कांहीं । तुजवांचूनि जालेंचि नाहीं ।
तूंचि होऊनी सर्व देहीं । नांदसी पाहीं अभिन्नत्वें ॥ ३३ ॥

* * * * *

तुझे रूपीं सकल देव राहती । ब्रह्मा—विष्णु—उमापति ।
असंख्यात होती जाती । न करवे गणती तयांची ॥ ३८ ॥
अनंत ब्रह्मांडें रचती खचती । कल्पांतही होती जाती ।
तुझें स्वरूप अपरिमिति । आदि—अंतीं नाशेना ॥ ३९ ॥

* * * * *

बीजापोटीं वृक्ष असे । वृक्ष—बीज वेगळें नसे ।
तैसें जग आणि जगदीश । एकचि असे सर्वां ठायीं ॥ ४२ ॥

* * * *

मी तंव काय लिहूं जाणें । तूंचि बोलतोसी अबोलणें ।
माझे जिह्वाग्रीं बैसोन । वदविसी जाण ज्ञानसागर ॥ ४७ ॥

सद्गुरुस्तवनः—

जयजयाजी सद्गुरुमूर्ति । तुझे चरण आठवूनि चित्तीं ।
तूंचि बोलविसी वाचेप्रती । माझे हातीं लिहविसी ॥ ६२ ॥
तूंचि होसि श्रोता वक्ता । ग्रंथ-रचनेचा तूंचि कर्ता ।
तूंचि जाणसी अर्थ कथा । माझी काय कथा पामराची ॥ ६३ ॥
तूंचि ग्रंथ लिहितोसी । तूंचि अध्यात्म बोलसी ।
कैसें वदावें ग्रंथासी । हें तों मजसी न कळेचि ॥ ६४ ॥

माझे हृदयीं प्रगटोन । तूंचि बोलसी आपण ।
मतिमूढ मी काय जाणें । तुझे चरण आठवितों ॥ ६५ ॥
तुझे हृदयीं धरिले पाय । तूंचि माझी बापमाय ।
तुजवेगळी न दिसे सोय । करितां उपाय नानापरी ॥ ६६ ॥
तुझे कृपेचें बोलणें । तुझें तुजसींच अर्पण ।
जैसें गंगेचें जीवन । करावें अर्पण गंगेसी ॥ ६७ ॥
तुझे कृपेचे उद्गार । तूंचि वदविसी ज्ञानसागर ।
तूंचि जाणसी सारासार । काय मी पामर बोलूं शकें ॥ ६८ ॥
काय पांवा आपण वाजे । परी तो वाजवी त्यासींच साजे ।
सद्गुरु तुम्ही महाराज । बोलवा निजगुज मजपासुनी ॥ ६९ ॥

\+ + + +

नाहीं पाहिलीं शास्त्रें पुराणें । नाहीं केलें श्रवणमनन ।
काय बोलावें योजून । हें मी न जाणें सर्वथा ॥ ७३ ॥

* * * * *

बाळक बोलत बोबडें । परी तें मातेसी आवडे ।
मोहें उचलोनियां कडे । घेई निवाडें निजप्रीतीं ॥ ७७ ॥
बाळासी अलंकारभूषण । माता लेववी आपण ।
काय बाळक नको म्हणे । अथवा मागणें नलगे त्यासी ॥ ७८ ॥
बाळकासी लेववितां लेणें । मायाचि संतोषे आपण ।
काय बाळक त्यासी जाणें । तैसें करणें तुमचें ॥ ७९ ॥

संतस्तवनः—

तैसे तुम्ही संत साधुजन । माझे मनोरथ पुरवून ।
म्हणोनि तुम्हांसि आलों शरण । अभयदान द्यावें मज ॥ ९५ ॥
द्यावा प्रसाद आपुला । उच्छिष्टाचा वांटा मजला ।
थोर अथवा धाकला । पाहिजे केला सांभाळ ॥ ९६ ॥
द्यावा उच्छिष्टाचा वांटा । लहान अथवा मोठा ।
तुमचा चाकर मी धाकुटा । झाडितों वाटा संतांच्या ॥ ९७ ॥
तुमची जे कां चरणधुळी । तीर्थ म्हणोनि मी करितों आंघोळी ।
तुमचे मोचे वाहें शिरकमळीं । कदाकाळीं विसंबेना ॥ ९८ ॥

जालों संतांचा चाकर । म्हणवीतसें वाहनधर ।
म्हणोनि केला अंगीकार । अभय वर दीधला ॥ ९९ ॥

* * * * *

मी तंव काय बोलूं शकें । त्याचे कृपेचें कौतुक ।
मी तंव अनाथ दीन रंक । मागतों भीक तुम्हांपाशीं ॥ १०६ ॥
भक्ति झोळी घेऊनि हातीं । उदार दाता तूं श्रीपति ।
दिधली त्रिभुवनींची संपत्ति । झोळी रिती मग कैंची ॥ १०७ ॥
अक्षय पदींचा भिकारी । मागों आलों तुझे द्वारीं ।
त्रिभुवनींची संपदा सारी । घातली पदरीं पंढरीनाथें ॥ १०८ ॥
मग भाग्यासी काय उणें । खातां खर्चितां न सरे धन ।
भांडार अवघें त्रिभुवन । भगवंत सोनें अक्षयी ॥ १०९ ॥
तोचि ग्रंथ ज्ञानसागर । नाहीं पाहिला दुसरा आधार ।
पाहोनि बोलावा उतार । तोही प्रकार मी न जाणें ॥ ११० ॥
असतां घरींचें भांडवल । पदरीं पडे व्याज मुद्दल ।
नफा चौगुणी दुणावेल । वस्तु अमोल्य सांपडल्या ॥ १११ ॥
कासया दुसऱ्यापाशीं जावें । भांडवल कळंतरीं घ्यावें ।
उदीम करितां बुडवावें । दिवाळें काढावें आपुलें ॥ ११२ ॥
मुद्दल राखोनि नफा करी । तोचि पडे पदरीं ।
सावकार घालावा बाहेरी । व्याज मुद्दल फेडूनियां ॥ ११३ ॥
तरीच गोष्ट होय बरी । सुख पावेल संसारीं ।
दुःख पळोनी जाईल दुरी । प्रगटतां अंतरीं भगवंत ॥ ११४ ॥
तोचि प्रगटोनी बोले । नाहीं दुसरें पाहिलें ।
एकचि असे संचलें । नाहीं आलें दुजेपण ॥ ११५ ॥
दुसरें पाहोनि बोलावें । हें तंव मजसी नाहीं ठावें ।
धुंडोनियां काढावें । अक्षर जोडावें कैसें तें ॥ ११६ ॥
अक्षराची करी आटणी । सकार नकार जोडुनी ।
पहिलें केलें मोडोनी । नूतन घडोनि आपुलें ॥ ११७ ॥
पाहिला पाटाव उंच असे । त्याचा करूं नये नाश ।
रगटें लावितां थिगळ दिसे । कोणी न पुसे तयासी ॥ ११८ ॥
न्हालियाखालीं काय न्हाणें । उष्ट्यावरी जाऊनि बैसणें ।
न जेवितां पोट भरून । समाधान मग कैंचें ॥ ११९ ॥

स्वयंपाक करूनि परवडी । आपण जेवून दुसरियासी वाढी ।
दोघांसि तृप्ति होय गाढी । अभिनव गोडी स्वादाची ॥ १२० ॥
चाखोनियां स्वाद सांग । ज्यांनीं स्वयंपाक केला अंगें ।
तेचि निववितील जग । यथासांग जेवूनियां ॥ १२१ ॥
ब्रह्मरसाची घेऊनि गोडी । आपण जेवूनि आणिकासी वाढी ।
आली हटवठी चोखडी । जेणें परवडी प्रकाराची ॥ १२२ ॥

वरील ओव्यांत, दुसऱ्या कोणत्याही ग्रंथाचा आधार न घेतां, केवळ गुरुप्रसादप्राप्त स्वानुभवानेंच ज्ञानसागर ग्रंथ आपण लिहीत आहोंत, असें हरिबुवांनीं स्पष्ट सांगितलें आहे.

भक्तिमार्गाचें सौलभ्य व त्याचें माहात्म्य हरिबुवा वर्णितात:—

नवविधा भक्तीचीं लक्षणें । एकापरीस एक गौण ।
भक्ति करितां जोडे भगवान । सुलभ साधन सांगों आतां ॥ १ ॥
भक्ति करितां देव जोडे । भक्ति करितां परमार्थ घडे ।
भक्ति करितां निवारे सांकडें । बंधन रोकडें तुटोनि जाय ॥ २ ॥
भक्तिवांचोनि नाहीं गति । भक्तिवांचोनि न होय मुक्ति ।
भक्तिवांचुनि विश्रांति । परम-प्राप्ति भक्ति केल्या ॥ ३ ॥
भक्तियोगें मोक्ष जोडे । भक्तिस्तव माया विघडे ।
भक्ति करितां वैकुंठीं चढे । पद जोडे सायुज्यता ॥ ४ ॥
भक्ति करितां सद्गुरु प्रसन्न । प्राप्त होय ब्रह्मज्ञान ।
न राहेचि संसारभान । ऐसें महिमान भक्तीचें ॥ ५ ॥
भक्ति करितां विरक्ति बाणे । शांति प्रगटे येऊनि आपण ।
हृदयमंदिरीं बैसे ठाणें । नांदति येऊन क्षमा-दया ॥ ६ ॥
म्हणोनि भक्तिध्वज उभारा । लावा वैकुंठीं फरारा ।
वाचे हरिनाम उच्चारा । कीर्तन करा निशिदिनीं ॥ ७ ॥
शुद्ध करोनियां मन । करावें श्रवण-मनन ।
मग जाय निदिध्यास लागून । प्रगटे आपण साक्षात्कार ॥ ८ ॥
भावें विश्वास धरोनि मनीं । अखंड गर्जावें नाम-कीर्तनीं ।
लागावें संतांचे चरणीं । तरी चक्रपाणी कृपा करी ॥ ९ ॥
साधुसंतांसि भजावें । सकल देवांसी पुजावें ।
त्यांचें दर्शन घ्यावें । धरूनि भाव अंतरामाजी ॥ १० ॥

सकळही देव असती । मानाव्या भगवंताच्या मूर्ति ।
भूतदया अंतरीं सर्वांभूतीं । तेंचि भक्तीचें लक्षण ॥ ११ ॥

ज्ञानसागर ग्रंथ नानाप्रकारच्या दृष्टान्तांनीं आणि अध्यात्मज्ञानानें भरलेला आहे. १९ व्या अध्यायांत, दिवसाची रात्र आणि रात्रीचा दिवस करून, दिवसा फिरणाऱ्या लोकांस चोर समजून सुळावर देणाऱ्या एका बेबंद राजाची गोष्ट दिली आहे, ती फार बोधप्रद आणि मनोरंजक आहे; परंतु विस्तारभयास्तव ती येथें देतां येत नाहीं. ज्ञानसागर ग्रंथ पारनेर येथें, शके १६९५, विजयनाम संवत्सरे, मार्गशीर्ष वद्य ११ शुक्रवार, या दिवशीं लिहून झाला. शेवटल्या अध्यायांत आपल्या वंशाची हकीकत देतांना हरिबुवा म्हणतातः—

नामा शिंपी याची कुळी । तेंचि आमुची वंशावळी ।
विठ्ठल-रुक्मिणी मायबाप समूळीं । ऐका वेगळीं नामाभिधानें ॥ १ ॥

आजा पंजा बाप माय । नातु पंतू उणा काय ।
एकचि भगवंत अद्वय । परी मायामय सांगणें लागे ॥ २ ॥

पहा ते आजा पंजापासून । हरिभक्तीचीं लक्षणें ।
करिती भगवंताचें नामस्मरण । कथा-कीर्तन सर्वकाळ ॥ ३ ॥

करिती पंढरीची वारी । असोनि घराश्रमी संसारी ।
टाळ दिंडी पताका विणें घरीं । शोभे द्वारीं तुळसीवृंदावन ॥ ४ ॥

भक्तीचा तोडा मुळींहूनि असे । म्हणविती हरिचे दास ।
परंपरा ऐसाचि वंश । जगदीशें चालविला ॥ ५ ॥

बापें नाहीं सोडिली पंढरी । म्हणवी विठोबाचा वारकरी ।
नित्यकाळ कथा-कीर्तन करी । उल्हास अंतरीं धरोनियां ॥ ६ ॥

त्याचे पोटीं जन्म जाला । पूर्व ठेवा फळासि आला ।
म्हणोनि संतसंग घडला । भगवंत जोडला अविनाश ॥ ७ ॥

आधीं जाला हरिबोध । तेव्हां भगवंतें सांगितलें प्रसिद्ध ।
ज्ञानसागर सुबद्ध । आतां वदें ममकृपें ॥ ८ ॥

म्हणोनि विस्तारला ज्ञानसागर । भगवंत कृपेचा आधार ।
मातापित्यानें दाखविला संसार । त्यांचा उपकार न फिटेचि ॥ ९ ॥

पिता माझा केरेश्वर । माता बचाई पुण्य पवित्र ।
तयांचे योगें संसार । भवसागर ओहटून गेला ॥ १० ॥
माता-पिता दोघेंजण । त्यांजपासाव जन्म घेणें ।
त्यांचें उतराई होणें । सार्थक करणें आपुलें ॥ ११ ॥
जन्मा आलियाचें सार्थक । करुनि घेतां आपुली ओळख ।
तरीच मिळे ब्रह्मसुख । हारपे दुःख कोटि जन्मांचें ॥ १२ ॥
तोचि वंशीं दीप उजळला । जन्म जयाचा सुफळ जाला ।
उद्धरिलें कोटी कुळां । दोहीं पक्षांला समतुक ॥ १३ ॥
जन्मा येवोनि अनायासें । जो कां जाला हरिचा दास ।
तोचि भूमंडळीं दीपप्रकाश । दोहीं कुळांस उद्धरिलें ॥ १४ ॥
व्हावा ब्रह्मज्ञानी गुंडा । ज्याचा तिहीं लोकीं झेंडा ।
ऐक्यपणें पिंड-ब्रह्मांडा । नातळे बंडा मायेच्या हो ॥ १५ ॥

* * * * *

वरील ओंव्यांवरून असें दिसतें कीं, हरिबोध ग्रंथानंतर हरिबुवांनीं भगवदाज्ञेनें ज्ञानसागर ग्रंथ लिहिला. ‘ व्हावा ब्रह्मज्ञानी गुंडा । ज्याचा तिहीं लोकीं झेंडा ’ । ही ओंवी आणि ‘ पुत्र व्हावा ऐसा गुंडा । ज्याचा तिहीं लोकीं झेंडा । ’ हा तुकाराम बुवांचा अभंग यांचें साम्य वाचकांच्या लक्ष्यांत आलेंच असेल. हरिबुवांचे तीर्थरूप सुद्धां मोठे भगवद्भक्त होते. त्यांच्या पोटीं हरिबुवांसारखा ‘ ब्रह्मज्ञानी गुंडा ’ निपजला, यांत कांहीं आश्चर्य नाहीं. हरिबोध हा ग्रंथ शके १६९० त पूर्ण झाला व त्यानंतर पांच वर्षांनीं–शके १६९५ त–ज्ञानसागर पारनेर येथें पूर्ण झाला. शके १६९९ त हरिबुवा नारायणगांवीं समाधिस्थ झाले; यावरून, त्यांनीं नारायणगांवीं फक्त तीन चार वर्षेंच वास्तव्य केलें असें दिसतें. हरिबुवांनीं आपल्या पत्नीचा उल्लेख पुढील ओंव्यांत केला आहे:—

‘ पारनेर नगराचिया भीतरीं । मठ असे पैं निर्धारीं ।
गढीपासोनि समीप जरी । पूर्वेसी तरी शिंपीआळी ॥ १ ॥
पूर्व वेशीचिया पासून । शिंपीआळी सान्निध जाण ।
मध्यभागीं मठ-आसन । आम्हां वास करणें ते ठायीं ॥ २ ॥

हरि स्त्रियेसहित । गोडी घेऊनि करी परमार्थ ।
उडोनि गेली मायिक भ्रांत । भगवंत प्राप्त उभयतांसी ॥ ३ ॥
दोघांसी आसना वेगळिक । नाहीं दुजेपणाचा कळंक ।
एकसारिखेंचि ब्रह्मसुख । उल्हास हरिख उभयतां ॥ ४ ॥
हरि आणि हरीची गोडी । एकमेकांसी न सोडी ।
नये करितां आवड निवडी । ताडातोडी वेगळिक ॥ ५ ॥
साकर आणि गोडपण । काय निवडी दोन ।
हरि गोडी जीवें प्राणें । जाती शरण संतांसी ॥ ६ ॥

वरील ओंव्यांतील 'गोडी' हा शब्द गोडाईचा वाचक आहे. हरिबुवांचें आपल्या पत्नीवर किती प्रेम होतें व तीही कशी अधिकारिणी पतिव्रता होती, हें वरील ओंव्यांवरून स्पष्ट दिसतें. स्त्रियांसंबंधानें हरिबुवांचे विचार फार उदात्त होते. 'जो भेद विधीनें स्त्रीपुरुषीं केला । देहींच मात्र तो संततिकार्याला' या अर्वाचीन पद्यांत जी स्त्री-पुरुषसमता प्रतिपादन केली आहे, तीच हरिबुवांनीं आपल्या ज्ञानसागर ग्रंथांत विशेष प्रौढ शब्दांनीं स्थापित केली आहे. पारनेर शहराचें वर्णन ज्ञानसागर व हरिबोध या दोन्ही ग्रंथांच्या शेवटीं फार विस्तारानें केलें आहे.

आळंदीक्षेत्राचा उल्लेख करतांना हरिबुवा म्हणतात:—

'गांवापासोनियां दुरी । सप्तयोजनें असे तरी ।
नैऋत्य कोणीं अळंकापुरी । इंद्रायणीचे तीरीं वसलीसे ॥ १ ॥
तेंचि ज्ञानराजाचें नगर । अजातवृक्ष दारासमोर ।
चक्रतीर्थ पुण्यपवित्र । यात्रा भरे कार्तिक एकादशी ॥ २ ॥
अनन्यभावेंसी पैं जाण । तया ज्ञानेश्वरा माझें नमन ।
साष्टांग करकमळ जोडून । दास दीन म्हणवीतसें ॥ ३ ॥

हरिबुवांचे अभंगही फार प्रासादिक आणि बोधपर आहेत; पुढील अभंग पहाः—

## अभंग १.

उंबरांत जीव जाण । म्हणती आमुचें त्रिभुवन ॥ १ ॥
ऐसी परी जाली ज्यासी । ज्ञान कळेना तयासी ॥ २ ॥

केळ टाकूनियां दूर । हातीं घेतलें गाजर ॥ ३ ॥
ऐसे ठकले बहुत । नकळे भगवंताचा अंत ॥ ४ ॥
सोनें असोनी पदरीं । भीक मागे दारोदारीं ॥ ५ ॥
स्वतः सिद्ध मोक्ष आहे । भ्रांतीमुळें बद्ध होय ॥ ६ ॥
गुरुकृपेचा नवलावो । हरि म्हणे भेटवी देवो ॥ ७ ॥

## अभंग २.

देव पाहूं जातां अवघा भरला असे । दृष्टीसी न दिसे कदा काळीं ॥ १ ॥
भेटी घेऊं जातां भेटी नाहीं तुटी । अवघा जगजेठी सांठविला ॥ २ ॥
भिंतीवरील चित्रें भेटवा म्हणे भिंती । परी नाहीं भिंतीवेगळींच ॥ ३ ॥
स्थावरजंगमीं व्यापोनि राहिला । अवघा विस्तारला सृष्टीरूप ॥ ४ ॥
हरि म्हणे ऐसें शिवरामें केलें । स्वरूप दाविलें माझें मज ॥ ५ ॥

## अभंग ३.

स्वरूपचि ब्रह्म अविनाश निर्गुण । जाणतील खूण अनुभवी ॥ १ ॥
चळेना ढळेना असें तें अढळ । आकाशमंडळ तया पोटीं ॥ २ ॥
सर्वही व्यापक घनदाट भरियेलें । असे कोंदाटलें एकसरा ॥ ३ ॥
भरींव पोकळ ओतींव सगळें । संचलें केवळ जैसें तैसें ॥ ४ ॥
जुनाट योगींचें नीत नवाळीचें । हरि म्हणे आमुचें लाधियलें ॥ ५ ॥

## अभंग ४.

न दिसे संसार अवघेंचि ब्रह्म । सांडी मायाभ्रम विषयांचा ॥ १ ॥
तरंग समुद्रीं जैशा जल-लहरी । विरालिया तरी सिंधु होय ॥ २ ॥
ब्रह्मापासोनियां विश्व अवघें जालें । ब्रम्हींच मिळालें ब्रह्मपणीं ॥ ३ ॥
आपणचि एक दुजा नाहीं कोणीं । अवघा जनीं वनीं एक आत्मा ॥ ४ ॥
आपणचि विश्व आपणचि ब्रह्म । हरि म्हणे वर्म कळलीया ॥ ५ ॥

## अभंग ५.

मायेचें रूप जैसें मृगजळ । वृक्षाविणें फळें गोड झालीं ॥ १ ॥
वांझ प्रसवली कन्या-पुत्र व्याली । आईती मांडली बारशाची ॥ २ ॥
दोराचा तो सर्प म्हणती दंश जाला । झेंडु जो फुटला कल्पनेचा ॥ ३ ॥
वारा धरोनियां वळियेली वाती । लावियेली ज्योति खद्योताची ॥ ४ ॥
गगनींचीं सुमनें गुंफियेला हार । जन्ममरण निर्धार माळ घाली ॥ ५ ॥
हरि म्हणे संसार नाहीं मुळींहून । शिवरामें खूण दावियेली ॥ ६ ॥

### अभंग ६.

करोनि दळभार राजा चालियेला । डाव जो मांडिला बुद्धिबळाचा ॥ १ ॥
हत्ती आणि घोडा उंट चालविला । फर्जी मारविला प्याद्याहातीं ॥ २ ॥
काष्ठा तंव काय असे भिन्न भेद । पूर्वकर्म शुद्ध काय तया ॥ ३ ॥
तैसा बंधमोक्ष लटका संसार । असोनि सांचार ब्रह्मरूप ॥ ४ ॥
डाव जिंकोनियां लावियेली मात । मृगजळाआंत कोण भिजे ॥ ५ ॥
हरि म्हणे वर्म सांपडलें हातीं । धन्य तेचि होती खेळणार ॥ ६ ॥

### अभंग ७.

अहंकाराच्यामुळें सुखदुःख भोगी । आदळोनी अंगीं मीपणाच्या ॥ १ ॥
वासनेच्यामुळें भोगी जन्ममरण । यातना कठीण चौऱ्यांशींच्या ॥ २ ॥
कल्पनेच्या योगें स्वर्ग-नरक भोगी । काळाचिया मार्गीं जात असे ॥ ३ ॥
अविद्येची बाधा शिरोनि अंतरीं । जातो यमपुरी भोगावया ॥ ४ ॥
मनाचें कारण संकल्प-विकल्प । पुण्य आणि पाप भोगीतसे ॥ ५ ॥
हरि म्हणे राजा असोनि भिकारी । जाली ऐसी परी भ्रांती पुढें ॥ ६ ॥

### अभंग ८.

मेलें मेलें म्हणती काय त्याचें मेलें । असे तें संचलें स्वतः सिद्ध ॥ १ ॥
तरि कां चंचळत्व अचेतन जाला । व्यापार राहिला इंद्रियांचा ॥ २ ॥
आयुष्याचें उदक आटोनियां गेलें । मग दिसों राहिलें सूर्यबिंब ॥ ३ ॥
सूर्य रश्मिकळा न होय वेगळी । तैसी वस्तु चाली प्राणालागीं ॥ ४ ॥
हरि म्हणे प्राण आकाशीं मिळाला । आत्मा विसावला मूळ ठायां ॥ ५ ॥

### अभंग ९.

निद्रा आणि मरण सारखींच दोनी । पाहें तूं शोधोनी गुरुपुत्रा ॥ १ ॥
दोहींचाही जन्म जाला एके स्थानीं । राजा आणि प्रजा सारखीच ॥ २ ॥
कन्या आणि पुत्र गरोदर माता । काय वागविता भिन्नभाव ॥ ३ ॥
भगवंताची प्राप्ति सुषुप्तीचे ठायीं । आदि अंतीं पाहीं एकरूप ॥ ४ ॥
होणें आणि जाणें भ्रम एक मात्र । जातीचा हो व्याघ्र श्वान जाला ॥ ५ ॥
देह निमालिया स्वतःसिद्ध ब्रह्म । हरि म्हणे वर्म कळलिया ॥ ६ ॥

### अभंग १०.

मोक्ष नाहीं मुक्ति नाहीं नाहीं प्राचीन । काळ वेळ कांहीं नाहीं नाहीं जन्ममरण १
पाप नाहीं पुण्य नाहीं नाहीं स्वर्ग नरक । यम नाहीं दूत नाहीं नाहीं कुंभिपाक २
काम नाहीं क्रोध नाहीं नाहीं माया बंड । दृश्य हें कांहीं नाहीं लटकें थोतांड ३
लोभ नाहीं दंभ नाहीं नाहीं अहंकार । कांहीं नाहीं तेंचि आहे ब्रह्म निर्विकार ४
कांहीं नाहीं कांहीं तेंचि शोधुनियां पाहें । हरि म्हणे कांहीं नाहीं तेंचि होउनियां राहें ५

# नरहरि मोरेश्वर.

मुक्तेश्वरांच्या काव्य-रचनेचें अनुकरण करून भारतावर कविता करणारे जे मराठी कवि होऊन गेले, त्यांपैकीं नरहरि मोरेश्वर हे एक होत. यांची कविता फार रसाळ आणि मनोहर आहे. ह्यांच्या चरित्रासंबंधानें म्हणण्यासारखी माहिती उपलब्ध नाहीं. काव्यसंग्रहांत नरहरिमोरेश्वरकृत द्रोणपर्व प्रसिद्ध झालें आहे, त्याच्या प्रस्तावनेंत माझे मित्र रा० दामोदर केशव ओक यांनीं प्रस्तुत कवीसंबंधानें थोडीशी माहिती त्याच्याच ग्रंथाधारें दिली आहे; तिच्या आधारानें हा लहानसा लेख लिहिला आहे. आपल्या द्रोणपर्वाच्या शेवटीं कवि म्हणतात:—

**ओंव्या.**

समर्थ श्रीगुरु भीमराज । अवताररूपें श्रीरघुराज ।
समर्थ-संप्रदायी कीर्तिध्वज । रामदास लौकिकीं ॥ १० ॥
तदनुग्रह हस्त माथां । वाचे स्फुरितां वाग्देवता ।
भगवद्गुणीं प्रेम आस्था । भारती गंगा प्रगटली ॥ ११ ॥
श्रीलक्ष्मीनृसिंह रामराज । ज्यांचेनि जगा साम्राज्य ।
सिंहवदन अधोक्षज । भक्तपालक कृपाळु ॥ १२ ॥

* * * * * *

तया प्रसादें वागुद्भव । सिद्धि पावलें द्रोणपर्व ।
ग्रंथाभिमानी लक्ष्मीधव । मी बिगारी येथींचा ॥ १४ ॥
कुळदेवता श्रीभवानी । माया तुळजापुर-स्वामिणी ।
कवित्व-लतिका वाढे जनीं । हा प्रसाद तियेचा ॥ १५ ॥

* * * * * *

असो; बालाघाटीं ईटनगरीं । महा सुरवाड रम्यपुरी ।
नामें मोरोजी नरहरी । देशपांड्या तेथींचा ॥ १८ ॥
त्याची भार्या गुणैकराशी । नाम भवानी भवानीतोषी ।
हरिभक्त जन्मला पुत्र कुशीं । दास नरहरि संतांचा ॥ १९ ॥

द्रोणपर्व—उपसंहार.

वरील ओंव्यांवरून, हा कवि निजामशाहींत, बालेघाटाजवळ बीड परगण्यांत ईट नामक गांवीं, शके १६५०–१७०० च्या दरम्यान होऊन गेला असावा असें वाटतें. द्रोणपर्व शके १६९० त पूर्ण झाल्याचा उल्लेख कवीनें पुढील ओंवींत केला आहे:—

शके सोळाशें नव्वद । आश्विनमास प्रतिपदा शुद्ध ।
लेखन समाप्त जाहलें सिद्ध । पुण्यपावन श्रोतयां ॥ २१ ॥

कवीच्या वडिलांचें नांव मोरोजी नरहरि देशपांडे व आईचें नांव भवानी. रामदाससंप्रदायी भीमस्वामी यांजपासून कवीनें गुरूपदेश घेतला होता. रामदास-संप्रदायांत, प्रस्तुत कवीशीं थोड्या फार वर्षांनीं समकालीन असे चार भीमस्वामी होऊन गेले, ते येणें-प्रमाणें:—( १ ) डोमगांव मठ—भिवाजीस्वामी, शके १६७४. (२) शिरगांव मठ—भक्तलीलामृताचे कर्ते भिमाजीस्वामी, शके १७१९. ( ३ ) कण्हेर मठ—भिमाजीबुवा. व ( ४ ) तंजावर—भीमस्वामी, समाधि शक १६१३. या चौघांपैकीं पहिले भिवाजीस्वामी प्रस्तुत कवीचे गुरु असावेत, असा तर्क आहे. रामदासी—संप्रदायासंबंधानें कवीस मोठा अभिमान होता, असें दिसतें. भीमस्वामीच्या प्रसादानें आपणास काव्यस्फूर्ति झाली, असें कवीनें म्हटलें आहे. तुळजापुरची भवानी ही कवीची कुलदेवता होय. कवीचें पाळण्यांतलें नांव नरहरि होतें, तरी लोक त्यास बच्चाजी असेंही म्हणत असत. त्यास संस्कृत व मराठी या भाषांचें ज्ञान चांगलें होतें, असें त्याच्या कवितेवरून दिसतें. नरहरि मोरेश्वरांचीं उद्योग, भीष्म, द्रोण व कर्ण हीं भारताचीं चार पर्वें उपलब्ध असून, त्यांपैकीं द्रोणपर्व मात्र प्रसिद्ध झालें आहे. उद्योगपर्वाच्या आरंभीं कवि म्हणतो:—

विराटपर्वीचें सुधापान । सेवोनि लांचावलें माझें मन ।
उद्योगपर्वीचें ब्रह्मरसायन । इच्छा इच्छी अविलंबें ॥

यावरून मुक्तेश्वरांचीं पहिलीं चार पर्वें वाचून, भारताचा पुढील भाग आपण पूर्ण करावा या हेतूनें कवीनें इतर पर्वें रचण्याचा उप-

क्रम केला असावा असें वाटतें व हा तर्क बरोबर असल्यास, नरहरि मोरेश्वराच्या कालींही मुक्तेश्वरी भारताचीं पहिलीं चारच पर्वें उपलब्ध असावींत, असें म्हणणें भाग पडतें. गोपाळकवि, चंद्रात्मजरुद्र व शुभानंद या कवींनींही विराटपर्वापुढचींच पर्वें लिहिलेलीं आढळतात, यामुळें वरील तर्कास बळकटी येते. असो.
कर्णपर्वाच्या शेवटीं नरहरि मोरेश्वर म्हणतातः—

‘ उद्योग भीष्म द्रोण कर्ण । चत्वारि पर्वें गुणैकरत्नें ।
नरहरिमुखें सिंहाननें । प्रकट केलीं श्रवणार्थ्यां ॥

ह्यावरून कर्णपर्वापुढचीं पर्वें कवीनें लिहिलीं नसावींत असें वाटतें. प्रस्तुत कवि वीररसाचा मोठा भोक्ता दिसतो व वर दिलेलीं चारी पर्वें वीरसप्रधान असल्यामुळें, तेवढ्यांवरच त्यानें कविता केली असावी, असें मानण्यास हरकत नाहीं. निदान, ‘ आजमितीस तरी कर्णपर्वापुढील नरहरीचीं पर्वें उपलब्ध नसल्यामुळें वरील विधानास बाध येत नाहीं. ’

नरहरि मोरेश्वराची कविता चांगल्यापैकीं आहे; विशेषतः मुक्तेश्वराचें अनुकरण त्यास बरेंच साधलें आहे. कित्येक ओंव्या तर थेट मुक्तेश्वरी ओंव्यांसारख्या दिसतात. प्रस्तुत कवि बराच अर्वाचीन—मोरोपंत महिपतींचा समकालीन—असतां, त्याची भाषा अंमळ जुनी दिसते; कदाचित् मुक्तेश्वरी भाषेच्या अनुकरणाचा तो परिणाम असेल. कवीच्या हयातींतच त्याची कविता बरीच लोकप्रिय झाली होती; ‘ कवित्वलतिका वाढे जनीं ’ असें स्वतः कवीनेंच म्हटलें आहे. द्रोणपर्व शके १६९० त, ईट येथें कवीनें लिहिलें. त्याची शके १७०८ त—म्हणजे १८ वर्षांनीं—उतरून घेतलेली एक प्रत अक्कलकोट येथें सांपडली; तिच्या शेवटीं लेखकानें पुढील ओंवी घातली आहेः—

'श्रीनृसिंहराजनगरीं[1] । तेथील कर्णीक नामाधिकारी ॥
नारायणसुत निर्धारीं । करजगीं ग्रामीं वसतसे ॥'

नरहरि मोरेश्वराच्या द्रोणपर्वाचे अध्याय ३५ व ओंव्या ४९१५ आहेत. कर्णपर्वाचे अध्याय १६ आहेत.

नरहरि मोरेश्वरांच्या द्रोणपर्वांतले कांहीं वेंचे पुढें दिले आहेत; त्यांवरून मुक्तेश्वराचें अनुकरण करण्यांत कवीनें कसें चातुर्य दाखविलें आहे, तें वाचकांच्या लक्ष्यांत येईल. 'द्रोणाचार्यांनीं रचलेला व्यूह मी भेदन करितों' असें अभिमन्यु म्हणाला, त्यावेळीं:—

भीम बोले हर्षोत्तर । 'तुझ्या पाठीं सर्वही वीर ।
आम्हीं रणनदी पावों पार । चिंता न करीं सुपुत्रा !' ॥ ७६ ॥
पितृवाक्य पुष्पांजळी । येरें वंदोनियां मौळीं ।
नमन करितां पादयुगुळीं । आशीर्वादें गौरविला ॥ ७७ ॥
जयशब्द पिटोनि वाणी । वाद्य त्राहाटिलें रणीं ।
सौभद्र हर्षयुक्त मनीं । जावया धामा उल्हासे ॥ ७८ ॥
करुनी सेनेचा रगडा । कीर्तीचा उभवूं पूर्ण धेंडा ।
सारथीयातें गौरवोनी विडा । रत्नमाळा अर्पिल्या ॥ ७९ ॥
सारथी सारथ्यकलानिपुण । शस्त्रास्त्रमांदी भरुनी पूर्ण ।
बालार्ककिरणीं स्यंदन घन । ध्वजपताकीं सज्जिला ॥ ८० ॥
चाऱ्ही वारू गुणसंपन्न । तरुण सदृढ वज्रठाण ॥
जवें माघारती पवन । मनोरम शुभदर्शी ॥ ८१ ॥
हस्तकळे डोलतां रज्जू । वारू उसळले जैसे विजू ।
सौभद्रवीर शिर ताजू । जाणों कुमार दुसरा ॥ ८२ ॥
वारणवृंद नरपार्थिव । सौभद्र मृगेंद्र घाली कव ।
शर सोडिले प्राभिन्न हव । धरातळीं सकंप ॥ ८३ ॥
कीं तो काळ आयुष्यगणना । करितां सौभद्र पातला रणा ।
धर्म आज्ञावेळीं पाश निपुणा । कर्षोनि काळें वोढिला ॥ ८४ ॥
ना तो कृतांत काळयंत्र । दारू आयुष्य काळसूत्र ।
धर्मआज्ञा आग्निस्पर्शमात्र । काष्टें गोळा उसळला ॥ ८५ ॥

---

1 नरसोबाची वाडी.

वीरांमुखीं किलकिलाट । 'आला आला' म्हणती सुभट ।
'घ्या घ्या मारा' शब्द वरिष्ठ । सर्वां मुखीं माजला ॥ ८६ ॥
अनेक वाद्य वाजंतरीं । ढोल दमामे शृंग भेरी ।
हलक्या बुरंगें नफेरी । एक धायीं बहुविध ॥ ८७ ॥
जैसे नदीपुराचे लोट । धांवले तैसे वीरसंघाट ।
करुनी दुर्गकोट । सौभद्र मध्यें वेष्टिला ॥ ८८ ॥
हस्ती पदाती असिवार । रथिया रथी शस्त्रसंभार ।
सोडिते जाले एकधार । जेवीं वाकुडी पुष्याची ॥ ८९ ॥
बाप अभिमन्य वीरराजू । शर सोडिले तेजःपुंजू ।
तिखार धार मेषध्वजू । जाणों भासे अवयवी ॥ ९० ॥
निवारोनी शरें त्यांचिया वृष्टि । वीर वीर भेदिले हटी ।
विगत करुनी सेनामिठी । मध्यभागीं शिरकला ॥ ९१ ॥
जैसा सिंह वारणदळीं । निघोनि त्यांची करी खंदळी ।
कीं अशोकीं राक्षसफळी । करी धुळी हनुमंतू ॥ ९२ ॥
तयापरी सुरद्रसूनू—। तनय नुरवी वीरां भानू ।
जाणों प्रदीप्त प्रळय भानू । क्षयालागीं क्षोभला ॥ ९३ ॥
बाहुवीर्य अमोघधन । कोटिच्या कोटी सोडिले बाण ।
कणीक नाळीक क्षयरूप जाण । सायकादि वत्सदंत ॥ ९४ ॥
जाणों समक्ष काळदशन । तक्षकविषें घोळिले पूर्ण ।
वृश्चिक पुच्छा पीठ पाषाण । तया पृष्ठीं निर्मिले ॥ ९५ ॥
ऐसिया शरांच्या बोधमाळा । लाविल्या देहुडया हस्तकळा ।
धडधडाट वन्हिज्वाळा । जेंवी वना धडकती ॥ ९६ ॥
तटतटां वीर पडती रणीं । थटथटां शिरें उडती रणीं ।
रुक्मकुंडलें शुक्रगुरु मानी । दिशा तेजें उजळती ॥ ९७ ॥
सुंदर नास आकर्ण नयन । विशाळ भाळ केशरपूर्ण ।
प्रवाळ ओष्ठ कुंदरदन । श्रीमुख शशिसाजिरें ॥ ९८ ॥
ऐसिया शिरांचिया राशी । भूमी दाटल्या बाणकोशीं ।
भूषित बाहु अंगदेशीं । व्योममार्गीं उडविले ॥ ९९ ॥
उतरतां भासती पंचबाणी । करमुद्रिका मुगुटमणी ।
मुष्टिशस्त्रें झळकती किरणीं । जाणों गरळा विषाच्या ॥ १०० ॥

रुचिरकांत कोमळतनू । सुगंध चंदनीं चर्चिला घनू ।
खंडविखंड तुरुनी भानू । भूमी अपार पाडिल्या ॥ १०१ ॥
वीरांसहित खंडुनी हस्ती । धरे पाडिले पर्वताकृती ।
घंटा नेपुरें पाखरा किती । धुळीमाजीं लोळती ॥ १०२ ॥
अश्वरत्नें भूषित भूषणीं । सहित स्वार पाडिले रणीं ।
शोणितरंगें रंगली धरणी । भूषणें शस्त्रें अपार ॥ १०३ ॥
पदाति वीर वस्त्राभरणीं । गदा मुद्गर पाशपाणी ।
लहुडी चक्र त्रिशूळ किरणी । भिंडीमाळादि अनेक ॥ १०४ ॥
खंडविखंड गात्रस्थानीं । होउनी पडिले समरांगणीं ।
हुंबती क्रंदती बोभाती वाणी । 'काका मामा बांधवा' ॥ १०५ ॥
सहस्रशः वीर रणांगणीं । पडिले बीभत्स वस्त्राभरणीं ।
रोमवसनीं ऊर्णवसनी । चर्मवसनी यवनादि ॥ १०६ ॥
गजाश्ववीर छिन्नगात्रीं । शवें दाटली निबिड धात्री ।
हलकल्लोळ सेनासत्रीं । भूतगणा आल्हादू ॥ १०७ ॥
प्रळयकाळ भावोनि वीरीं । भयचकित पळती दूरी ॥
जैसा अग्नि धडकतां वनांतरीं । श्वापदातें आक्रांतू ॥ १०८ ॥
ना तो विष्णू दानवी सेना । विगत करुनी लाविली रणा ।
कीं तो महेश कैलासराणा । भ्रष्टी त्रिपुरा ज्यांपरी ॥ १०९ ॥
तयावरी एकांगवीर । सौभद्र शूर रणरंगधीर ॥
विचरे जैसा समीर । अटक कोठें असेना ॥ ११० ॥
देखोनी संतप्त दुर्योधन । रोषें अधर चावोनि पूर्ण ॥
लोटला जैसा पंचानन । शस्त्रघायीं ताडिल्या ॥ १११ ॥
द्रोण बोले महींद्राप्रती । 'काय पळतां? धरा शक्ती ॥
देह मृत्यूचा सांगाती । पळतां अमर होइजे' ॥ ११२ ॥
कीर्तीनें जावें स्वर्गधामा । हाचि क्षत्रियां धर्म तुम्हां ॥
भय त्यागोनि क्रोधगरिमा । रक्षा वेगीं रायातें' ॥ ११३ ॥

**द्रोणपर्व, अध्याय ९.**

**भीष्मपर्वाचे अंतीं भीष्म शरपंजरीं पडले असतां, कर्ण त्या ठिकाणीं गेला, त्या प्रसंगाचें वर्णनः—**

जाणों तारा तुटे गगनीं । कीं दामिनी कडाडिली अवनीं ।
ऐसिया संभ्रमें वीर अयनीं । भीष्मदर्शना पातला ॥ ९६ ॥

वीरांमुखीं किलकिलाट । 'आला आला' म्हणती सुभट ।
'घ्या घ्या मारा' शब्द वरिष्ठ । सर्वां मुखीं माजला ॥ ८६ ॥
अनेक वाद्य वाजंतरीं । ढोल दमामे शृंग भेरी ।
हलक्या बुरंगें नफेरी । एक घायीं बहुविध ॥ ८७ ॥
जैसे नदीपुराचे लोट । धांवले तैसे वीरसंघाट ।
करुनी दुर्गकोट । सौभद्र मध्यें वेष्टिला ॥ ८८ ॥
हस्ती पदाती आसिवार । रथिया रथी शस्त्रसंभार ।
सोडिते जाले एकधार । जेवीं वाकुडी पुष्याची ॥ ८९ ॥
बाप अभिमन्य वीरराजू । शर सोडिले तेजःपुंजू ।
तिखार धार मेषध्वजू । जाणों भासे अवयवी ॥ ९० ॥
निवारोनी शरें त्यांचिया वृष्टि । वीर वीर भेदिले हटीं ।
विगत करुनी सेनामिठी । मध्यभागीं शिरकला ॥ ९१ ॥
जैसा सिंह वारणदळीं । निघोनि त्यांची करी खंदळी ।
कीं अशोकीं राक्षसफळी । करी धुळी हनुमंतू ॥ ९२ ॥
तयापरी सुरद्रसूनू—। तनय तुरवी वीरां भानू ।
जाणों प्रदीप्त प्रळय भानू । क्षयालागीं क्षोभला ॥ ९३ ॥
बाहुवीर्य अमोघधन । कोटिच्या कोटी सोडिले बाण ।
कणीक नाळीक क्षयरूप जाण । सायकादि वत्सदंत ॥ ९४ ॥
जाणों समक्ष काळदशन । तक्षकविषें घोळिले पूर्ण ।
वृश्चिक पुच्छा पीठ पाषाण । तया पृष्ठी निर्मिले ॥ ९५ ॥
ऐसिया शरांच्या बोधमाळा । लाविल्या देहुड्या हस्तकळा ।
धडधडाट वन्हिज्वाळा । जेंवीं वना धडकती ॥ ९६ ॥
तटतटां वीर पडती रणीं । थटथटां शिरें उडती रणीं ।
रुक्मकुंडलें शुक्रगुरु मानी । दिशा तेजें उजळती ॥ ९७ ॥
सुंदर नास आकर्ण नयन । विशाळ भाळ केशरपूर्ण ।
प्रवाळ ओष्ठ कुंदरदन । श्रीमुख शशिसाजिरें ॥ ९८ ॥
ऐसिया शिरांचिया राशी । भूमी दाटल्या बाणकोशीं ।
भूषित बाहु अंगदेशीं । व्योममार्गीं उडविले ॥ ९९ ॥
उतरतां भासती पंचबाणी । करमुद्रिका मुगुटमणी ।
मुष्टिशस्त्रें झळकती किरणीं । जाणों गरळा विषाच्या ॥ १०० ॥

रुचिरकांत कोमळतनू । सुगंध चंदनीं चर्चिला घनू ।
खंडविखंड तुरुनी भानू । भूमी अपार पाडिल्या ॥ १०१ ॥
वीरांसहित खंडुनी हस्ती । धरे पाडिले पर्वताकृती ।
घंटा नेपुरें पाखरा किती । धुळीमार्जी लोळती ॥ १०२ ॥
अश्वरत्नें भूषित भूषणीं । सहित स्वार पाडिले रणीं ।
शोणितरंगें रंगली धरणी । भूषणें शस्त्रें अपार ॥ १०३ ॥
पदाति वीर वस्त्राभरणीं । गदा मुद्गर पाशपाणी ।
लहुडी चक्र त्रिशूळ किरणी । भिंडीमाळादि अनेक ॥ १०४ ॥
खंडविखंड गात्रस्थानीं । होउनी पाडिले समरांगणीं ।
हुंबती क्रंदती बोभाती वाणी । 'काका मामा बांधवा' ॥ १०५ ॥
सहस्त्रशः वीर रणांगणीं । पडिले बीभत्स वस्त्राभरणीं ।
रोमवसनीं ऊर्णवसनी । चर्मवसनी यवनादि ॥ १०६ ॥
गजाश्ववीर छिन्नगात्रीं । शवें दाटली निबिड धात्री ।
हलकल्लोळ सेनासत्रीं । भूतगणा आल्हादू ॥ १०७ ॥
प्रळयकाळ भावोनि वीरीं । भयचकित पळती दूरी ॥
जैसा अग्नि धडकतां वनांतरीं । श्वापदातें आकांतू ॥ १०८ ॥
ना तो विष्णू दानवी सेना । विगत करुनी लाविली रणा ।
कीं तो महेश कैलासराणा । भ्रष्टी त्रिपुरा ज्यांपरी ॥ १०९ ॥
तयावरी एकांगवीर । सौभद्र शूर रणरंगधीर ॥
विचरे जैसा समीर । अटक कोठें असेना ॥ ११० ॥
देखोनी संतप्त दुर्योधन । रोषें अधर चावोनि पूर्ण ॥
लोटला जैसा पंचानन । शस्त्रघायीं ताडिल्या ॥ १११ ॥
द्रोण बोले महींद्राप्रती । 'काय पळतां? धरा शक्ती ॥
देह मृत्यूचा सांगाती । पळतां अमर होइजे' ॥ ११२ ॥
कीर्तीनें जावें स्वर्गधामा । ह्याचि क्षत्रियां धर्म तुम्हां ॥
भय त्यागोनि क्रोधगरिमा । रक्षा वेगीं रायातें' ॥ ११३ ॥

**द्रोणपर्व, अध्याय ९.**

**भीष्मपर्वाचे अंतीं भीष्म शरपंजरीं पडले असतां, कर्ण त्या ठिकाणीं गेला, त्या प्रसंगाचें वर्णनः—**

जाणों तारा तुटे गगनीं । कीं दामिनी कडाडिली अवनीं ।
ऐसिया संभ्रमें वीर अयनीं । भीष्मदर्शना पातला ॥ ९६ ॥

उतरूनियां रहंवरयानीं । प्रवेशला सभासदनीं ।
दृष्टी देखिला प्रतापतरणी । शरासनीं सुशोभा ॥ ९७ ॥
जाणों धरे पातला सूर्य सांग । कीं द्रोणाद्रीचें खवळे शृंग ।
ना तें सुदर्शन प्रत्यक्ष आग । गळोनि तळा पडियेलें ॥ ९८ ॥
ऐसिया परी गंगाकुमरा । देखोनि काळजीं सोडिला धारा ।
नयनांबुजीं अंबुधारा । कंठ सद्गद अशोभा ॥ ९९ ॥
सांवरूनी शोकधाडें । वंदोनि उभा राहिला पुढें ।
म्हणे 'पार्थ विक्रमाचें बाडें । सुरासुरां अभेद्य ॥ १०० ॥
जितक्षमा पुरुषार्थ वृद्धि । साम्यते नये अक्षोभ उदधी ।
सर्वास्त्रप्रवीण विजयसिद्धी । पुढें उभ्या राहती ॥ १०१ ॥
विजयरथ अक्षोभ तूणीर । अशनिप्राय गांडीव प्रचुर ।
ध्वजीं विराजे श्रीशंकर । सारथी स्वामी विश्वाचा ॥ १०२ ॥
मनुष्यरूपाची धरूनि बुंथी । साह्या मिनला इंदिरापती ।
भूभार हरुनी नाना युक्ती । यश वर्धवी त्रिजगतीं ॥ १०३ ॥
राम विराम केला कदनीं । आजित क्षत्रिया सर्व अवनीं ।
ऐसिया तूतें समरांगणीं । शरासनीं निजविलें ॥ १०४ ॥
हेंचि आश्चर्य हृदयालया । गमे प्रौढ महाराया ॥
काळविक्रमी विजयीं बा ह्या । वीरां सर्वां त्रासिलें ॥ १०५ ॥
तव आश्रयें नरमंडणा । दुर्योधन प्रवर्तला रणा ।
आतां विगत कामना । आश्रय कोठें दिसेना' ॥ १०६ ॥
कर्णमुखींची ऐकोनि वाणी । भीष्म बोले प्रसन्न वदनीं ।
म्हणे 'वीरा पुरुषार्थखाणी । तुझी मी जाणे बाळका ॥ १०७ ॥
तुज असतां वर्तमान । किमर्थ व्याकुळ दुर्योधन ।
धरणीं वीर तुजसमान । नाहीं विक्रमी सर्वथा ॥ १०८ ॥
पृथा कुंती तव उत्पत्ती । सूर्यवीर्य अमोघशक्ती ।
जिंकिल्या भूपांच्या अमित पंक्ती । जे अजिंक्य काळातें ॥ १०९ ॥
सुरसमूहोपाळणशक्ती । जैसा रक्षक शैलघाती ।
तैसा कौरवसेनापती । तूं समर्थ वीरवर्या ॥ ११० ॥
सुयोधनाचे हितस्वार्थीं । पृथ्वीजय करितां शक्ती ।
विगत करूनि नृपांच्या पंक्ती । साधिला जय प्रतापें ॥ १११ ॥

* * * * *

महाप्रतापी द्रोणाचार्य । आण तूं विक्रमी दुजा सूर्य ।
रक्षिजे कौरवां वीर्यशौर्य—। बाहुप्रतापें बाळका ॥ ११६ ॥
ऐकोनि देवव्रताची वाणी । कर्णें भाळ स्पर्शिला चरणीं ।
आज्ञा घेवोनि प्रसन्न वदनीं । कडकडाटीं निघाला ॥ ११७ ॥

**द्रोणपर्व, अध्याय १.**

**दौःशासनीच्या गदाघातानें अभिमन्यु समरांगणीं पडल्यावर अर्जुनानें धर्मराजास ‘ युद्धवृत्तांताची सोय । समूळ मातें निवेदीं ’ अशी विनंति केली, त्यावेळीं:—**

‘ शोकाकुळित धर्मराजा । बोलता जाहला भीमानुजा ।
म्हणे ‘ काय सांगों कपिध्वजा ! । दुःख उभय येतसे ॥ ५४ ॥
दानवयुद्धा जातां तुज । द्रोणें घातली माजीं पैज ।
व्यूह निर्मोनी विगततेज । भूप सर्व त्रासिले ॥ ५५ ॥
कोण्हा न करवे उठावणी । म्यां सौभद्र प्रेरिला रणीं ॥
नेणों काळ शिरकला बाणीं । क्षया न्याया पुत्रातें ॥ ५६ ॥
तो अभिमन्यू वीरराजू । महाप्रतापी अरुणानुजू ॥
वीरसागरीं डहुळोनि भुजू । क्षीण केलें क्षत्रियां ॥ ५७ ॥
पाठी साह्य जातां आम्हां । क्षुद्र जयद्रथ पापकर्मा ॥
शिववरदें बाहुविक्रमा । वीरां सर्वां रोधिलें ॥ ५८ ॥
भीमादिकांचें प्रतापबळ । निर्फळ करुनी टाकिलें फोल ॥
एकटें बाळ विक्रमकीळ । वन्हिप्राय सुसाटे ॥ ५९ ॥
षड्रथी होवोनी एकत्र । वीरसामग्री छेदिल्या शस्त्र ।
दुःशासनाचिया पुत्रें । गदाघातें मारिला ॥ ६० ॥
विपरीत मुंगीनें ग्रासिला मेरू । टिवाटिवी शोषिला जळधरू ।
तमें लोपिला सहस्रकरू । काळ वृकें फाटिला ॥ ६१ ॥
वणवा विझविला दर्भकणीं । वृश्चिकविषें जाळिला अशनी ।
निर्झरोदकें अगस्ती मुनी । वाहोनि गेला सागरा ॥ ६२ ॥
तयापरी तैसी गती । सौभद्रासी जाहली प्राप्ती ।
सहस्रशः मारिल्या वीरपंक्ती । नराश्वगज प्रतापें ॥ ६३ ॥

आठ सहस्र नवशत । नव दशक रथी बळ समर्थ ।
दोन सहस्र राजपुत्रांतें । स्वर्गधामा वोपिलें ।। ६४ ।।
बृहद्बळा आणि लक्ष्मणा । प्रतापें धाडिलें यमसदना ।
वीरमंडळी डोलवी माना । जाता जाहला स्वर्गातें ॥ ६५ ॥

**द्रोणपर्व, अ० १२.**

मूळ महाभारतांत नसलेल्या गोष्टी वर्णन करणाऱ्या मराठी कवींचा विषेध ‘ प्राकृत कवींचा वाग्जल्प । ’ इत्यादि ओवीनें मुक्तेश्वरांनीं केला आहे, त्याचप्रमाणें नरहरी मोरेश्वर यांनींही केला आहे. अभिमन्यु समरांगणीं पडल्यावर जयद्रथानें त्याजवर लत्ताप्रहार केला असें कांहीं मराठी कवींनीं लिहिलें आहे, परंतु मूळ महाभारतांत त्यास कांहीं आधार नाहीं. यासंबंधानें नरहरि मोरेश्वर म्हणतात:—

‘ प्राकृत कवीची वाग्वल्ली । सौभद्र पाडिल्या भूमीवरी ।
लत्ताप्रहार मस्तकावरी । केला सैंधवें संतोषें ॥ ७२ ॥
सौभद्रें प्राण धरिला कंठीं । होतां धनंजयाची भेटी ।
गुज सांगतां क्रोधें किरीटी । प्रतिज्ञा करी प्रतापें ।। ७३ ।।

हा कथाभाग नामदेवकृत महाभारत व श्रीधरकृत पांडवप्रताप या ग्रंथांत वर्णिला आहे. यावरून, ज्या ज्या मराठी कवींनीं महाभारतावर मराठी कविता केली आहे, त्यांच्या महाभारताच्या मूळ प्रतींत कथाभागासंबंधानें बऱ्याच ठिकाणीं भिन्नत्व असावें, असें वाटतें. नरहरि मोरेश्वरांनीं आपल्यापूर्वीं होऊन गेलेल्या मराठी कवींचे ग्रंथ लक्ष्यपूर्वक वाचले होते, हें वरील ओंव्यावरून उघड दिसत आहे. त्याचप्रमाणें ‘ प्राकृत कवींचा वाग्जल्प । ’ हा मुक्तेश्वरी चरण आणि ‘ प्राकृत कवींची वाग्वल्ली ’ हा प्रस्तुत कवींचा चरण, यांतील साम्य लक्ष्यांत घेतलें असतां व प्रस्तुत कवीच्या कवितेंत मुक्तेश्वरी कवितेंतलीं ‘ भंगों न शके विधाता ’ इत्यादि

कित्येक वाक्यें जशाचीं तशीं आलेलीं पाहतां, प्रस्तुत कवीनें मुक्तेश्वरांचें अनुकरण करण्याचा प्रयत्न केला आहे, या माझ्या विधानास बळकटी आल्याशिवाय रहात नाहीं; इतकेंच नव्हे, तर मुक्तेश्वरांनीं लिहिलेल्या पहिल्या चार पर्वांपुढील पर्वें आपण लिहून तो ग्रंथ पुरा करावा, याच हेतूनें नरहरि मोरेश्वर यांनीं काव्यरचनेचा उपक्रम केला असावा, असेंही वाटल्याशिवाय राहात नाहीं. शेवटीं, प्रस्तुत कवीनें आपल्या द्रोणपर्वाच्या आरंभीं आपल्या श्रोत्यांची जी प्रार्थना केली आहे, ती येथें सादर करून हा लेख पुरा करितों.

'नमो पंडित विद्वज्जन । संत सज्जन श्रोते निपुण ।
त्यांचे अवधानें प्रज्ञापूर्ण । मूढ सुरगुरु तुकें पैं ॥ ११ ॥
संत सज्जन कृपामूर्ती । हरिगुणप्रेमा दृढशक्ती ।
वक्तया सुखद नमन मुहूर्तीं । जेवीं जननी तान्हया ॥ १२ ॥
बाळकाचे बोबडे बोल । अर्थहीन पोचट फोल ।
परी सर्वांगाचें कर्णयुगुल । करूनि तोषे माउली ॥ १३ ॥
कीं पित्याचें अंतरवनीं । सदय मेघ वर्षे जीवनीं ।
ना तें चकोर तल्लीन ध्यानीं । फळे जेवीं हिमांशु ॥ १४ ॥
कोण प्रीतीचें ग्लान मानी । पूर्वें पावे वासरमणी ।
मागें वत्सध्यासें पाहे जननी । स्नेहें युक्त वोरसें ॥ १५ ॥
तयापरी करुणानिधी । लाड पुरवोनि प्रज्ञावृद्धी ।
वाढ करूनि सोज्वल बुद्धी । भारतीं भारत बोलवा ॥ १६ ॥
भारतगंगा भागीरथी । नौकारूप तुमची शक्ती ।
आश्राउनी वर्णनीं धरिली मती । पार मातें करावें ॥ १७ ॥
प्रभू ! तुमचे अनुमोदनीं । वाक्तुषार सिंधुजीवनीं ।
कवित्वलतिका वर्धे गुणीं । हा प्रसाद तुमचा ॥ १८ ॥
तुम्हीं न होतां सानुकूळ । कवित्वलतिका होय विफळ ।
जैसी योषिता लावण्यकीळ । मूर्खसंगें विनाशे ॥ १९ ॥

## चंद्रात्मजरुद्र.

ह्या कवीचें ' भीष्मपर्व ' रा. त्र्यं. गु. काळे यांनीं कृपा करून मजकडे पाठविलें, त्याच्या व रा. काळे यांनीं आपल्या ' समालोचकांत ' प्रस्तुत कवीवर लिहिलेल्या लेखाच्या आधारानें हा लेख लिहिला आहे.

चंद्रात्मजरुद्र हा कवि उच्च प्रतीचा आहे. याची कविता सुसंस्कृत, प्रासादिक आणि रसवती आहे. यांचीं ' उद्योग ' व ' भीष्म ' हीं महाभारताचीं दोन मराठी ओवीबद्ध पर्वें उपलब्ध झालीं आहेत; त्यांपैकीं भीष्मपर्व मात्र मी पाहिलें आहे, त्यांत कवीनें स्वतः संबंधाची माहिती मुळींच दिलेली नाहीं. या कवीचीं आणखी कांहीं प्रकरणें, हल्लीं, कोंकणांत, एका गृहस्थास मिळालीं आहेत, परंतु तीं माझ्या अवलोकनांत न आल्यामुळें, त्यांपैकीं एखाद्या प्रकरणांत कवीनें आत्मवृत्त दिलें आहे कीं काय, हें सांगतां येणें शक्य नाहीं. भीष्मपर्वाच्या आरंभीं ' गणेशसरस्वतीस्तवन ' विस्तारपूर्वक केलें आहे, यावरून कवीनें सबंध महाभारतावर मराठी कविता केली आहे कीं, एकदोन पर्वेंच उतरलीं आहेत, याचाही निर्णय करितां येणें शक्य नाहीं. भीष्मपर्वाच्या आरंभीं खालील प्राकृत कवींचा निर्देश आढळतो:—

### ओंव्या.

' प्राकृत ग्रंथां आदिकवि । **मुकुंदराज** महानुभवीं ।
ब्रह्म—विद्येची परवडी बरवी । वाढी सकल जनांतें ॥ ४० ॥
निवृत्तिदेवाचा लाहोनि वर । ज्ञानाचा ईश्वर **ज्ञानेश्वर** ।
प्रत्यक्ष ब्रह्मपरात्पर । अत्यादरें नमियेला ॥ ४१ ॥
सायोज्यपंथा मोक्ष सोपान । त्या **सोपान**देवा साष्टांग नमन ।
एकनाथ भागवतपरायण । साष्टांग नमन तयासी ॥ ४३ ॥

मुक्तीचा ईश्वर मुक्तेश्वर। साहित्यरत्नाचें भांडारागार।
इतर कवी जे सानथोर। समस्तां नमस्कार साष्टांगीं।

या ओव्यांत, मुकुंदराज, ज्ञानेश्वर, सोपानदेव, एकनाथ आणि मुक्तेश्वर या पांच मराठी कवींचा मात्र उल्लेख केला आहे; वामन, रामदास, तुकाराम इत्यादि नामांकित कवींचा उल्लेख आढळत नाहीं. यावरून प्रस्तुत कवि मुक्तेश्वरांनंतर थोड्याच वर्षांनीं होऊन गेला असावा, असें वाटतें. उद्योगपर्वांतही मुक्तेश्वरापुढील कवींचा उल्लेख नाहीं, यावरूनही वरील अनुमवास बळकटी येते. कवि म्हणतो:—

मज संस्कृतीं नाहीं अभ्यास। कर्नाटक कवि कुमारव्यास।
त्याचेनि आधारें ग्रंथविलास। प्रारंभिला या हेतु॥ ५५॥

'कानडी भाषेंत, कुमारव्यास नामक कवीचें महाभारत प्रसिद्ध आहे, त्याच्या आधारानें हें मराठी भारत मी लिहीत आहें. कारण मला संस्कृताचा अभ्यास नाहीं' असें कवि म्हणतो. पण त्याच्या भीष्मपर्वावरून, त्यास संस्कृत व मराठी या भाषांचें ज्ञान चांगलें होतें, हें अगदीं स्पष्ट दिसतें व 'मज संस्कृतीं नाहीं अभ्यास' हें त्याचें विधान केवळ शालीनतेचें आहे, असें म्हणणें भाग पडतें. भीष्मपर्वांतील प्रारंभींच्याच कित्येक ओंव्यांवरून कवीस अध्यात्म शास्त्राचीही चांगली माहिती असावी, असें दिसतें. उद्योगपर्वारंभीं ज्ञानेश्वरांच्या ज्ञानेश्वरीचा 'गीतार्थाचा अनुभव। अति अभिनव प्रगटविला' अशा शब्दांनीं उल्लेख केला असून, मुक्तेश्वरास 'साहित्यरत्नाचें भांडारागार।' म्हटलें आहे, यावरून कवीनें आपल्या पूर्वीं होऊन गेलेल्या मराठी कवींचे ग्रंथ लक्ष्यपूर्वक वाचले होते व त्या ग्रंथांसंबंधानें यथार्थ व समर्पक अभिप्राय व्यक्त करितां येण्याइतकी मार्मिकता त्याच्या अंगीं होती, हें स्पष्ट दिसत आहे. मजपाशीं असलेलें भीष्मपर्व अपूर्ण आहे; पहिले सहा अध्याय

पूर्ण असून, सातव्या अध्यायाच्या ९६ व्या ओंवीपुढील ओंव्या कमी आहेत; सातव्या अध्यायांतील कथाभागावरून, त्याच अध्यायाचे अखेरीस त्या पर्वाची समाप्ति झाली असली पाहिजे, असें वाटतें व हा तर्क खरा धरल्यास भीष्मपर्वाच्या ओंव्या सुमारें ११०० होतात. ग्रंथाची भाषा बरीच जुनी दिसते; ‘चंद्रात्मजु,’ ‘सुरवाडु’ अशा प्रकारचीं शब्दांचीं जुनी रूपें व ज्ञानेश्वरींतले कांहीं जुने शब्द चंद्रात्मजाच्या कवितेंत आढळतात. कानडी ग्रंथावरून कवीनें आपलें भारत लिहिलें असतां, त्यांत कानडी शब्द क्वचितच आढळतात; हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. या कवीचें संपूर्ण महाभारत उपलब्ध झाल्यास त्याच्या आरंभीं किंवा अंतीं, थोडेंबहुत कवि-चरित्र सांपडेल, असा अंदाज आहे. कवीच्या गुरूचें नांव व्यंकटेश होतें, हें पुढील तीन ओंव्यांवरून सिद्ध होतें:—

‘इतिश्री भारत भीष्मपर्वणी । कथा सुंदर परमपावनी ।
सद्गुरु **व्यंकटेश**कृपेंकरुनि । चंद्रात्मज कवि वदे ॥’

**भीष्मपर्व, अ० ३.**

‘सद्गुरु **व्यंकटेश** कृपा सुमती । चंद्रात्मज कवि वदे ॥

**भीष्मपर्व, अध्याय ७.**

‘सद्गुरु व्यंकटेश कृपासत्रीं । कथा परवडी अति विचित्री ।
वाढावयाची पायकी पात्रीं । चंद्रात्मजा दिधली ॥’

**भीष्मपर्व, अध्याय १.**

चंद्रात्मजाची सगळी कविता अद्याप अप्रकाशित आहे. कृष्णा व मलप्रभा यांच्या संगमावर असलेला संगमेश्वर महादेव, ही कवीची कुलदेवता होती, हें पुढील ओंव्यांवरून सिद्ध होतें:—

‘तो कुलदेव संगमेश्वर । आदिगुरु परात्पर ।
कपिलासंगमीं निरंतर । वास अनादि जयासी ॥
प्रत्यक्ष भासे कैलास परम । कृष्णा मलापहारीचा संगम ।
स्थान पवित्र उत्तमोत्तम । शिव सार्वभौम जे स्थळीं ॥’

चंद्रात्मजानें संपूर्ण महाभारतावर मराठी कविता केली असावी, असें पुढील ओंवीवरून दिसतें:—

आतां पांचवें उद्योगपर्व । कथारूपें अति अपूर्व ।
सज्जनाचें निज वैभव । न दिसे ठाव पातकां ॥ २९ ॥

उद्योगपर्व, अध्याय १ ला.

या ओंवींतील 'आतां' या शब्दावरून, पाहिलीं चार पर्वें आपण पूर्वीं लिहिलीं, असें ध्वनित करण्याचा कवीचा हेतु उघड दिसतो. आतां कवीच्या भीष्मपर्वांतील कांहीं सुंदर उतारे देऊन हा लेख संपवितों.

ग्रंथारंभींचें खालीं दिलेलें सद्गुरुस्तवन फार सुंदर आहे:—

ओंव्या.

नमो सद्गुरु पूर्णचंद्रा । अमृतमय बोधकला सांद्रा ।
ज्ञान मृगांक विज्ञानमुद्रा । देशिकेंद्रा तुज नमो ॥ १ ॥
तुझिया बोधसुधातुषारें । जे कां सच्छिष्यचकोरें ।
तुष्टता पावोनि अत्यादरें । सप्रेमभरें डुल्लती ॥ २ ॥
तया पुष्टिपणाचेनि भरें । मागील कृशत्व मागें सरे ।
प्रादेशिकत्वाचेनि विसरें । न समाय शरीर ब्रह्मांडीं ॥ ३ ॥
विकसती भावार्थ ह्र्त्कुमुदें । आनंदसिंधु पसरे मोदें ।
मी तूं दुथडी बुडोनि छंदें । सहजानंदें हेलावे ॥ ४ ॥
अनेक वृत्तीचिया सरिता । एकत्र जालिया समस्ता ।
सभाग्यौषधि पिकोनि त्वरिता । जाली धन्यता सत्पदीं ॥ ५ ॥
ऐसा अपार तुझा महिमा । न वर्णवे निगमागमा ।
माझिया मतीची काय गरिमा । वर्णावया बडिवार ॥ ६ ॥
आतां सद्गुरु करुणाघना । वर्षोनि कृपेचीया जीवना ।
वाचा वसुधेपासाव पूर्णा । कवनोपवना वाढवीं ॥ ७ ॥
पल्लवशाखा सुमनफळ । पदलालित्य साहित्य सबळ ।
शब्द गौल्यता अर्थ विमल । चतुर सज्जना योग्यता ॥ ८ ॥

होआवयालागीं सद्गुरुस्वामी । राहोनि माझिया हृदयसद्मीं ।
कविता रचोनि वाचा नेमीं । वदनीं सुगम सुखरूप ॥ ९ ॥
चतुर्विध वाचेचा तूं धणी । तूंचि तयांची जन्मखाणी ।
म्हणौनि करितुसें विनवणी । वरदपाणी तवांघ्रीं ॥ १० ॥
ऐसें प्रार्थणें जें साचार । तुझिया इच्छेचा उद्गार ।
वक्ता वदविता तूंचि सधर । पदकिंकर मी तुझा ॥ ११ ॥
मी तूं म्हणणें हेंचि वाव । परि हा सहज संज्ञेचा स्वभाव ।
आणिक एक असे प्रादुर्भाव । सुखानुभव या हेतु ॥ १२ ॥

वरील ओंव्यांपैकीं पहिल्या पांच ओंव्यांत चंद्राचें व पुढील तीन ओंव्यांत मेघाचें, अशीं जीं दोन रूपकें केलीं आहेत, तीं फार हृदयंगम आहेत. इतक्याच ओंव्यांवरून कवीची कवित्वशक्ति स्पष्ट दिसून येते. खालील सरस्वतीस्तवन पहाः—

वंदीन आतां सरस्वती । आदिमाया मूल प्रकृति ।
शारदारूपें श्रीभगवती । हंसवाहिनी जगदंबा ॥ १ ॥
ब्रह्मा विष्णु महेश्वर । तुझिया आज्ञेचे आज्ञाधर ।
उत्पत्ति लय स्थिति व्यवहार । करिती तुझेनि सामर्थ्यें ॥ २ ॥
परारूपें बीज कुसरी । पश्यंती वेषें सूक्ष्मांकुरी ।
मध्यमा पल्लवसुमनसंभारी । फलरूप वैखरी तुज नमो ॥ ३ ॥
वीणापुस्तकधरा अभयपाणी । स्वर्णचंपकपुष्पवर्णी ।
भालकुंकुम भुजंगवेणी । मुक्तमौक्तिकसुनासा ॥ ४ ॥
सीतोत्पलासन श्वेतांबरी । रत्नाभरणी प्रकाशलहरी ।
ज्ञानमुद्रा योगेश्वरी । चराचरीं व्यापक ॥ ५ ॥
तुझिया प्रकाशें सकल जन । वागती बोलती चातुर्यपणें ।
विषयेंद्रिय प्राण पंचीकरणें । तुझ्या नेमें वर्तती ॥ ६ ॥
तूं वेदांत मूलपीठिके । सप्तकोटी महामन्त्रनायके ।
कवितार्थमतिप्रदायके । भवांबुधितारके तुज नमो ॥ ७ ॥
ऐशी शारदा गुरुमाउली । कृपा कल्पलतिका भली ।
सुज्ञान कविता सुपक्क फलीं । सुरवाडली स्वानंदें ॥ ८ ॥

102512

यापरी वंदिली वाग्देवता । ती वंदें मी असें ग्रंथमाता ।
प्रसवेन सुशब्द साहित्यअर्था । उपचार पाइकी तूं करीं ॥ ९ ॥

**भीष्मपर्व, अध्याय १ ला.**

वरील उताऱ्यांतील शेवटल्या ओंवींतील कल्पना व मुक्तेश्वराच्या आदिपर्वांतील पुढील ओंवींतील कल्पना अगदीं सारखी आहे:—

'आतां कथेचें अन्नसत्र । घालीं विश्वामाजी पवित्र ।
तेथें स्वामिनी मी स्वतंत्र । पाइकी मात्र त्वां कीजे ॥'

चंद्रात्मज कवीच्या कवितेचा थाट मुक्तेश्वरी झोंकाचा दिसतो. इतकेंच नव्हे, तर कवीनें मुक्तेश्वरी रचनेचें अनुकरण करण्याचा बुद्धिपुरस्सर प्रयत्न केलेला दिसतो. भारतावर मराठी कविता करणारे नरहरि मोरेश्वर, शुभानंद व गोपाळ या कवींनींही मुक्तेश्वरांचें अनुकरण केलेलें स्पष्ट दिसतें. 'मुक्तेश्वरी कवितेसारखी कविता करण्याचें ध्येय' डोळ्यांपुढें ठेवणाऱ्या या कवींनीं मुक्तेश्वरांची कविता श्रेष्ठ दर्जाची आहे, हें अप्रत्यक्षपणें कबूल केल्यासारखेंच आहे; मग मुक्तेश्वरांनीं जो ग्रंथ मराठींत आणिला, त्याच ग्रंथावर कविता करण्याचें या कवींस काय प्रयोजन होतें बरें? असो.

खालील ओंव्यांतील श्रोतृस्तुति वाचनीय आहे:—

आतां श्रोते संतमहंत । जे कां सद्गुणविवेकभरित ।
सत्तासूर्यें प्रकाशवंत । मिरविती चातुर्यचित्कळे ॥ १ ॥
विकसती सप्रेम ऱ्हदयकमळें । सत्कर्में घडती सहज लीळें ।
जीवशिव चक्रवाकां होय संमेळ । भव मृगजळ दाविती ॥ २ ॥
वैराग्य सूर्यकांतीची स्फुलिंग । वाढोनि अग्नि प्रबळला चांग ।
कामकांताराचे सबळ डांग । दहती जयाच्या प्रतापें ॥ ३ ॥
बोधकिरणाचिये वृष्टी । अनुभवभूमिका पावोनि तुष्टी ।
स्वानंद पिकांची निबिड दाटी । ब्रह्मांड सृष्टि न समाये ॥ ४ ॥
ऐसे महाराज संत महंत । हरिती अज्ञान तमातें ।
ज्ञानप्रकाशें वागवित । तयां प्रणिपात साष्टांगीं ॥ ५ ॥

कीं साक्षात् परब्रह्ममूर्ति । सगुणरूपें विचरती क्षिती ।
जे कां भावार्थें शरण जाती । तयां उद्धरिती क्षणार्धें ॥ ६ ॥

युद्धारंभीं उभयपक्षांचीं सैन्यें रणांगणीं प्रविष्ट झाल्यावर, पांडव-सैन्याकडे पाहून, आपल्या साथीदारांस दुर्योधन म्हणतो:—

तयांप्रति बोले दुर्योधन । 'कुरु-भूमिकेंत उतरले दुर्जन[1] ।
दूत प्रेरिले बोलिले तेणें । युद्धा येणें म्हणोनी ॥ ७३ ॥
नंदकुमराचिया कुचेष्टानलें । पांडव पेटोनि बळाथिले ।
वधिल्या अपकीर्ति येतुसे प्रबल । यासी उपाय कवण करावा ? ॥ ७४ ॥
उदंड निकामी मिळाली सेना । सेनाधिपत्य धृष्टद्युम्ना ।
सर्वत्रांचिया संरक्षणा । जौंरदेवो करीतुसे ॥ ७५ ॥
धरोनि धरणीचा लंपट[3] । कलह कराया पातले नष्ट ।
कृतांतपरिवारातें संतुष्ट । करावया आले वाटतु ॥ ७६ ॥
भूआशेनें मेळवोनि भूमीश[4] । आम्हांसीं कदन करोनि विशेष ।
राज्याभिषेकाचा हव्यास । धरोनि आले वाटतु ॥ ७७ ॥
आपण वनवासी पामर । करों पाहती राज्याधिकार ।
पाहें पां अति आश्चर्यंतर । अनुपम त्यांचा पराक्रमू ! ॥ ७८ ॥

दुर्योधनासारख्या निसर्गदुष्ट मनुष्याच्या तोंडीं वरील भाषण फार समर्पक दिसतें, यांत संशय नाहीं. वरील भाषणानंतर कर्ण, दुर्योधन व द्रोणाचार्य यांचीं जीं भाषणें झालीं, तीं पुढें दिलीं आहेत:—

कर्ण म्हणे कृमिपरिवार[5] । रगडाया काय नवल थोर ।
तोंवि हे मिळणीचे[6] मिळाले नृपवर । तें तुज गहन कायसें ? ॥ ७९ ॥
आम्हीं असों तुझे वीरकेसरी । प्रत्येक प्रेरिजे अरि-गजावरी ।
तयासी कासया एकांत-कुसरी । आज्ञा पुरे पायांची ॥ ८० ॥
काय खलबल रिपुसैन्य-सागरू । किंवा भुजबळें मागें सारूं ।
शिरें तोडोनि राशी करूं । शूलीं भरूं उरले ते ॥ ८१ ॥
यापरी राजयाचें मनोगत । बोलोनि पराक्रमाची मात ।
वेगें आज्ञा-विडा दे दे म्हणत । रिपुदळातें वधावया ॥ ८२ ॥

१ पांडव. २ श्रीकृष्ण. ३ मोह. ४ राजेलोक. ५ पांडवसन्य. ६ खोगिर भरतीचे.

नृप वदे जीर्ण तृणाचळा । कासया योजिजे वज्रज्वाला ।
रिपुदळअलींतें वधावया प्रबळा । तूं पाहिजेस कासया ? ॥ ८३ ॥
स्वसैन्य बाहेर काढविजे । दूत प्रेरौनि रायातें पाचारिजे ।
परस्पर युद्ध मोडोनि वोजें । युद्धीं बुजाविजे रिपुदळा ॥ ८४ ॥
ऐकोनियां बाल्य भाषण । माथा तुकवोनि बोले द्रोण ।
राया, चतुरंग दळातें प्रेरून । समराभिजयो करावा ॥ ८५ ॥
ऐशा भ्रांतीच्या उद्योग-वासना । कैसें काय म्हणावें कवणा ? ।
कटकटा कौरवान्वय संपूर्णा । आजि संहरला वाटतु ॥ ८६ ॥
कर्णे कुशब्दाचिया शरजालें । पांडव तत्क्षणींच वधिले ।
आतां संग्रामाचे बोलें । कासया फोल बोलणें ? ॥ ९० ॥
मागें गंधर्वें बंधूंसहित । बांधोनि नेतां गगनपंथें ।
अर्जुनें सोडविला कीं कर्ण तेथें । वला नाश रहतें जिंकिले (?) ९१ ॥
तेथें कोणसा आहे बलवंत । कृष्ण तो गाईराखणाइत ।
पांडव वनफळें भक्षोनि जीवें जित । इतर भूभुज बळहीन ॥ ९२ ॥
तुझ्या देशाचे द्वारपाल । पाठवोनि पराभविजे परदळ ।
मग संतोषें राज्य प्रबळ । करोनि निर्वैर राहिजे ॥ ९३ ॥

दुर्योधनानें आपल्या सैन्याचें आधिपत्य भीष्मास दिलेलें पाहून कर्ण म्हणतो:—

मग कर्ण म्हणे जी कौरवेश्वरा । हा कौरवांतें पितामह खरा ।
धर्म-परिणत नीतिचा पुरा । पारि युद्धमात कासया ययातें ? ॥ १३५ ॥
गल्लगरल रायाचे महाभट । जे कां मांडलिक राजे वीरोद्भट ।
त्यांमाजी माने काय हा ज्येष्ठ । गतवयस्क म्हातारा ॥ १३६ ॥
शिथिल चर्म सुकले गाल । पडभोंवया मुखीं गळे लाळ ।
शरीर वांकलें जाला झोळ । केंस पिकले सर्वांगीं ॥ १३७ ॥
दंतस्थान जालें ओस । हनुवटी लागत नाकास ।
शिरकंपितातें समरोल्हास । म्हणोनि हांसे अतिशयें ॥ १३८ ॥

कर्णाच्या या पोरकटपणाबद्दल द्रोणाचार्यांनीं त्याची ताबडतोब कानउघाडणी केली:—

ऐकोनि कर्णाचें निष्ठुर वचन । कोपें खवळला म्हणे द्रोण ।
तूं काय त्याचिया समान । तो सुरनदी-नंदन प्रतापी ॥ १४१ ॥
तूं तुझा नेणतां विचार । समर्थातें बोलसी नीचोत्तर ।
तुज ऐसा जांबुवंत नव्हे पामर । तो महाप्रतापी बळियाढा ॥ १४२ ॥

**भीष्मपर्व, अध्याय १ ला.**

खालील धर्म-भीष्मसंवाद चिंतनीय आहे:--

मग रिपुदलाब्धि जातां पोहत । भीष्म बेट लागलें त्वरित ।
त्याच्या चरणीं पावोनि विश्रांत । बोलता जाला धर्मराजु ॥ ४९ ॥
म्हणे स्वामी करुणानिधि । तव कृपाछत्राच्या छायेमधीं ।
बसतां सक्रोध उष्ण बाधी । दाहसी वाटे आमुतें ॥ ५० ॥
तूंचि युद्धा सिद्धल्यावरी । मग अम्हांतें कैंची उरी ।
संग्राम सरेल कैसिया परी । पुढां निर्वाह कोणता ॥ ५१ ॥
आमुतें अवमानपर्वतपात । केला कौरवीं तुम्हां देखत ।
आम्हीं सत्य नेमाचा धरोनि पंथ । चाललों वडिलां मानेसें ॥ ५२ ॥
बाळकें अन्याय केलिया मारी । माता संरक्षी सर्वोपरी ।
अपराध नसतां कोपली जरी । पाळिता कोण तयातें ॥ ५३ ॥
आमुच्या वर्तणुकीचें फल । प्राण घ्यावयाचा कीं रक्षणें विमल ।
दोंमाजीं एक आज्ञा सबळ । द्यावी मातें कृपाळुवा ॥ ५४ ॥
सुहास्य-वदनें गंगासुत । म्हणे ऊठ ऊठ माझी ऐक मात ।
म्हणोनि मौळ उचलोनियां हातें । उठविला भूपाळकुलतिलकु ॥ ५५ ॥
म्हणे दुर्योधनें विक्रित केलें । म्हणोनि पराधीनत्व आलें ।
परसेवा लघुत्व प्राप्त जालें । काय आम्हां बोलविसी ॥ ५६ ॥
वडील हो कां अथवा सुजन । तपस्वी किंवा गर्विष्ठ पूर्ण ।
सर्वही द्रव्यस्थाचे सेविती चरण । असे वर्तमान या जगीं ॥ ५७ ॥
परभजकापाशीं कैंचा गुण । कैंची आढयता कैंचा मान ।
पुरुषाधमामाजीं अग्रणी । होऊनि ठेला धर्मजा ॥ ५८ ॥
कौरव-धनें घन-संसारीं । बद्ध जालों सर्वोपरी ।
तेणें गुणें दळकैवारी । होऊनि युद्धा ठाकलों ॥ ५९ ॥

चंद्रात्मजरुद्राची बहुतेक सगळी कविता या नमुन्याची आहे; शब्द-योजना समर्पक, प्रसाद भरपूर, भाषणें मार्मिक आणि वर्णनें सुंदर आहेत. युद्धासारख्या भयंकर आणीबाणीच्या वेळीं गीतेंतला उपदेश भगवंतांनीं अर्जुनास कां केला, याबद्दल आश्चर्य वाटून, जनमेजय राजा वैशंपायनास विचारतो:—

'प्रचंड संग्राम सूर्योदयीं । प्रबोध-चंद्राचें काज काई ? ।
अर्जुनातें श्रीकृष्णें पाहीं । बोधणें किंनिमित्त हें सांग'. ॥

नंतर, तिसऱ्या अध्यायांत श्रीमद्भगवद्गीतेचा सारांश सुमारें १५० ओंव्यांत दिला आहे. एकंदर ग्रंथ फार वाचनीय आहे. पण तो छापून प्रसिद्ध झालेला नसल्यामुळें, तो वाचण्याची शिफारस वाचकांस करतां येत नाहीं. आतांपर्यंत, अगदीं टाकाऊ व नीरस अशी किती तरी मराठी कविता छापून प्रसिद्ध झाली आहे, पण प्रस्तुत कवींच्या ग्रंथांसारखे सुंदर ग्रंथ अद्याप अप्रकाशितच आहेत, ही मोठ्या खेदाची गोष्ट होय.

---

# महीपति.

महिपतिच्या वाणीतें सेवुनि तरतात जेंवि गंगेतें ।
विषयांत रंगलें जें जनमानस सद्यशींच रंगे तें ॥ १ ॥

**मोरोपंत.**

सगळ्या महाराष्ट्र वाङ्मयांत कवि किंवा चरित्रकार या नात्यानें महीपतींची योग्यता फार मोठी आहे. जुन्या साधूंचीं किंवा कवींचीं चरित्रें लिहिणारास महीपतींच्या ग्रंथांचें साह्य घेतल्याशिवाय गत्यंतर नाहीं, इतकें सांगितलें म्हणजे त्यांच्या कर्तबगारीची कल्पना वाचकांस सहज होईल. आपल्यापूर्वीं सगळ्या हिंदुस्थानांत होऊन गेलेल्या साधुसंतांचीं चरित्रें महीपतींनीं आपल्या चार मोठ्या ग्रंथांत

इतक्या रसाळ वाणीनें वर्णिलीं आहेत कीं, अर्वाचीन पद्धतीचे चरित्रग्रंथ यापुढें कितीही बाहेर पडले, तरी महीपतींच्या ग्रंथांचें महत्त्व व वाचन यांस, मराठी भाषा अस्तित्वांत आहे तावत्कालपर्यंत, बिलकुल कमीपणा येण्याचा संभव नाहीं. महीपतींच्या चरित्र-विषयक ग्रंथांच्या-विशेषतः भक्तविजयाच्या—आजपर्यंत जितक्या आवृत्त्या निघाल्या, तितक्या गुरुचरित्रासारखे एकदोन ग्रंथ शिवाय करून दुसऱ्या कोणत्याही कवींच्या ग्रंथांच्या निघाल्या नसतील, किंबहुना महीपति आणि श्रीधर यांनीं सगळ्या सामान्य महाराष्ट्राच्या नैतिक आणि धार्मिक शिक्षणाची कायमची जबाबदारी आपल्यावर घेतली आहे, असें म्हटल्यास फारशी अतिशयोक्ति होईल असें वाटत नाहीं.

महीपतींचे तीर्थरूप दादोपंत कुळकर्णी हे मोगलांच्या पदरीं होते. तिकडून आपल्या वयाच्या ४० व्या वर्षी ते ताहराबादेस येऊन राहिले. तेथें ते स्नानसंध्या, देवदेवतार्चन करून कालक्षेप करीत असत. दर महिन्यास पंढरपूरची वारी करण्याचा त्यांचा क्रम होता; हा क्रम अगदीं निर्विघ्नपणें दोन तपें चालला. पोटीं पुत्र-संतान नसल्यामुळें आपल्या मागें वारी बंद पडेल, असा विचार मनांत येऊन, एकदां पंढरीस असतांना, श्रीविठ्ठलाच्या चरणांवर मस्तक ठेवून ते म्हणाले, 'वारी चालू राहण्याची व्यवस्था होईल तर बरें होईल.' पुढें रात्रौ ते देवळांतील एका ओरींत निजले असतां, असा चमत्कार झाला म्हणून सांगतात कीं, श्रीविठ्ठलांनीं स्वप्नांत त्यांच्या हातीं एक पेढा दिला व 'हा आपल्या पत्नीस खाण्यास द्या' असें त्यांस सांगितलें. दादोपंत जागे होऊन पाहतात, तों हातांत खरोखरच पेढा आहे! मग ते ताहराबादेस आले व तो पेढा त्यांनीं आपल्या पत्नीस खावयास दिला. लवकरच तिला गर्भ राहिला. दादोपंतांची साठी उलटल्यावर त्यांनीं हें

पुत्रमुख पाहिलें. ताहराबाद येथें महीपतींचा जन्म सन १७१५ (शके १६१७) त झाला. हे ऋग्वेदी वासिष्ठगोत्री ब्राह्मण, आडनांव कांबळे. महीपति रूपानें फार सुंदर होते, तसेच बुद्धीनेंही चलाख होते. त्यांचें बाळपणचें खेळणें म्हणजे भजन-पूजन. दगडाच्या चिपळ्या घेऊन ते भजन करीत असत. ते पांच वर्षांचे झाले तेव्हांच त्यांनीं पंढपुरास जाण्याचा हट्ट घेतला. वडील अशक्त झाले होते, म्हणून त्यांनीं आपल्या विश्वासाचा एक कासार व दोन ब्राह्मण बरोबर देऊन महीपतीस पंढरपुरास पाठविलें, तेथें त्यांनीं श्रीपांडुरंगाचें दर्शन घेतलें व क्षेत्रप्रदक्षिणा केली.

महीपतींचें शिक्षण बरेंच झालें होतें. त्यांनीं लिहिलेले ग्रंथ उपलब्ध झाले आहेत, त्यांतील त्यांचें हस्ताक्षर चांगलें आहे. महीपतींस संस्कृत भाषेचें ज्ञान चांगलें असावें असें त्यांच्या ग्रंथांवरून दिसतें. मराठी भाषेचें ज्ञान तर त्यांस चांगलें असून, त्यांच्या पूर्वीं होऊन गेलेल्या बहुतेक मराठी कवींची बहुतेक सगळी मराठी कविता त्यांनीं लक्षपूर्वक वाचली होती, हें त्यांचे ग्रंथच सांगतात. मराठीशिवाय, गुजराथी, कानडी व हिंदी या भाषांचें ज्ञान महीपतींस होतें. महीपतींचा बांधा सुदृढ होता. आपल्या वयाच्या सोळाव्या वर्षींच ते कुळकर्णाचें काम करूं लागले. ताहराबादचें कुळकर्ण व जोशीपणा महीपतींकडे होता. ताहराबाद हा गांव एका मुसलमानास जहागीर मिळाला होता. त्या मुसलमानाच्या कचेरींत महिपतींस नित्य जावें लागत असे. एके दिवशीं कचेरींतून येऊन स्नान करून ते देवपूजेस बसले असतां, जहागिरदाराचा शिपाई त्यांस बोलावण्यास आला. 'देवपूजा आटोपतांच येतों.' असें महीपतींनीं त्यास सांगितलें, इतक्यांत आणखी दोन बोलावणीं आलीं. तेव्हां तो यवन शिपाई त्यांस कांहीं उणे-अधिक शब्द बोलला. तें ऐकून महीपतींस फार वाईट वाटलें. पूजा आटोपल्या-

वर ते जहागिरदाराच्या वाड्यांत गेले व तिकडचें काम संपवून घरीं आल्यावर, कानास लेखणी होती, ती देवापुढें ठेवून त्यांनीं शपथ वाहिली कीं, 'आजपासून गांवकामांत लेखणी हातीं धरणार नाहीं' ही शपथ त्यांनीं व त्यांच्या वंशजांनीं हा कालपावेतों पाळली आहे व सात पिढ्यांपर्यंत ती तशीच पाळली जावयाची आहे.

महीपतिमहाराजांस विठ्ठलबोवा व नारायणबोवा असे दोन पुत्र होते. विठ्ठलबोवा हे गवयी असून शेवटच्या बाजीरावांचे आश्रित होते. ते पुण्यास रहात असत. महीपतींचे वंशज हल्लीं ताहराबादेस आहेत, ते कीर्तन फार चांगलें करितात. महीपतींचा वंशवृक्ष येणेंप्रमाणें:—




मोरोपंत, अमृतराय, सोहिरोबा आंबिये, शिवदिन केसरी, मध्वमुनीश्वर, रामजोशी, देवनाथ, नरहरि मोरेश्वर हे सगळे संत व कवि महिपतींचे समकालीन होत. मात्र यांपैकीं कोणाकोणाशीं

त्याचा परिचय होता, यासंबंधाची माहिती मुळींच उपलब्ध नाहीं. मोरोपंत महीपतींहून १४ वर्षांनीं लहान होते.

महिपतींच्या पत्नीचें नांव काय होतें, हें कोठेंही नमूद केलेलें आढळत नाहीं. दादोपंतांचा वृद्धापकाल झाल्यामुळें त्यांची वारी महिपतींनीं पुढें चालविली. पंढरपूर, श्रीपांडुरंग आणि वारकरी साधुसंत यांच्यासंबंधानें तुकारामबुवांच्या पश्चात् महिपतींनीं जितकें वाङ्मय लिहिलें, तितकें दुसऱ्या कोणीं लिहिलें नाहीं. तुकारामबुवा आपल्या हयातींत कधीं पंढरपुरास गेले होते कीं नव्हते याचा कित्येकांस संशय[1] आहे, पण महिपतींची वारी कधीं चुकली नाहीं. त्यांच्या वृद्धापकाळीं ते एकदां पंढरपुरास जात असतां वाटेंत घोड्यावरून पडले, तेव्हां त्यांच्या इष्टमित्रांनीं त्यांस परत घरीं आणलें, त्यावेळीं त्यांनीं पांडुरंगास एक लहानसें ओवीबद्ध पत्र पाठविलें, तें याच लेखांत पुढें दिलें आहे.

महीपतींस तुकाराममहाराजांनीं स्वप्नांत दृष्टांत दिला कीं, 'नामदेवांचा शतकोटी अभंग करण्याचा*संकल्प माझ्या हातून पुरा झाला; आतां संतचरित्रांचें वर्णन तुमच्या मुखानें व्हावें.' इतकें सांगून तुकारामबुवांनीं आपला वरदहस्त महीपतींच्या मस्तकावर ठेविला व त्या दिवसापासून त्यांस काव्यस्फूर्ति झाली; अशी आख्यायिका आहे, व संतलीलामृताच्या प्रथमोऽध्यायांतील पुढील ओंव्यांवरून ती खरी असावी असें वाटतें. महीपति म्हणतात:—

---

१. यासंबंधाचें विवेचन तुकारामबुवांवरील निबंधांत करूं.

* तुकारामबुवा म्हणतात:—

अभंग

"चार कोटी एक लक्षाचें शेवट । चौतीस सहस्र स्पष्ट सांगितले ॥"

याशिवाय त्यांच्या एका अभंगांत 'नामयाची बाकी फेडियली' असे स्पष्ट उद्गार आहेत.

' ज्यानें मस्तकीं ठेविला अभय कर । दुस्तर भवाब्धि केला पार ।
तो तुकाराम सद्गुरू वैष्णववीर । ग्रंथारंभीं नमस्कार तयासी ॥ १ ॥
मृत्युलोकीं दाविली अघटित करणी । देहासमवेत गेले वैकुंठभुवनीं ।
अद्यापि शुद्ध भाव देखोनी । देती स्वप्नीं उपदेश ॥ २ ॥

या ओंव्यांत स्वतः महीपतींनीं जी गोष्ट स्पष्टपणें नमूद केली आहे, तिच्या सत्यासत्यत्वासंबंधानें शंका घेण्याचें कांहीं कारण आहे, असें मला वाटत नाहीं. ज्या जडवादी लोकांस असल्या गोष्टी खोट्या आणि अशक्य वाटतात, त्यांनीं 'ज्या गोष्टीचा मनुष्यास निदिध्यास लागला असेल, ती गोष्ट स्वप्नांत त्यास दिसते.' या नियमाप्रमाणें वरील चमत्काराचा उलगडा करावा म्हणजे झालें. तुकारामबुवांस महिपतीं-सारखा प्रेमळ शिष्य चांगला शोभतो यांत संशय नाहीं. महीपतींनीं शेंकडों संतांचीं चरित्रें लिहिलीं आहेत; परंतु त्यांनीं लिहिलेल्या तुकारामचरित्राइतकें जुनें सुंदर चरित्र मराठी भाषेंत दुसरें नाहीं. महिपतींचा पहिला ग्रंथ भक्तविजय हा शके १६८४ या वर्षी पूर्ण झाला. त्या वेळीं त्यांचें वय ३७ वर्षांचें होतें, अर्थात् या पूर्वी थोडे दिवस महीपतींस तुकारामबुवांचा दृष्टांत झाला असावा. तुकारामबुवा हेच आपले गुरु होत, असें महीपतींनीं आपल्या इतर ग्रंथांतही सांगितलें आहेः—

' नमूं सद्गुरु तुकाराम । जेणें निरसिला भवभ्रम ।
आपुले नामीं देऊनि प्रेम । भवबंधन निरासिलें ॥ ३ ॥

भक्तविजय, अध्याय १ ला.

सद्गुरु तुकाराम समर्थ । अंतरसाक्ष चैतन्यनाथ ।
तेणें होवोनि हृदयस्थ । आठव मातें दिधला ॥ १०९ ॥

संतलीलामृत, अध्याय ३५.

---

१. या चरित्राच्या सौंदर्यासंबंधानें कोणास शंका असेल, तर त्यांनीं कृपा करून तें एकवार वाचून पहावें अशी शिफारस आहे.

सद्गुरु तुकाराम समर्थ । तयासि माझा प्रणिपात ।
ज्यानें अवतार घेवोनि मृत्युलोकांत । दाविला भक्तिपंथ साधकां ॥ १४॥

× × × × ×

जो भक्तिज्ञान वैराग्यपुतळा । ज्याचे अंगीं अनंत कळा ।
तो सद्गुरु तुकाराम आम्हांसि जोडला । स्वप्नीं दिधला उपदेश ॥ २० ॥
मी तरी सर्वां विषयीं हीन । ऐसें साक्ष देतसे मन ।
परी कृपा केली कवण्या गुणें । त्याचें कारण तो जाणे ॥ २१ ॥

भक्तलीलामृत, अध्याय १ ला.

या ओंव्यांत 'स्वप्नीं दिधला उपदेश' असें महीपतींनीं स्पष्ट म्हटलें असून 'सद्गुरुकृपेचेनि वैभवें । ज्ञान अज्ञान मेलें सर्व ।' असे उद्गार तुकारामबुवांस उद्देशून काढले आहेत. तेव्हां आतां या बाबतींत निष्कारण शंका घेण्याचें कांहीं प्रयोजन आहे असें मला वाटत नाहीं. स्वतः महीपतीच एके ठिकाणीं म्हणतातः—

कोणी विकल्पी जे विचक्षण । ते म्हणोत हें कवित्व नूतन ॥
आम्हांसी न वाटे प्रमाण । न करूं श्रवण सर्वथा ॥ ८० ॥
एवं भावार्थीया मागें विकल्पी नर । लागले असती परंपर ॥

असो. महीपतींचा पहिला ग्रंथ भक्तविजय होय हें पूर्वीं सांगितलेंच आहे. महीपतींनीं लिहिलेली एकंदर कविता येणेंप्रमाणें:—

| | ओंव्या | रचनाशक. |
|---|---|---|
| १ भक्तविजय, अध्याय ५७, | ९९१६ | १६८४ |
| २ संतलीलामृत, अध्याय ३५, | ५२५९ | १६८९ |
| ३ भक्तलीलामृत, अध्याय ५१, | १०७९४ | १६९६ |
| ४ संतविजय, अध्याय २६, (अपूर्ण) | ४६२८ | ” |
| ५ कथासारामृत, अध्याय ३६, | ७२०० | १६८७ |
| ६ पंढरीमाहात्म्य, अध्याय १२, | | |

| | | |
|---|---|---|
| ७ | अनंतव्रतकथा | १८६ |
| ८ | दत्तात्रेयजन्म | ११२ |
| ९ | तुळसीमाहात्म्य, अध्याय ५ | ७६३ |
| १० | गणेशपुराणाचा कांहीं भाग अ. ४ | ३०४ |
| ११ | पांडुरंगस्तोत्र | १०८ |
| १२ | मुक्ताभरण व्रत | १०१ |
| १३ | ऋषिपंचमी व्रत | १४२ |
| १४ | अपराधनिवेदन स्तोत्र | १०१ |
| १५ | अभंग व पदें स्फुट. | |

या एकंदर ग्रंथांची पद्यसंख्या सुमारें ४०,००० होईल. भक्तविजयाच्या शेवटीं समाप्तिकाल दिला आहे तो येणेंप्रमाणें:—

"शके सोळाशें चौऱ्यायशीं । चित्रभानु संवत्सरासी ॥
वैशाख वद्य द्वादशीसी । ग्रंथ सिद्धीसी पावला ॥

भक्तविजयांत ज्या संतकथा वर्णन करावयाच्या राहिल्या, त्यांचा संग्रह करावा म्हणून महीपतींनीं संतलीलामृत हा दुसरा ग्रंथ लिहिला, हें पुढील ओंव्यावरून स्पष्ट दिसतें:—

"आतां कलियुगामाजीं निश्चिती । बौद्ध अवतार धरी श्रीपती ॥
तरी अज्ञानी जन कैसे तरती । मग अवतार संतीं घेतले ॥ ६२ ॥
त्यांचें चरित्र यथापद्धति । तें वर्णिलें भक्तविजय ग्रंथीं ॥
परी ते कदा संपूर्ण न होती । आस्था चित्तीं दुणावे ॥ ६३ ॥
असंख्य ईश्वराच्या विभूति । संख्या करितां न पुरेचि मती ।
अंगांचे रोम आहेत किती । ते न गणवती सर्वथा ॥ ६४ ॥
परी एक सांगतों आपुलें मत । भक्तस्तवनीं रमलें चित्त ॥
यालागीं संतलीलामृत । दुसरा ग्रंथ आरंभिला ॥ ६५ ॥
भक्तविजयांत राहिलीं चरित्रें । तीं येथें ऐकावीं सविस्तर ॥
बुद्धीचा दाता रुक्मिणीवर । सर्व भार तयावरी ॥ ६६ ॥

या ओंव्यांत भक्तविजयानंतर संतलीलामृत लिहिलें असें स्पष्ट म्हटलें आहे, पण १८८६ सालीं रा० मारुती जनार्दन दांडेकर यांनीं प्रसिद्ध केलेल्या संतलीलामृताच्या शेवटीं ग्रंथसमाप्तीचा काल—

'शके सोळाशें एकूणऐशीं । सर्वजित नाम संवत्सरासी ।
फाल्गुन शुद्ध चतुर्थीसी । ग्रंथ सिद्धीसी पावला ॥

असा दिला आहे. तो वरील गोष्टीशीं जुळत नाहीं. कारण पहिला ग्रंथ १६८४ त व दुसरा १६७९ त लिहिला जाणें शक्य नाहीं. अर्थात् येथें कांहीं तरी चुकी झाली असली पाहिजे हें उघड आहे. दुसरें असें कीं, शके १६७९ त सर्वजित् संवत्सर येत नाहीं. शके १६८९ त येतो; तेव्हां येथें शके १६८९ पाहिजे हें स्पष्टच झालें. पण वरील ओंवीच्या यमकाकडे पाहिलें म्हणजे 'एकूणऐशी' च्या ठिकाणीं 'एकूणनव्वद' असा शब्द घालतांच येत नाहीं. यावरून ही चुकी खुद्द महीपतींकडूनच विस्मृतीमुळें घडली असावी, असें म्हणणें भाग आहे. निरनिराळ्या चार गृहस्थांनीं प्रसिद्ध केलेल्या संतलीलामृताच्या चार प्रति पाहिल्या, त्या सर्वांत वरील ओंवीच आढळते, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. असो. स्वतः महीपतींनीं दिलेला ग्रंथरचनाक्रम व शके १६८९ त सर्वजित संवत्सर येतो, या गोष्टी लक्ष्यांत घेतां संतलीलामृताचा रचनाकाल शके १६७९ नसून शके १६८९ होय, असें स्पष्ट विधान करण्यास कांहीं हरकत नाहीं. संतलीलामृतानंतर महीपतींनीं भक्तलीलामृत ग्रंथ लिहिला, त्याच्या प्रथमोऽध्यायांत ते म्हणतातः—

त्यांचीं चरित्रें व्हावया प्रख्यात । युक्ति केली पंढरिनाथें ॥
मज पुढें करूनि निमित्त । श्रीभक्तविजय ग्रंथ वदविला ॥
दुसरा संतलीलामृतसार । त्यांतही चरित्रें वर्णिलीं फार ॥
परी आणिक कथा राहिल्या अपार । मग रुक्मिणीवरें आज्ञापिलें ॥
म्हणोनि भक्तलीलामृत जाण । ग्रंथ आरंभिला दुसऱ्यानें ॥

संतविजय ग्रंथ अपूर्ण असून, त्याचे जे २६ अध्याय उपलब्ध आहेत, त्यांपैकीं पहिल्या २५ अध्यायांत श्रीरामदासस्वामींचें व २६ व्या अध्यायांत बाबाजीबावा अरणगांवकर यांचें चरित्र दिलें आहे. यावरून हा ग्रंथ महीपतिकृत नसून, कोणी तरी रामदास-संप्रदायी गृहस्थानें तो महिपतीच्या नांवावर दडपून दिला असावा, अशा अर्थाचा एक लेख डॉ० प्रभाकर रामकृष्ण भांडारकर यांनीं 'पुण्यकपट' या सदराखालीं विविधज्ञानविस्तार मासिक पुस्तकांत प्रसिद्ध केला आहे, पण त्यांत कांहीं अर्थ नाहीं. कारण खुद्द महीपतींनीं लिहिलेला संतविजय त्यांच्या वंशजांपाशीं असून तो अपूर्ण आहे, असें त्यांचें म्हणणें आहे व उपलब्ध असलेल्या संतविजयाचे शेवटीं ज्या अर्थीं फलश्रुति व ग्रंथसमाप्तिकालनिर्देश नाहीं, त्या अर्थीं सदर ग्रंथ पूर्ण होण्यापूर्वींच महीपति स्वर्गस्थ झाले असावे असें वाटतें. भक्तविजयांत रामदासस्वामींचें थोडेंसें चरित्र महिपतींनीं दिलें आहे. त्यानंतर जसजशी अधिक माहिती मिळत गेली, तसतसे त्यांनीं पुढील तीन संतचरित्रविषयक ग्रंथ लिहिले व रामदासांचें विस्तृत चरित्र मागाहून मिळालें त्याचा समावेश त्यांनीं संतविजयांत केला. पुढील ओव्या पहा:—

"आतां ऐका श्रोते चतुर । रामदास मारुती अवतार ॥
करावया विश्वोद्धार । प्रगटे साचार भूमंडळीं ॥ १३ ॥
त्याचें चरित्र यथामति । वर्णिलें श्रीभक्तविजय ग्रंथीं ॥
परी ते संकलित कथा निश्चितीं । विस्तार स्फूर्ति न केली ॥ १४ ॥

संतविजय, अ० १

महीपतींच्या रचनेची ओळख संतविजयाच्या साडेचार हजार ओंव्यांत डॉ० प्रभाकरपंत भांडारकर यांस पटली नाहीं हें मोठें आश्चर्य आहे. असो. रा० रा० विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांनीं सरस्वतीमंदिरांत 'नाभाजीनें व महीपतीनें वर्णिलेले संत' या सदरा-

खालीं जी उपयुक्त यादी प्रसिद्ध केली आहे, तिच्या आरंभीं त्यांनीं महीपतींच्या ग्रंथांचा जो क्रम दिला आहे, त्यांत भक्तविजयानंतर संतविजय झाला असें त्यांनीं म्हटलें आहे; पण हें विधान प्रमाणशुद्ध नाहीं, हें खुद्द महीपतींनीं दिलेल्या वरील क्रमावरून उघड होतें. वरील ग्रंथांशिवाय महीपतींनीं 'सारांश ज्ञानेश्वरी' नामक एक ग्रंथ तयार केला आहे. त्यांत ज्ञानेश्वरींतल्या १४३१ निवडक ओंव्या दिल्या आहेत. ओंव्यांची निवड करतांना 'भक्ति' या विषयावर महीपतींनीं विशेष कटाक्ष ठेवला होता, असें त्या ओंव्यांवरून दिसतें. ज्ञानेश्वरीचा योगमार्गविषयक सहावा अध्याय त्यांनीं अजिबाद गाळला आहे व भक्तिविषयक बारावा अध्याय समग्र उतरून घेतला आहे.

महीपति स्वभावानें फार नम्र, प्रेमळ आणि मोठे बहुश्रुत होते. सगुणोपासनेकडेच त्यांचा ओढा विशेष दिसतो. ते कट्टे वैष्णव—तुकारामबुवांचे पुर्ण अनुयायी होते. अहिंसा, भूतदया आणि वसुधैव कुटुंबकत्व हे गुण त्यांच्या अंगीं पूर्णत्वानें वास करीत होते. त्यांच्या वेळीं महाराष्ट्रांत मोठा दुष्काळ पडला होता, त्यास 'करंड्याचें साल' असें म्हणतात. त्या दुष्कळांत महीपतींनीं आपल्या घरावर तुळसीपत्र ठेवून तें गरिबांकडून लुटविलें! ती हकीकत गांवच्या जहागीरदारास समजतांच त्यानें पुष्कळ गाड्या भरून साहित्य पाठविलें, परंतु त्याचा स्वीकार न करितां महीपतींनीं आपला चरितार्थ भिक्षेवर चालविला. ह्याप्रमाणें प्रत्येक तिसऱ्या वर्षी आपलें घर लुटविण्याचा क्रम त्यांनीं चालू ठेविला. पुढें लोकांनीं सांगितलें कीं 'हा आपला क्रम आपल्या मागें चालणें कठीण आहे, यासाठीं जें निरंतर चालेल तें करावें.' मग महीपतींनीं ताहराबाद येथें श्रीविठ्ठलाचें मंदिर अयाचित वृत्तीनें बांधिलें व तेथें आषाढ वद्य दशमीपासून अमावास्येपर्यंत पांडुरंगाचा उत्सव करण्याची चाल सुरू केली, ती अद्याप चालू आहे.

महीपतींनीं आपले ग्रंथ फार शोधपूर्वक लिहिले आहेत. ऐतिहासिक चरित्राविषयक ग्रंथ लिहिण्यासाठीं जो शोध आणि खटाटोप करणें अवश्य आहे, तो सगळा महीपतींनीं केला होता. पुष्कळ संतांच्या गांवीं जाऊन, त्यांच्या वंशजांस भेटून व त्यांच्या घरचीं दफ्तरें चाळून जी माहिती उपलब्ध झाली तिचा समावेश त्यांनीं आपल्या ग्रंथांत केला आहे. पाश्चात्य वाङ्मयाच्या परिचयामुळें जी ऐतिहासिक दृष्टि हल्लीं आम्हांस प्राप्त झाली आहे, ती महीपतींच्या अंगीं अल्पांशानें तरी होती, असें म्हणण्यास पुष्कळ पुरावा आहे. चमत्कारादिकांच्या गोष्टी त्यांनीं आपल्या ग्रंथांत दिल्या आहेत, इतक्याचमुळें त्यांच्या ग्रंथांची योग्यता बिलकुल कमी होत नाहीं. चमत्कारांवर विश्वास ठेवण्याचा तो काल होता, इतकेंच नव्हे तर खुद्द महीपतींनीं निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या प्रकारचे पांच दहा चमत्कार केले, अशीही प्रसिद्धि आहे. अशा स्थितींत त्यांनीं इतर साधूंनीं केलेल्या चमत्कारांच्या ज्या गोष्टी ऐकल्या त्या सगळ्या आपल्या ग्रंथांत दाखल कराव्या, यांत कांहीं मोठेंसें आश्चर्य नाहीं.

महीपतींची वाणी फार रसाळ, प्रासादिक आणि साधी आहे. त्यांच्या ग्रंथांत भक्तिरस नुसता उचंबळून राहिला आहे. वर्णनें सुंदर आणि उपमा तर अत्यंत समर्पक आणि हृदयंगम आहेत. मात्र कोठें कोठें त्यांचा थोडासा अतिरेक झालेला आढळतो. महीपतींच्या ग्रंथांनीं महाराष्ट्रांत फार मोठें धर्मकार्य केलें आहे व त्यांची बरोबरी इतर ग्रंथांकडून होणार नाहीं. मुलांमुलींस व तरुण स्त्रियांस धर्मशिक्षण व नीतिशिक्षण देण्यास महीपतींचे ग्रंथ सर्वतोपरी समर्थ आहेत, यांत संशय नाहीं व या त्यांच्या सामर्थ्याचा फायदा महाराष्ट्रानें आजपर्यंत चांगला करून घेतला आहे. महीपतींच्या कवितेंत मुक्तेश्वराची उच्च कल्पनाशक्ति नाहीं, पण तींत खरें कवित्व असून ती फार प्रेमळ असल्यामुळें तिची लोकप्रियता आजपर्यंत जशी राहिली,

तशीच ती पुढेंही अगदीं अबाधित राहणार यांत संशय नाहीं. आपल्या पूर्वीं होऊन गेलेल्या नाभाजी व उद्धवचिद्घन या संतचरित्रकारांनीं मिळवून ठेवलेली माहिती व स्वतः परिश्रम करून मिळविलेली माहिती यांचा यथास्थित उपयोग करून महीपतींनीं संतचरित्रविषयक जे मोठे चार ग्रंथ निर्माण केले, त्यांचें स्थान महाराष्ट्रशारदामंदिरांत जसें अगदीं स्वतंत्र आहे, तसेंच महाराष्ट्रकविमंडळांत महीपतींचेंही स्थान अगदीं स्वतंत्र आहे. त्यांच्या कथासारामृत ग्रंथांत श्रीविष्णूच्या निरनिराळ्या व्रतांच्या सुरस कथा सुंदर भाषेंत वर्णिल्या आहेत. महीपतींच्या ओंव्यांप्रमाणेंच त्यांचीं पदें व अभंग हीं फार सुरस आहेत. कांहीं संतांचीं चरित्रें त्यांनीं अभंगवृत्तांत गायिलीं आहेत, तीं येणेंप्रमाणें:—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| श्रीनामदेवचरित्र | अभंग | ६२ | जगमित्रनागाचरित्र | अभंग | ६२ |
| हरिपाळचरित्र | ,, | ९८ | माणकोजी बोधलेचरित्र | ,, | ६७ |
| कमालचरित्र | ,, | ६७ | संतोबा पवारचरित्र | ,, | १०२ |
| नरसिंहमेहताचरित्र | ,, | ५२ | चोखामेळाचरित्र | ,, | ४७ |
| राकाकुंभारचरित्र | ,, | ४७ | | | |

एकदां ओंवीवृत्तांत विस्तारानें वर्णिलेलीं संतचरित्रें त्यांनीं पुनः अभंगवृत्तांत वर्णिलीं आहेत यावरूनच त्यांचें संतचरित्रविषयक प्रेम उत्तम प्रकारें व्यक्त होतें. वरील ग्रंथांशिवाय आणखी एका साधूच्या चरित्रावर त्यांनीं एक स्वतंत्र ग्रंथ लिहिला असून तो खानदेशांत एका गृहस्थापाशीं आहे असें समजतें. महीपतींनीं चारचरणी करुणापर अभंग लिहिले आहेत ते, आरत्या, पदें, इतर फुटकळ अभंग, गणेशचरित्र व वरील अभंगबद्ध संतचरित्रें, इतकी त्यांची कविता अद्याप अप्रकाशित आहे. आपल्या प्रत्येक मोठ्या ग्रंथाच्या शेवटीं, त्या ग्रंथांतील प्रत्येक अध्यायांत कोणता कथाभाग आहे, याची अनुक्रमणिका महीपतींनीं दिलेली असून, ती त्यांच्या सशास्त्र ग्रंथ-

रचना-पद्धतीची चांगली निदर्शक आहे. नवनीतांत व आणखी एक दोन ठिकाणीं महीपतींच्या ग्रंथांची यादी दिली आहे, तींत 'गणेश-पुराण' ग्रंथाचा समावेश केला आहे, पण गणेशपुराणावर महीपतींनी लिहिलेला समग्र ग्रंथ नसून, त्या पुराणांतील फक्त 'गजानन चरित्र' मात्र त्यांनीं मराठींत लिहिलें आहे. या ग्रंथाचे अध्याय ४ व ओंव्या ३०४ आहेत. इतर फुटकळ प्रकरणांपैकींही बरींच प्रकरणें अद्याप अप्रकाशित आहेत.

आपण जें काय लिहित आहोंत तें पांडुरंगाच्या कृपेनें लिहीत आहोंत, असा महीपतींचा ठाम समज होता, यामुळें स्वतःच्या कर्तब-गारीसंबंधानें ज्यांत थोडा तरी अहंभाव व्यक्त झाला आहे, असा एक शब्दही त्यांच्या कवितेंत आढळत नाहीं. श्रीधरांचीही समजूत अशीच होती; त्यांनींही, आपल्या पांडवप्रतापाच्या शेवटीं स्वर्गारोहण पर्व का दिलें नाहीं, हें सांगतांना, 'पांडुरंगानें आपणास येथेंच ग्रंथ पुरा कर म्हणून सांगितलें' असें स्पष्ट म्हटलें आहे. आपण कांहीं करीत नसून, जें काय आपल्या हातून घडतें तें सगळें भगवत्प्रेरणेनें घडतें, अशा समजुतीनें कार्यप्रवृत्त होणें ही ग्रंथकर्तृत्वाची उच्च पायरी होय; खरा कर्मसंन्यासयोग तो हाच होय, यांत संशय नाहीं.

महीपतींनीं आपल्या हातानें लिहिलेले जे ग्रंथ त्यांच्या वंशजां-पाशीं आहेत, त्यांतील कांहीं शब्दांचीं रूपें व्याकरणदृष्ट्या अशुद्ध आहेत. पण हा दोष कवीचा नसून, त्या शब्दांचीं रूपें लिहिण्याची त्या काळची पद्धतीच तशी होती. धुळें येथील सत्कार्योत्तेजक सभेनें प्रसिद्ध केलेला दासबोध ज्यांनीं वाचला असेल, त्यांस या विधानाची सत्यता पटल्याशिवाय राहणार नाहीं.

महीपति बाबा शके १७१२ (सन १७९०) श्रावण वद्य १२ या दिवशीं समाधिस्थ झाले. त्यावेळीं त्यांचें वय ७५ वर्षांचें होतें.

महाराष्ट्र कविवर्य "मोरोपंत" यांनीं महीपतींचे ग्रंथ वाचले होते, पण त्या उभयतांची भेट कधीं झाली होती कीं नाहीं, त्यांचा परस्पर पत्रव्यवहार होता कीं नाहीं, हें अद्याप समजलें नाहीं. परंतु महीपति बावांचे पुत्र विठोबा गोसावी यांचीं दोनचार पत्रें पंतांस आलीं आहेत, त्यांवरून पंत व विठोबा यांचा मात्र स्नेहसंबंध निर्विवाद ठरतो. हे विठोबा गोसावी बाबा पाध्ये यांजजवळ विद्याभ्यासास राहिले होते. बाबांनींच त्यांची शिफारस मोरोपंतांकडे करून परस्परांची ओळख करून दिली. बाबा पंतांस एका पत्रांत लिहितात "हरिदास राजेश्री बिठोबा गोसावी ताहराबादकर यांहीं आपणास पुस्तकांविषयीं लिहिलें. आपण ग्रंथ पाठवून द्यावे. ते प्रति करून आपणास शीघ्र परत करतील." यापुढें मोरोपंत व विठोबा गोसावी यांचा संबंध जडला व तो उत्तरोत्तर दृढच झाला. बिठोबा गोसावी यांची पंतांचे ठायीं मोठी पूज्यबुद्धि होती, असें त्यांनीं पंतांस पाठविलेल्या एका पत्रावरून सिद्ध होतें. ( रा. पांगारकर-कृत मोरोपंतचरित्र, पृष्ठ १४१ पहा ) पंतांनीं आपल्या सन्मणिमालेंत महीपतींचा उल्लेख केलेला नाहीं. पुढें विठोबा ताहराबादकर यांच्या सूचनेवरून त्यांनीं 'महीपतिस्तुति' नामक एक लहानसें प्रकरण लिहिलें, तें येणेंप्रमाणें:—

आर्या.

श्रीहरिभक्तजनांचीं श्रीहरिभक्तिरससत्सुधाभरितें ।
चरितें गातां जेणें आयुष्य क्षण पडों दिलें न रितें ॥ १ ॥
हरिभक्तविजय नामें रचिला सद्ग्रंथ दोष साराया ।
वाराया तापातें प्राणी भवसागरांत ताराया ॥ २ ॥
त्या माहिपतितें पाहुनि ऐकुनि सचित्त कां न लोभावें ।
शोभावें यश ज्याचें चिर नमिला विष्णुदास तो भावें ॥ ३ ॥
ज्याचा ग्रंथ हरिजनां सेव्य चकोरां जसा सदा इंदु ।
जो पसरला जगांत स्नेहाचा सत्सरीं जसा बिंदु ॥ ४ ॥

सत्य तुकारामाचा या महिपतिवरि वरप्रसाद असे ।
तदनुग्रहाविणें हे निघतिल उद्गार सार काय असे ॥ ५ ॥
साधूंचें यश गाया येणें देऊनियां सुभा केला ।
निःसंशय ताराया जड महिपति विठ्ठलें उभा केला ॥ ६ ॥
महिपतिच्या वाणीतें सेवुनि तरतात जेविं गंगेतें ।
विषयांत रंगलें जें जनमानस सद्यशींच रंगे तें ॥ ७ ॥
ज्ञानोबांची जैशी एकोबाची जशी सुधा वाणी ।
कीं मुक्तेश्वर कविची, महिपतिची सेविती तशी प्राणी ॥ ८ ॥
महिपतिचा सुत विठ्ठल त्याला श्रीपांडुरंग आठव दे ।
तत्प्रेरणेकरुनियां आर्या आर्यादरार्थ आठ वदे ॥ ९ ॥
स्वस्तुति केली म्हणवुनि महिपति हरिभक्त न विटो बा ।
मज तों वाटे ऐसा साधुजनाहूनि भिन्न न विठोबा ॥ १० ॥
संतांसि नावडे स्तुति हें ठावें मज परंतु देवास ।
महिपति म्हणेल ' विठ्ठलराया ' या निजपदींच दे वास ॥ ११ ॥
श्रीविठ्ठलासि आहे साधूंची फार सर्वदा भीड ।
चीड प्रभुसि न येइल देइल मज करुनि निजपदीं नीड ॥ १२ ॥
अंजलि करूनि असतो गरुड उभा जेंवि अहिपातिसमोर ।
हरिभक्ति प्रेमगुणें नम्र सदा तेंवि महिपतिस मोर ॥ १३ ॥

या आर्यांत पंतांची मार्मिकता व गुणग्राहकता तर स्पष्ट दिसतेच आहे, पण महीपतीसंबंधाची त्यांची पूज्यबुद्धीही उत्तम प्रकारें व्यक्त होत आहे. वरील आर्यांत महीपतींच्या एका भक्तविजयाचाच उल्लेख आढळतो, यावरून ह्या आर्या महीपति विद्यमान असतांनाच लिहिल्या असल्या पाहिजेत यांत संशय नाहीं. शिवाय त्यांत ' स्वस्तुति ऐकून महीपतीस वीट न येवो ' असें पंतांनीं स्पष्ट म्हटलें आहे. यावरूनही वरील तर्कास बळकटी येते. ' भक्तविजय ग्रंथ ' लिहून होतांच तो सगळ्या महाराष्ट्रभर कसा पसरला, हें पंतांच्या ' जो

पसरला जगांत स्नेहाचा सत्सरीं जसा बिंदु ' या उद्गारांवरून उघड होतें. नवव्या आर्येंत, विठोबा ताहराबादकरांनीं आठवण केल्यावरून या आर्या आपण लिहिल्या, असें पंतांनींच सांगितलें आहे. पंतकृत विष्णुपद वकिलीच्या ४७ व्या आर्येंत 'तारावे उपकर्ते ते सज्जन विठ्ठलादि गोसावी ' याप्रमाणें ताहराबादकरांचा उल्लेख आढळतो. विठोबा गोसाव्यांसही पंतांच्या कवितेची फार आवड होती. त्यांनीं पंतांचीं रामायणें मागवून घेऊन त्यांच्या प्रती करून घेतल्या होत्या.

राजारामप्रासादिकृत भक्तमंजरीमाळा, अर्वाचीन भक्तलीलामृत, रा. दत्तात्रय अनंत आपटेकृत कविचरित्र भाग २ रा व नवनीत इतक्या ग्रंथांत महीपतींची थोडीबहुत माहिती दिलेली आढळते.

येथपर्यंत महीपतींच्या चरित्रासंबंधानें जी काय माहिती मला मिळाली तिचा संग्रह केला. याशिवाय त्यांच्यासंबंधाच्या बऱ्याच आख्यायिका त्यांच्या वंशजांकडून मिळण्यासारख्या आहेत, पण विस्तारभयास्तव त्यांचा समावेश येथें केला नाहीं. महीपतराव, तात्याजी महीपति व नरहरि महीपति या नांवाचे आणखी तीन साधु कवि महाराष्ट्रांत होऊन गेले आहेत. काव्यसंग्रहांत महीपतींचीं म्हणून जीं पदें प्रसिद्ध झालीं आहेत, तीं बहुतेक सगळीं नरहरि महीपतिकृत होत. हे नरहरि महीपति नाथ—संप्रदायी होते. त्यांचीं पदें फार सुंदर आहेत. तात्याजी महीपतींचा शनिमाहात्म्य हा ग्रंथ प्रसिद्धच आहे. असो.

आतां महीपतींच्या ग्रंथांतले थोडेसे उतारे येथें देतों.

भक्तशिरोमणि रोहिदास चांभार आणि त्याला पंचांग सांगणारा ब्राह्मण यांचा पुढील संवाद वाचनीय आहे.

## ओंव्या.

ब्राह्मण म्हणे रोहिदासासी । देवपूजा तूं करितोसी ।
चर्माचे आसनीं बैसलासी । याचें फळ कोणतें ? ॥ २६ ॥
विष्णुमूर्ति शालिग्राम जाण । आम्हीं ब्राह्मण करितों पूजन ।
त्वां चर्माची सांबळी करून । त्यांत कैसा घातला ? ॥ २७ ॥
वैकुंठवासी जगज्जीवन । ज्याचें योगी करिती ध्यान ।
त्वां चर्माची सांबळी करून । त्यांत कैसा घातला ? ॥ २८ ॥
जो क्षीरसागरीं शेषशायी । शास्त्रें धुंडितां न पडे ठायीं ।
चर्माची सांबळी करून पाहीं । त्यांत कैसा ठेविला ? ॥ २९ ॥
व्रतें तीर्थें तपें याग । करितां नातुडे श्रीरंग ।
तो वैकुंठवासी भक्तभवभंग । चर्मांत कैसा वेष्टिला ? ॥ ३० ॥
ऐकुनि द्विजवराचें वचन । रोहिदास बोले त्याकारण ।
चर्मावांचोनि पदार्थ कोण । तुम्ही दृष्टीस देखिला ? ॥ ३१ ॥
काहाल ढोल मृदंग जाण । त्यावरी होतसे हरिकीर्तन ।
चर्मावांचून पदार्थ आन । दृष्टीस न देखों सर्वथा ॥ ३२ ॥
चर्माची धेनु कपिलवर्ण । तिचें दुग्ध पवित्र जाण ।
तेणें पंचामृतस्नान । देवाकारण घालितां ॥ ३३ ॥
जारज अंडज उद्भिज नाम । तीनी खाणी वेष्टिल्या चामें ।
त्यांत नांदे आत्माराम । सर्वांभूतीं सारिखा ॥ ३४ ॥
शूद्र वैश्य क्षत्रिय ब्राह्मण । चर्में वेष्टिले संपूर्ण ।
चामाचा नगारा करून । चामाचे हात वाजविती ॥ ३५ ॥
त्यांतून मधुर निघे ध्वन । ते चर्माचे ऐकती कान ।
चर्माचे जिह्वे–करून । वेद कैसे बोलती ॥ ३६ ॥
चर्माचे हस्तेंकरून । तुम्हीं करितां अन्नपान ।
चर्ममंदिरीं आत्माराम । मधुरध्वनि बोलत ॥ ३७ ॥
ब्राह्मण म्हणे रोहिदासासी । ब्रह्मज्ञान तूं बोलसी ।
परी जीव असतां शरीरासी । विटाळ नाहीं सर्वथा ॥ ३८ ॥

यावरी रोहिदास बोले वचन । विश्वव्यापक जगज्जीवन ।
तो गवाळयांत असोन । विटाळ कैसा मानितां ॥ ३९ ॥
जन्मतां आणि मरतां । ज्याचा विटाळ तुम्ही धारितां ।
तेथें उत्तम पदार्थ कोणता । तुमचे दृष्टीस कोण दिसे ॥ ४१ ॥
अमंगळ यापरीचें चाम । तेथें उत्तम आत्माराम ।
निष्कलंक घनश्याम । सर्वां घटीं सारिखा ॥ ४२ ॥
ब्राह्मण वदे ते वेळां । शालिग्राम शुद्ध शिला ।
हा चर्मकांनीं जरी पूजिला । दोष घडतो त्यालागीं ॥ ४३ ॥
ऐकूनि ब्राह्मणाचें वचन । रोहिदास वदे त्यालागून ।
शालिग्राम-शिला पुजावी कोणें । ऐसें स्वामी मज सांगा ॥ ४४ ॥
ब्राह्मण म्हणे रे शतमूर्खा । आम्हीं पूजावें वैकुंठनायका ।
चहूं वर्णांमाजी देखा । श्रेष्ठ वर्ण ब्राह्मण ॥ ४५ ॥
देवांत श्रेष्ठ श्रीहरि । चहूं वर्णांत ब्राह्मण थोरी ।
यज्ञोपवीताचा अधिकारी । त्यानेंच विष्णु पूजावा ॥ ४६ ॥
ऐसें ऐकूनियां वचन । रोहिदास बोले त्याकारण ।
यज्ञोपवीत दाखवीन । तुजलागून स्वामिया ॥ ४७ ॥
मग रापी घेऊनियां करीं । उदर चिरिलें ते अवसरीं ।
यज्ञोपवीत सत्वरीं । तयामाजीं दाखविलें ॥ ४८ ॥
विप्र बोले ते अवसरां । तूं विष्णुभक्त होसी खरा ।
म्यां न करितां निजविचार । तुजकारणें छळिलें कीं ॥ ४९ ॥
अग्नींत टाकितां जाण । मोलास चढे जैसें सुवर्ण ।
तैसें करितां तुझें छळण । महिमा तुझा वाढविला ॥ ५० ॥
नातरी नाणें सुलाखीं टोंचून । त्याचें पाहती खरेपण ।
त्यापरी करितां तुझें छळण । महिमा तुझा वाढेल ॥ ५१ ॥
कीं सहाणेवरी घांसितां चंदन । तयाचा सुगंध कळे पूर्ण ।
तेविं म्यां तुझें करितां छळण । तुझा महिमा वाढेल ॥ ५२ ॥
नातरी टांकीनें फोडूनि पाषाण । देव बैसविला दृढ करून
तेंवि म्यां तुझें छळण । केलें जाण न कळतां ॥ ५३ ॥

तूं विष्णुभक्त आहेसी परम । सुखें पूजीं शालिग्राम ।
ऐसें बोलोनि द्विजसत्तम । गृहासि गेला आपुल्या ॥ ५४ ॥

भक्तविजय, अ० २५.

श्रीपांडुरंगानें एकदां सगळ्या संताची पूजा करून त्यांस भोजन दिलें, तेव्हां नामदेवांचा आणि भगवंतांचा जो संवाद झाला, तो येणेंप्रमाणें.—

जो सर्वां वरिष्ठ जगज्जीवन । तोही करी निजभक्तपूजन ।
नामा विस्मित होऊन । निजप्रीतीनें पुसत ॥ ७४ ॥
म्हणे देवा चोज वाटतें चित्ता । आजि सागर पूजी सरिता ।
कीं चंद्र नक्षत्रांभोंवता । प्रदक्षिणा घालित ॥ ७५ ॥
कीं वैनतेय अंडज जाती । पूजीत बैसे निजप्रीती ॥
ना तरी पार्वतीरमण कैलासपती । नंदीस प्रार्थी निजप्रेमें ॥ ७६ ॥
कीं नृपवर करी प्रजांचें पूजन । कीं देवांस प्रार्थी शचीरमण ॥
तेवीं तूं वरिष्ठ जगज्जीवन । देसी सन्मान निजदासां ॥ ७७ ॥
हांसोनि बोले रुक्मिणीरमण । मज तुह्मींच दिलें थोरपण ॥
सरिता नसत्या जरी निर्माण । तरी समुद्र कैसा वाढता ॥ ७८ ॥
नक्षत्रें नसतीं सभोंवतीं । तरी चंद्रासि शोभा न येती ॥
निर्माण नसती अंडजयाती । तरि गरुडास न म्हणते वरिष्ठ ॥ ७९ ॥
नंदी नसता जरी निर्माण । तरी धूर्जटीसि वागवितें कोण ॥
ना तरी तेतीस कोटी नसतां गण । तरी इंद्रासि सन्मान कोठोनी ॥ ८० ॥
प्रजांनीं राजासि थोर केलें । तेवीं तुमचेनि नांवरूप मज आलें ।
ऐकूनि भक्त विस्मित जाहले । निजमानसीं तेधवां ॥ ८१ ॥

भक्तविजय, अध्याय १५

भक्तविजय ग्रंथासंबंधानें महीपति म्हणतात:—

आजि नवल जाहलें अद्भुत । जे भक्तविजय पातला वसंत ॥
म्हणोनि सज्जनजनवनांत । गौरव बहु उद्देलें ॥ १ ॥
अर्थाच्या प्रभा फांकतां जाण । बोधाचा शीतळ सुटला पवन ॥
तेणें जिज्ञासु वृक्षासी अंकुरण । फुटों पाहे एकसरें ॥ २ ॥

अर्थांर्थाच्या पल्लवशाखा । सज्ञानपुष्पें आलीं देखा ।
विज्ञानास्थिती अमोलिका । फळें आलीं अविनाश ॥ ३ ॥
ऐसें शृंगारुनि मन । दिसे अति शोभायमान ।
त्रिविधतापें संतप्त जन । ते बैसले येऊन छायेसी ॥ ४ ॥
जीवन्मुक्त जे राजहंस । ते ये स्थळीं क्रीडावयास ॥
निजभक्तकथा अति सुरस । सेविती राजस निजप्रीतीं ॥ ५ ॥
कोणी अज्ञान आहेत जन । ते दुरूनि विलोकिती हें वन ॥
पुष्पीं फळीं शोभायमान । देखतां संपूर्ण मन निवालें ॥ ६ ॥

भक्तविजय, अध्याय १७.

## भूतदयेचा विजयः—

"आतां वैराग्यामाजी शिरोमणि । राका कुंभार वैष्णव ज्ञानी ॥
त्याचें चरित्र रसाळ वाणी । परिसा श्रवणीं भाविक हो ॥ ८ ॥
तो गुजराथी कुंभार निश्चित । नांदत होता पंढरींत ॥
भाजनें विकून नगरांत । भजन करीत श्रीहरीचें ॥ १० ॥
तों घरीं मांजर व्याली जाण । डेरियांत पिलें ठेविलीं तिण ॥
रात्रंदिवस घरटी घालून । स्तनपान करवीतसे ॥ १२ ॥
तंव कोणे एके दिवशीं । हिंडावया गेली बिळासीं ॥
कुलालें भाजनें आव्यापाशीं । नेलीं वेगसी न कळतां ॥ १३ ॥
पिलीं होतीं जयांत । तोही डेरा घातला आव्यांत ॥
इंधनें घालोनि त्वरित । कृशानु तेव्हां पेटविला ॥ १४ ॥
प्रदीप्त जेव्हां जाहला अग्न । तंव मांजर आली फेरी करून ।
घरांत पाहे विलोकून । तों न पडत पिलीं दृष्टीसी ॥ १५ ॥
बाहेर येऊन उठाउठी । आव्या भोंवती घाली घिरटी ॥
कुलाल उमजला तेव्हां पोटीं । ललाट पिटी निजकरें ॥ १६ ॥
कांतेसि म्हणे हाय हाय । मजपासूनि घडला अन्याय ॥
ते धांवत आली लवलाहें । म्हणे काय जहालें हो ॥ १७ ॥
कंठ होऊन सद्गदित । राका कांतेप्रती सांगत ॥
पिलीं होतीं भाजनांत । तीं मी नकळत जाळिलीं ॥ १८ ॥

मोहें ओरडे त्यांची जननी । घिरट्या घाली आपुले सदनीं ॥
काय करूं या संकटालागुनी । अंग धरणी टाकिलें ॥ १९ ॥
राका बांका उभयतां । म्हणती धांव धांव पंढरीनाथा ॥
लाक्षागृहीं पांडुसुतां । राखिलें जळतां कैशापरी ॥ २० ॥
कढईंत पडलें मंडूक सान । तळीं पेटला बहु कृशान ॥
तेणें केलें तुझें चिंतन । संकट जाणून ते वेळीं ॥ २१ ॥
त्यास पावलासी रुक्मिणीकांता । उदक न तापेचि सर्वथा ॥
तैसाच परी या आक्रांता । पंढरीनाथा धांव वेगीं ॥ २२ ॥
अघटित संकट घातलें माय । परी तूं करिसील तें नव्हेचि काय ॥
प्रल्हाद अग्नींत वांचला पांहें । तुझे पाय आठवितां ॥ २३ ॥
हे मार्जारयोनी तमोगुण । सर्वथा न घडे तुझें चिंतन ॥
परी तूं कृपासागर चैतन्यघन । वांचवीं प्राण पिलियांचे ॥ २४ ॥
नेत्रीं ढळढळां अश्रु वाहत । गात्रें विकळ पडलीं समस्त ।
धुळीनें भरलें अंग सत्य । वायु अद्भुत सुटलासे ॥ २५ ॥
आव्यांत धडकला कृशान । म्हणोन दोघें करिती रुदन ॥
नाठवे अणुमात्र देहभान । हरिस्मरण करितांची ॥ २६ ॥
असो दोन रात्रपर्यंत । आव्यामाजीं कृशानु जळत ॥
तोंपर्यंत कुलाल तेथ । पडिला निश्चित मेदिनीं ॥ २७ ॥
तिसरे दिवशीं कृशानु शांत । होऊनि भाजनें दिसती समस्त ॥
मांजर भोंवत्या घिरट्या घालित । मोहें ओरडत अट्टहासें ॥ २८ ॥
तों अघटित करी रुक्मिणीकांत । श्रोते परिसा भाग्यवंत ॥
आव्यामाजीं पिलीं बाहत । जननीची मात ऐकुनी ॥ २९ ॥
कुंभार आणि त्याची कांता । पाहतीं झालीं उभयतां ॥
तों आव्यामाजी डेरा होता । तो हिरवा अवचित देखिला ॥ ३० ॥
त्यांत मांजराचीं पिलीं तीन । जिवंत देखिलीं निजदृष्टीन ॥
म्हणे 'मज पावला रुक्मिणीरमण । भक्तभूषण कृपाळू' ॥ ३१ ॥
तीन दिवसपर्यंत देख । नाहीं घेतलें अन्न उदक ॥
सुकोन मुख गेलें अधिक । तें उल्हासें टवटवलें ॥ ३२ ॥

भक्तविजय, अध्याय १७

महीपतींचें उपमाचातुर्य वर्णनीय आहे. पुढील उपमा पहाः—

शूद्रगृहींचें पक्वान्न । देखोनि काय सेविती ब्राह्मण ॥
मद्यपात्रांत गंगाजीवन । आणितां प्राशन करूं नये ॥
नूतन पादुका असल्या तरी । त्या बांधूं नये मस्तकावरी ॥
महाद्वाराची पायरी । ते काय देव्हारीं पुजावी ॥
पायींचा पोल्हारा सुवर्णमये । तो सर्वथा नाकीं घालूं नये ॥
महा वृक्षाची सरी पाहें । एरंड काय करील ॥
पितळ सोज्वळ उटिलें जरी । परी त्यासीं कनकाची नये सरी ।
वृंदावन जरी घोळिलें शर्करीं । परी तें अंतरीं कडवट ॥
राजाची वेश्या सुंदर गुणी । परी काय बसेल पुण्याहवाचनीं ।
तेवीं यवनयाती सद्गुरुस्थानीं । मानूं नयेचि सर्वथा ॥

तुकारामबुवांचे अभंग पाहून कांहीं लोकांस मोठें वैषम्य वाटलें, त्यासंबंधानें लिहितांना महीपति म्हणतातः—

'एवं भावार्थियामागें विकल्पी नर । लागले असती परंपर ॥
म्हणवूनि तुकयाचे अभंग साचार । निंदिती पामर निजमुखें ॥ ८६ ॥
सूर्याचा प्रकाश देखोनि दृष्टी । डुडुळ उगाचि जळती पोटीं ।
कीं पूर्वेस चंद्र येतां निकटीं । तस्करांसी भेटी नावडे ॥ ८७ ॥
दातयाची ऐकूनि कीर्ति । कृपण उगेचि त्या धिक्कारिती ।
कीं दिव्य औषधि चमकतां रातीं । रोग तळमळती चित्तांत ॥ ८८ ॥
पंडितांची देखोनि वक्तृता । अजापाळ म्हणती हे वडवड वृथा ।
कीं गंधर्व सुस्वर गायन करितां । तेथें गर्दभ भुंकतां न राहती ॥ ८९ ॥
बकुळीचा सुगंध येतां पाहें । तो पुंगळवेलीस मानेल काय ।
सुंदर कपिला असली गाय । तरी यवन काय पूजिती ? ॥ ९० ॥

भक्तविजय, अ० ४८.

स्वतःच्या ग्रंथरचनेसंबंधानें महीपति म्हणतातः—

'जैशी आज्ञा केली रुक्मिणीवरें । तितुकींच ग्रंथीं लिहिलीं अक्षरें ।
जैसा वाजविणार फुंकितो वारें । तैशीं वाजंत्रें वाजती ॥

मोहें ओरडे त्यांची जननी । विरव्या घाली आपुले सदनीं ॥
काय करूं या संकटालागुनी । अंग धरणी टाकिलें ॥ १९ ॥
राका बांका उभयतां । म्हणती धांव धांव पंढरीनाथा ॥
लाक्षागृहीं पांडुसुतां । राखिलें जळतां कैशापरी ॥ २० ॥
कढईंत पडलें मंडूक सान । तळीं पेटला बहु कृशान ॥
तेणें केलें तुझें चिंतन । संकट जाणून ते वेळीं ॥ २१ ॥
त्यास पावलासी रुक्मिणीकांता । उदक न तापेचि सर्वथा ॥
तैशाच परी या आकांता । पंढरीनाथा धांव वेगीं ॥ २२ ॥
अघटित संकट घातलें माय । परी तूं करिसील तें नव्हेचि काय ॥
प्रल्हाद अग्नींत वांचला पाहें । तुझे पाय आठवितां ॥ २३ ॥
हे मार्जारयोनी तमोगुण । सर्वथा न घडे तुझें चिंतन ॥
परी तूं कृपासागर चैतन्यघन । वांचवीं प्राण पिलियांचे ॥ २४ ॥
नेत्रीं ढळढळां अश्रु वाहत । गात्रें विकळ पडलीं समस्त ।
धुळीनें भरलें अंग सत्य । वायु अद्भुत सुटलासे ॥ २५ ॥
आव्यांत धडकला कृशान । म्हणोन दोघें करिती रुदन ॥
नाठवे अणुमात्र देहभान । हरिस्मरण करितांची ॥ २६ ॥
असो दोन रात्रपर्यंत । आव्यामाजीं कृशानु जळत ॥
तोंपर्यंत कुलाल तेथ । पडिला निश्चित मेदिनी ॥ २७ ॥
तिसरे दिवशीं कृशानु शांत । होऊनि भाजनें दिसती समस्त ॥
मांजर भोंवत्या विरव्या घालित । मोहें ओरडत अट्टहासें ॥ २८ ॥
तों अघटित करी रुक्मिणीकांत । श्रोते परिसा भाग्यवंत ॥
आव्यामाजीं पिलीं वाहत । जननीची मात ऐकुनी ॥ २९ ॥
कुंभार आणि त्याची कांता । पाहतीं झालीं उभयतां ॥
तों आव्यामाजी डेरा होता । तो हिरवा अवचित देखिला ॥ ३० ॥
त्यांत मांजराचीं पिलीं तीन । जिवंत देखिलीं निजदृष्टीन ॥
म्हणे 'मज पावला रुक्मिणीरमण । भक्तभूषण कृपाळू ' ॥ ३१ ॥
तीन दिवसपर्यंत देख । नाहीं घेतलें अन्न उदक ॥
सुकोन मुख गेलें अधिक । तें उल्हासें टवटवलें ॥ ३२ ॥

भक्तविजय, अध्याय १७

महीपतींचें उपमाचातुर्य वर्णनीय आहे. पुढील उपमा पहा:—

शूद्रगृहींचें पक्वान्न । देखोनि काय सेविती ब्राह्मण ॥
मद्यपात्रांत गंगाजीवन । आणितां प्राशन करूं नये ॥
नूतन पादुका असल्या तरी । त्या बांधूं नये मस्तकावरी ॥
महाद्वाराची पायरी । ते काय देव्हारीं पुजावी ॥
पायींचा पोल्हारा सुवर्णमये । तो सर्वथा नाकीं घालूं नये ॥
महा वृक्षाची सरी पाहें । एरंड काय करील ॥
पितळ सोज्वळ उटिलें जरी । परी त्यासी कनकाची नये सरी ।
वृंदावन जरी घोळिलें शर्करीं । परी तें अंतरीं कडवट ॥
राजाची वेश्या सुंदर गुणी । परी काय बसेल पुण्याहवाचनीं ।
तेवीं यवनयाती सद्गुरुस्थानीं । मानूं नयेचि सर्वथा ॥

तुकारामबुवांचे अभंग पाहून कांहीं लोकांस मोठें वैषम्य वाटलें, त्यासंबंधानें लिहितांना महीपति म्हणतात:—

' एवं भावार्थियामागें विकल्पी नर । लागले असती परंपर ॥
म्हणवूनि तुकयाचे अभंग साचार । निंदिती पामर निजमुखें ॥ ८६ ॥
सूर्याचा प्रकाश देखोनि दृष्टी । डुडुळ उगाचि जल्पती पोटीं ।
कीं पूर्वेस चंद्र येतां निकटीं । तस्करांसी भेटी नावडे ॥ ८७ ॥
दातयाची ऐकूनि कीर्ति । कृपण उगेचि त्या धिक्कारिती ।
कीं दिव्य औषधि चमकतां रातीं । रोग तळमळती चित्तांत ॥ ८८ ॥
पंडितांची देखोनि वक्तृता । अजापाळ म्हणती हे वडवड वृथा ।
कीं गंधर्व सुस्वर गायन करितां । तेथें गर्दभ भुंकतां न राहती ॥ ८९ ॥
बकुळीचा सुगंध येतां पाहें । तो पुंगळवेलीस मानेल काय ।
सुंदर कपिला असली गाय । तरी यवन काय पूजिती ? ॥ ९० ॥

भक्तविजय, अ० ४८.

स्वतःच्या ग्रंथरचनेसंबंधानें महीपति म्हणतात:—

' जैशी आज्ञा केली रुक्मिणीवरें । तितुकींच ग्रंथीं लिहिलीं अक्षरें ।
जैसा वाजविणार फुंकितो वारें । तैशीं वाजंत्रें वाजती ॥

क्षेत्रांत बीज पेरिलें जाण । अंकुर येणें जीवनाधीन ।
कीं बाहुल्याचें नाचणें जाण । कळ सूत्राधीन असे ॥

महीपति सगुणोपासक होते असें पूर्वीं सांगितलें आहे, तथापि ते द्वैतमतवादी नसून अद्वैती होते हें लक्षांत ठेविलें पाहिजे. निरनिराळ्या पंथांच्या आणि निरनिराळ्या दैवतांस भजणाऱ्या सगळ्या संतांचीं चरित्रें त्यांनीं सारख्याच भक्तिभावानें लिहिलीं आहेत, यावरून ही गोष्ट सिद्ध होते.

जालंदरनाथांच्या कृपाप्रसादानें राजा गोपीचंद वैराग्यशील बनून आपल्या पट्टराणीच्या मंदिरीं भिक्षेस गेला असतां, तिचा व त्याचा जो संवाद झाला तो वाचण्यासारखा आहेः—

परम सकुमार तुमची कांति । वरी चर्चिली शुभ्र विभूति ।
नाना उपचार भोग संपती । टाकोनि अनुतापी कां झालां ? ॥
तुमचे चरण नृपनाथा । कोणती येऊनि धुईल कांता ।
हेच बहुत वाटे चिंता । सांगा तत्वता मजपाशीं ॥
गोपीचंद देत उत्तर । गंगा यमुना सरिता थोर ।
माझे चरण निरंतर । धुतील माते सर्वथा ॥
यावरी बोले कुरंगनयनी । कोण तुम्हां बैसवील भोजनीं ॥
हे चिंता अपार मनीं । मजलागोनी वाटते ॥
गोपीचंद बोले प्रत्युत्तरीं । तुज ऐशा माता घरोघरीं ।
करतल भिक्षा निर्धारीं । निरंतर घालतील ॥

वरील उताऱ्यांवरून महीपतींच्या वाणीची सरसता, प्रसादपूर्णता व भाषासौलभ्य इत्यादि गुणांची ओळख सहज पटण्यासारखी आहे. महीपतींचे ओंवीबद्ध ग्रंथ बहुतेक लोकांच्या वाचनांत वरचेवर येत असतात, यासाठीं त्या ग्रंथांतले फारसे उतारे न देतां त्यांच्या इतर कवितेकडे वळतों.

महीपतींनीं श्लोक, अभंग, पदें, इत्यादि फुटकळ कविता बरीच रचली आहे व त्यांपैकीं सुमारें ४० स्फुट अभंग रा. शाळिग्राम यांनीं संपादन केले आहेत; त्यांतील कांहीं सुंदर अभंग येथें देतों. महीपतींच्या इतर ग्रंथांतला प्रेमळपणा या स्फुट अभंगांतही सारखा भरलेला आढळतो.

## अभंग १

चित्तीं धरिली वासना । सिद्धी न्यावी नारायणां ॥ १ ॥
मी तों अपंग अनाथ । तुम्ही अनाथाचे नाथ ॥ २ ॥
केला पण सिद्धि न्यावा । मज सांभाळावें देवा ॥ ३ ॥
महीपति निढळवाणा । त्याची येऊं द्या करुणा ॥ ४ ॥

## २

धरियेली हांव म्हणवितों दास । शेवटील यश येइल कैसें ॥ १ ॥
हेचि रात्रंदिवस चिंता या जीवासी । कोणि सांगायासी नाहीं सखा ॥२॥
सगुण हें ध्यान न पडे दृष्टीसी । विचार कोणासि पुसूं आतां ॥ ३ ॥
म्हणूनि महिपति निवांत अंतरीं । करिसी तें करीं पांडुरंगा ॥ ४ ॥

## ३

उपेक्षितां माये कोठें जावें तान्हें । सांगावें गाऱ्हाणें कोणापाशीं ॥ १ ॥
पितयानें कन्या विकिली वृद्धासी । आडवा तयासी नये कोणी ॥ २ ॥
रायें लुटाविलें आपुलें नगर । वार्जिता सात्वार नाहीं कोणी ॥ ३ ॥
तैसें देवा तुह्मी मोकलियावरी । आमुचा कैवारी कोण आहे ॥ ४ ॥
महिपती म्हणे करिं तो विचार । सत्कीर्ति साचार वाढे जेणें ॥ ५ ॥

## ४

तुह्मा ह्मणोनियां झाला लोकाचार । परि साक्षात्कार नसे कांहीं ॥ १ ॥
म्हणुनि दिवसरात्रीं झुरतों अंतरीं । शेवटिल परि कैसी होय ॥ २ ॥
देव भक्तपणा आणिलीसे लाज । येतसे सहज घडोनियां ॥ ३ ॥
आपुल्या उचितें रुक्मिणीच्या पती । तारीं महिपति दीन रंक ॥ ४

५

अपराधाच्या राशी भेदिल्या आकाशीं । गणित कोणासी लेख नोहे ॥१॥
त्याच्या बळें जाण पतित मी पूर्ण । होसी तूं पावन पांडुरंगा ॥ २ ॥
तुम्हा आम्हां गुण लाधले छत्तीस । अनुमान यास नसे कांहीं ॥ ३ ॥
महिपति म्हणे आलेंसे घटित । आतां अंतरपट काढीं देवा ॥ ४ ॥

६

घडेल तें घडो देहाचें संचित । तुझे स्मरणीं चित्त असो देवा ॥ १ ॥
हेंचि जीवें भावें मागतसें दान । नको अनमान करूं आतां ॥ २ ॥
सुखदुःख दोन्ही, देहाचें प्रारब्ध । तुझा प्रेमबोध ठसो देहीं ॥ ३ ॥
महीपति म्हणे इच्छेचा तूं दाता । पुरवीं अनंता आस माझी ॥ ४ ॥

७

आले जे याचक धरूनियां आस । तयांसि निराश करूं नये ॥ १ ॥
अव्हेरितां उणें देतसे दातिया । जाय कीर्ति वायां मागील ती ॥ २ ॥
पहिला कां तुम्ही पाडियेला ठसा । तेव्हां जगदीशा नव्हतें ठावें ॥ ३ ॥
चरित्र जें तुम्ही दाविलें सहज । त्याचा कीर्तिध्वज उभारिला ॥ ४ ॥
तें आतां असत्य वाटे मजप्रती । दास महीपति चिंता वाहे ॥ ५ ॥

८

परिहार देऊं किती । अंतर्ज्योति तूं देवा ॥ १ ॥
सर्वकाळ साक्षीभूत । मनोगत जाणसी ॥ २ ॥
तुज ऐसा सत्ताधारी । या अवसरीं दिसेना ॥ ३ ॥
महीपति शरण तुज । त्याची लाज रक्षावी ॥ ४ ॥

९

विठो पंढरीच्या राया । जन्मा आलों कीर्ति गाया ॥ १ ॥
धन्य देखिली पंढरी । तुझे पाय विटेवरी ॥ २ ॥
सलगी केली या संतांसी । सुख वाटलें जीवासी ॥ ३ ॥
मुखीं नाम गाय कीर्ति । दास तुझा महिपति ॥ ४ ॥

तुकारामबुवांनीं स्वप्नांत येऊन आपणास दृष्टांत दिल्याची हकीकत महीपतींनीं पुढील अभंगांत सांगितली आहे:—

१०

बाळपणीं मरे माता । मग प्रतिपाळी पिता ॥ १ ॥
तैशापरी संभाळिलें । ब्रीद आपुलें साच केलें ॥ २ ॥
यात्रा नेली पंढरीसी । ध्यान ठेविलें पायांसी ॥ ३ ॥
हृदयीं प्रकटोनी बुद्धि । भक्तविजय नेला सिद्धी ॥ ४ ॥
स्वप्नीं येऊनि तुकाराम । *आपुलें सांगितलें नाम ॥ ५ ॥
महीपति ह्मणे हरी । तुमच्या हातीं सूत्र दोरी ॥ ६ ॥

एका वेळीं महीपति वाटेंत घोड्यावरून पडले, त्यामुळें त्यांस पंढरपुरास जातां आलें नाहीं. त्यावेळीं त्यांनीं श्रीपांडुरंगास पुढील ओंवीबद्ध पत्र पाठविलें:—

जय क्षीराब्धिवासा अनंता । अनंतशायी मायातीता ।
भक्तवत्सल पंढरिनाथा । रुक्मिणीकांता श्रीविठ्ठला ॥ १ ॥
सेविसि विज्ञापना ऐसी । येत होतों पंढरीसी ।
पांच कोस प्रथम दिवशीं । नांदुरासी पातलों ॥ २ ॥
एक रात्र क्रमोनि तेथ । प्रातःकाळीं उठलों त्वरित ।
अश्वावरूनि अकस्मात् । ग्रामद्वारीं पडियेलों ॥ ३ ॥
तेणें देहदुःखेंकरून । विकळ मूर्च्छित पडिलों जाण ।
चित्तीं झालें तुझें स्मरण । अगाध महिमान संतांचें ॥ ४ ॥
इष्टमित्र आप्त ग्याहीं । डोली करूनि आणिलें गांवीं ।
चित्तवृत्ति विठाबाई । तुझे पायीं लागली ॥ ५ ॥
त्रितापाचे विस्तार किती । पत्रीं ल्याहावे तुजप्रती ।
शरीरीं किंचित् नाहीं शक्ति । लेखणी हातीं धरवेना ॥ ६ ॥
अंतर साक्ष चैतन्यघन । जाणसी जीवाची निजखूण ।
आरुष म्हणोनि तुजकारण । पत्र लिहूनि पाठवूं ॥ ७ ॥

---

* 'निरसिला भवभ्रम' असाही पाठ आहे.

शेवटील हेत आहे साचा । संबंध तोडीं या देहाचा ।
ठाव इच्छितसें पायांचा । आणिक वाचा न बोले ॥ ८ ॥
मागें भक्तां पावलासि अंतीं । तें यथार्थ करीं रुक्मिणीपति ।
विष्णुदास महिपति । सेवेसि विनंति करीतसे ॥ ९ ॥

या पत्रावरून महिपतींच्या एकंदर मनोवृत्तींची कल्पना चांगली होते. पायांनीं पंढरपुरची वारी करण्याचें सामर्थ्य वार्धक्यामुळें आपल्या अंगीं उरलें नाहीं याबद्दल त्यांस फार वाईट वाटत असे. ते म्हणतात:—

सदा डोळ्यांपुढें राहो तुझें ध्यान । ऐसी इच्छा पूर्ण वाटे जीवा ॥ १ ॥
देवावांचोनियां निष्फळ वासना । ऐसें नारायणा दिसताहे ॥ २ ॥
तुझे यात्रे गमन घडावें चरणीं । नसे या प्राक्तनीं करूं काय ॥ ३ ॥
आहे जों शरीर घडो परोपकार । असत्य उत्तर नयो वाचे ॥ ४ ॥
महिपति ह्मणे दाखवीं ते सोय । जेणें भवभय निवारेल ॥ ५ ॥

आमच्या साधुसंतांस ‘ अंतरसाक्ष जो चैतन्यघन परमेश्वर तो जीवाची निजखूण जाणतो, त्याला भेटण्यासाठीं पंढरीसारख्या ठिकाणींच गेलें पाहिजे असें नाहीं ’ हें ज्ञान होतें, पण सगुण भक्तिच त्यांना विशेष प्रिय असल्यामुळें, आपलें ‘ आरुष ’ पत्र पांडुरंगाकडे पाठविण्यास महीपतींस कांहीं हरकत वाटली नाहीं. तुकारामबुवांनींही महीपतींप्रमाणेंच श्रीपांडुरंगास एक अभंगबद्ध पत्र वारकऱ्यांबरोबर पाठविलें होतें. देवास पत्रें पाठविणें किंवा त्याच्याशीं अन्य प्रकारें सलगी करणें म्हणजे त्याचा अपमान किंवा थट्टा करणें होय, असें कित्येकांस वाटतें, पण असल्या अपमानाबद्दल देवानें तुकारामबुवांस किंवा महीपतींस एखादी भयंकर शिक्षा केली होती, असा पुरावा ज्या अर्थीं उपलब्ध नाहीं, उलट असले सलगी करणारे लोकच देवास विशेष प्रिय झाले होते असें दिसतें, त्या अर्थीं देवाच्या अपमानाबद्दल काळजी करण्याचें आपणास कांहीं प्रयोजन नाहीं.

---

# मुरारि.

हा कवि कोल्हापूर येथें शके १६७६ ह्मणजे इ० स० १७५४ च्या सुमारास होऊन गेला. याच्या बापाचें नांव कृष्ण व आईचें नांव राधा. यानें आपल्या भीष्मपर्वाच्या सातव्या अध्यायांत स्वतः—संबंधानें पुढील ओंवी लिहिली आहे:—

> कृष्ण राधिकेपासाव जनन । शांडिल्य गोत्र प्रवर तीन ॥
> ऋग्वेदशाखा ब्राह्मण दीन । कवि किंकर संतांचा ॥ १३८ ॥

मुरारि हे शांडिल्यगोत्री ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. त्यांचा ओंवी-बद्ध भीष्मपर्व' हा एकच ग्रंथ* उपलब्ध झाला आहे; त्याचे शेवटीं, 'शके १६७६ भावनाम संवत्सरे माघ शुद्ध ७ रथसप्तमी भानुवासर, रेवती नक्षत्र, सिद्धयोग माध्याह्नासी येतां दिन ग्रंथ समाप्ति पावला' हा ग्रंथसमाप्तीचा काल कवीनें निर्दिष्ट केला आहे. मुरारि कवीनें 'भीष्मपर्व' हा एकच ग्रंथ लिहिला असावा असें वाटतें, निदान भारताच्या इतर पर्वांवर त्यानें ग्रंथरचना केली नाहीं, हें त्याच्या भीष्मपर्वाच्या आद्यंतींच्या उद्गारांवरून अगदीं स्पष्ट दिसतें. ग्रंथाच्या मंगलाचरणानंतर कवीनें मराठी कवि व मराठी भाषा यांसंबंधानें व स्वतःसंबंधानें पुढील उद्गार काढिले आहेत:—

### ओंव्या.

> 'ज्ञानदेवो एकनाथ । टीकाकार माजी समर्थ ।
> त्यांसी माझें दंडवत । ग्रंथारंभीं पावो कां ॥ ५३ ॥
> कृष्णदास याज्ञवल्की । कृष्णदास मुद्गल लेखी ।
> रामदास वंद्य लोकीं । ग्रंथकर्ते नामियेले ॥ ५४ ॥

---

* हें भीष्मपर्व रा० पांगारकर यांस पंढरपुर येथें एका कोमट्याचे घरीं मिळालें. हें अद्याप अप्रकाशित आहे.

नामा पाठक नामदेवो । महाभक्त तुकारावो ।
त्यांच्या चरणीं धरुनि भावो । ग्रंथारंभीं नमियेले ॥ ५५ ॥
महाराष्ट्र वाणी अमान । त्यासी जे कां देती मान ।
ते म्यां पंडित देदीप्यमान । निरभिमान वंदिले ॥ ५६ ॥
जयापासून माझें जनन । जेहीं दाविलें मनुष्यपण ।
ते मातापितरें दोघेंजण । राधाकृष्ण नमियेलीं ॥ ५७ ॥
जैशी पक्षीण पिलियांप्रती । रक्षितसे नानायुक्ति ।
तैसें रक्षिलें अति प्रीतीं । ते पितृमाता नमियेली ॥ ५८ ॥
जो कां केवळ कृपासिंधु । गुरुभक्तीचा ज्यासी वेधु ।
तो म्यां नमिला वडील बंधु । केशवनामें साजिरा ॥ ५९ ॥
सुजाण राजा पौरवंशी । सत्यशीळ सद्गुणराशी ।
पवित्र कमलापुरवासी । प्रियभक्त शिवाचा ॥ ६० ॥
त्याचिया नगरामाजी जाण । शांडिल्यगोत्री आश्वलायन ।
परम पवित्र प्रवर तीन । कवि किंकर संतांचा ॥ ६१ ॥
तो मुरारि नामें ब्राह्मण पाहीं । इच्छा उदेली त्याच्या देहीं ।
जे महाराष्ट्र कविता करावी कांहीं । कृपाबळें गुरूच्या ॥ ६२ ॥
तेणें आरंभ केला ग्रंथा । भीष्मपर्व महाराष्ट्र कविता ।
ओवियाबद्ध ईश्वरसत्ता । सर्व सिद्धी जाईल ॥ ६३ ॥
सकळ श्रोत्यां जोडोनि पाणी । वरद मागे मंजुळ वाणी ।
चित्त दीजे ग्रंथश्रवणीं । अव्हेर कोणी न करावा ॥ ६४ ॥
धर्मराजें श्वान तारिला । स्वर्गभुवनीं मान्य केला ।
तैसें माझ्या महाराष्ट्र-बोला । पावन सर्वी करावें ॥ ६५ ॥
धवल अथवा कपिला गाय । भिन्न वर्णे दिसती पाहें ।
परी दुग्धवर्ण भिन्नता नोहे । स्वादीं ऐक्य सारिखें ॥ ६६ ॥
तैसा संस्कृतीं जो कां अर्थ । तोचि प्राकृतीं जालिया प्राप्त ।
मग कां तेथ धरावें द्वैत । श्रवणीं सादर असावें ॥ ६७ ॥
देवें संस्कृत भाषा केली । म्हणोनि विश्वा वंद्य जाली ।
तरी देवाविरहित काय आली । प्राकृत भाषा आज हे ॥ ६८ ॥

गौतमें आणिलें गौतमीसी । प्रथम स्नान घडलें त्यासी ।
तरी काय लोकीं वर्जिजे तीसीं । उच्छिष्ट उदक म्हणोनी ॥ ६९ ॥
तैसा वदला श्रीगुरुव्यास । तोचि अर्थ महा सुरस ।
महाराष्ट्र भाषे वदतों त्यास । वंद्य सर्वीं करावें ॥ ७० ॥

अध्याय १.

सुवर्णपात्रीं क्षीर दुहिलें । तें काय रुची दुणावलें ।
तेंच मृद्घटीं घातलें । तें काय अरुची होतसे ? ॥ १३० ॥
तैसी संस्कृत भारतकथा । महाराष्ट्र वाणीमाजी वदतां ।
न्यून नव्हे कांहीं तत्त्वता । अर्थ एकचि पैं असे ॥ १३१ ॥

अध्याय ९

सकळ श्रोत्यां जोडोनि कर । कृष्णनंदन कवि किंकर ।
मुरारि नामें मागे वर । वारंवार मधुरोक्ती ॥ १३५ ॥
टीका केली यथामती । ते तुम्ही मान्य कीजे सुमती ।
हेंचि मागणें सकळांप्रती । न्यून तें पूर्ण करावें ॥ १३६ ॥

अध्याय १८.

वरील ओंव्यांत मुरारि कवीनें ज्ञानदेव, एकनाथ, कृष्ण-याज्ञवल्की, कृष्णदास मुद्गल, रामदास, नामापाठक, नामदेव, आणि तुकाराम या आठ सत्पुरुषांस वंदन केलें आहे; व ह्या कवींचे बहुतेक ग्रंथ मुरारि कवीनें लक्ष्यपूर्वक वाचले होते असें दिसतें, वरील वेंच्यांतील—

‘ देवें संस्कृत भाषा केली ’

ही ओंवी एकनाथांच्या—

संस्कृत भाषा देवें केली । प्राकृत काय चोरापासून आली ।

या ओंवींशीं सदृश दिसते व—

‘ सुवर्णपात्रीं क्षीर दुहिलें । ’

ही ओंवी मुक्तेश्वरांच्या—

' सुरस सुंदरी पवित्र सृष्टी। पक्वान्नें निपजवुनी पाठीं।
संस्कृतशब्द सुवर्णताटीं। श्रेष्ठां श्रेष्ठां ओगरिलीं ॥
तेंचि रसायन दुर्बलपणीं। महाराष्ट्र भाषा रंभापणीं।
वाढिलें तरी भुकाळू जनीं। न सेविजे किमर्थ ?, ॥

या ओंव्यांतील कल्पना घेऊन लिहिलेली दिसते. ज्ञानेश्वरांपासून मोरोपंतांपर्यंत बहुतेक सगळ्या मराठी कवींनीं मराठी भाषा व कविता यांस नाकें मुरडणाऱ्या संस्कृताभिमानी लोकांची दुराग्रही समजूत काढण्यासाठीं, अपापल्या परीनें मराठी भाषेची तरफदारी केली आहे; त्याप्रमाणें मुरारि कवीनेंही वरील ओंव्यांत यथाशक्ति प्रयत्न केला आहे. मुरारि यांची आपल्या आईबापांसंबंधानें व वडील बंधूसंबंधानें फार पूज्यबुद्धि दिसते. त्यांस आपल्या आजीचा (तीर्थरूपांच्या मातेचा) लळा विशेष होता, असें दिसतें. त्याचप्रमाणें कवीची नम्रता व निरभिमानता वरील ओंव्यांत स्पष्टपणें व्यक्त झाली आहे. 'कमलापुर' हेंच कोल्हापुर होय, असें मानिलें तर तेथील राजास 'पौरवंशी' म्हणजे 'पवार वंशी' हें कवीनें दिलेलें विशेषण सार्थ दिसत नाहीं. कदाचित् 'पौरवंशी' याचा दुसरा कांहीं तरी अर्थ असेल. कवीनें 'पवित्र कमलापुर' असें म्हटलें आहे यावरून हें कोल्हापुरच असावें, यांत शंका नाहीं. कवीनें कमळापुर येथील तत्कालीन सिंहासनाधिष्ठित पुरुषास 'सुजाण, सत्यशील, सद्गुणराशी, शिवाचा परम भक्त' अशीं विशेषणें दिलीं आहेत; व कवीच्या ग्रंथसमाप्तिकालीं कोल्हापुर येथें श्री छत्रपति संभाजी महाराज हे ज्याअर्थी राज्य करीत होते, त्या अर्थी हीं सगळीं स्पृहणीय विशेषणें कवीनें त्यांसच अनुलक्षून घातलीं आहेत, हें उघड आहे. मुरारि कवीचें आणखी कांहीं वृत्त उपलब्ध नाहीं; पण त्याच्या वंशजांचा जर पत्ता लागेल, तर त्यांजपाशीं या कवीची आणखी कांहीं तरी माहिती व कविता कदाचित् मिळण्याचा संभव आहे.

मुरारि कवीची ओवी फार सरळ, सुबोध व रसाळ असून त्यांचें भीष्मपर्व एकंदरींत फार चांगलें उतरलें आहे, असा रा. पांगारकर यांचा अभिप्राय आहे. या अभिप्रायाच्या समर्थनासाठीं सदर ग्रंथांतले कांहीं सुरस उतारे येथें देणें अवश्य होतें, परंतु दुर्दैवानें तो ग्रंथ मला मिळाला नसल्यामुळें व पंढरपुरास जाऊन तेथें शोध करण्यास जो काल व जें द्रव्य यांची आवश्यकता आहे, त्यांच्या अभावामुळें तसे उतारे देण्यास मी असमर्थ आहें याबद्दल मला फार वाईट वाटतें. प्रभूची इच्छा असेल, तर प्रस्तुत ग्रंथाच्या द्वितीयावृत्तींत या उताऱ्यांचा समावेश करण्यास मी समर्थ होईन.

---

## शहामुनि.

हा कवि सुमारें १३९ वर्षांपूर्वी होऊन गेला. ह्याचा सिद्धांतबोध नामक ओवीबद्ध ग्रंथ प्रसिद्ध असून, त्याचे अध्याय ५० व ओवी-संख्या ९८९८ आहे. हा ग्रंथ अद्वैतमतानुवादी असून, त्याची योग्यता महाराष्ट्र वाङ्मयांत फार मोठी आहे. ह्या ग्रंथासंबंधानें रा० पांगारकर यांनीं म्हटलें आहे —'मराठी भाषेंतल्या पहिल्या प्रतीच्या ग्रंथांत मोडण्यासारखा हा ग्रंथ आहे, पण आमच्या अरसिकतेमुळें त्याचें योग्य स्थान त्याला अद्याप मिळालें नाहीं. भिन्न भिन्न पुराणांतल्या उत्कृष्ट कथा, रामायण—भारतांतलीं सुंदर आख्यानें अति संक्षिप्त तऱ्हेनें, मोठ्या मार्मिकपणानें व शब्दरचना अति समर्पक, अति सुबोध व अत्यंत प्रासादिक करून सारा ग्रंथ श्रेष्ठ नीति-तत्त्वांनीं व वेदांतविचारांनीं विणून काढला आहे. याची रचना इतकी सुबोध व चित्ताकर्षक आहे, याची मांडणी एखाद्या साध्या गद्यग्रंथासारखी इतकी सहज व सरळ झालेली आहे कीं, गंगेच्या ओघाबरोबर जसें पुष्प झरकन वाहत जावें, त्याप्रमाणें अंतःकरण

याच्या अस्खलित विचारप्रवाहाबरोबर वाहत जातें. या ग्रंथांत चित्त भारून टाकणारें, अन्य व्यवसायांची पुरी विस्मृति पाडणारें व आपल्या दिव्य प्रभेनें दशेंद्रियांची एकतानता करणारें असें अद्भुत सामर्थ्य आहे कीं, त्याचें यथार्थ वर्णन वाणीला करितां येत नाहीं.

'प्रसंग समाप्त रात्रीस । पुढें प्रारंभ उगवेल दिवस ।
कथापंथें जावयास । हर्ष वाटे मानसीं ॥'

असा धीर वाचकांस धरवत नाहीं.

'शहामुनीचें प्राकृत वचन । मान्य करी ईश्वर ॥'

हेंच खरें, एरवीं त्यांत इतका मोहकपणा आला नसता. यांत 'बहुतां मतांची उभारणी । तऱ्हेतऱ्हेचीं बोलणीं' आहेत. यांत

'उकली ही प्रपंचरचना । उत्पत्ति प्रळय सांगितले जाणा ॥'

तसेंच

'केला भक्तीचा सुकाळ । ज्यांत बोधरसकल्लोळ ।
पाहतां परमार्थ पुष्कळ । उपदेश अर्थ नेटका ॥'

चित्तचातुर्य वाढविणारे, जीव—शिवांचे निर्णय सांगणारे, गुरुमहिमा वाखाणणारे, संतमाहात्म्य वर्णन करणारे प्रसंग अनेक आले आहेत; प्राचीन संतांच्या, संतिणीच्या व ईश्वरावतारांच्या कथा साऱ्या अध्यात्मतंतूंत ओवल्या आहेत. तात्पर्य मराठी वाङ्मयाच्या खाणींतला हा एक अत्यंत तेजस्वी हिरा आहे व 'जरि उकिरड्यांत पडला मळला न हिरा तथापि सामान्य' या पंतांच्या उक्तीप्रमाणें मराठी वाचकांनीं जरी याची किंमत केली नाहीं, तरी याची प्रभा याच्या सन्निध जाणाऱ्याला दिपविल्याशिवाय राहणार नाहीं."

वरील अभिप्राय अक्षरशः खरा आहे, त्यांत रतिमात्र अतिशयोक्ति नाहीं, हें मी स्वानुभवानें सांगतों. शहामुनीची वाणी इतकी रसवती, स्पष्टभाषिणी, प्रासादिक आहे कीं, तिच्या तेजस्वितेमुळें

वाचकांचे मनश्चक्षु दिपून गेल्याशिवाय राहात नाहींत. कवीची विद्वत्ता मोठी अगाध होती असें दिसत नाहीं, पण त्याच्या वाणीचें तेज इतकें उज्वल आहे कीं, केवळ परमेश्वरी प्रसादाचेंच तें फल होय, असें म्हटल्याशिवाय राहवत नाहीं. शहामुनीची ग्रंथरचना-स्फूर्ति इतकी अनिवार वेगानें धांवत गेली आहे कीं, क्वचित् स्थलीं भाषेच्या शुद्धाशुद्धतेकडेही लक्ष्य देण्यास तिला फुरसत सांपडली नाहीं.

शहामुनींनीं स्वतःसंबंधाची थोडीशी माहिती सिद्धांतबोधाच्या छत्तिसाव्या अध्यायांत दिली आहे, ती येणेंप्रमाणें:—

आतां नमूं वंशावळी । जन्म घेतला ज्याचे कुळीं ।
पणजा आमुचा मुळीं । नाम त्याचें शहाबावा ॥ १ ॥
महाराष्ट्र आणि पारशी । उभय पक्षीं विद्या त्यासी ।
आराधिलें होतें शिवासी । एकनिष्ठ उपासना ॥ २ ॥
आमिना होती त्याची अंगना । परम पतिव्रता सत्य जाणा ।
ती प्रसवली पुत्ररत्ना । नाम तयाचें जनाजी ॥ ३ ॥
तो करी विष्णूची भक्ति । मंडुबाई तयाची प्रकृति ।
ती प्रसवली पुत्र सुमती । नाम तयाचें मनासिंग ॥ ४ ॥
त्याची भार्या नाम आमाई । लोक म्हणती तिला ताई ।
ती आम्हांसी जाहली आई । जन्मविलें पवित्र कुशीतें ॥ ५ ॥
पिता होता गणेशउपासक । पोटीं आजा आला नामधारक ।
हें जाणोनि कौतुक । नाम ठेविलें शहाबावा ॥ ६ ॥
पणज्यापाशीं होतें भक्तीचें बीज । तोचि अंकुर विस्तारला सहज ।
म्हणोनि संतचरणींचें रज । प्राप्त जाहलें दैवानें ॥ ७ ॥
पणजा जन्मला प्रयागतीर्थी । आजा जन्मला अवंतिकेप्रती ।
सिद्धटेंक ज्यास म्हणती । जन्म पित्याचा त्या ठायीं ॥ ८ ॥
भीमातटीं पेडगांव शहर । पूर्वेस सरस्वतीसंगम साचार ।
ताईमातेचें पवित्र उदर । जन्म दिला आम्हांसी ॥ ९ ॥

पणजा होता वैराग्यखाणी । रत्न प्रसवली तेथोनी ।
वंशवल्लीची मांडणी । निवेदीं तुम्हां सज्जन हो ॥ १० ॥
होतें पदरीं वडिलांचे पुण्य । लाधलों तुम्हां संतांचे चरण ।
जाहलें पापाचें खंडण । मुकलों जन्ममरणासी ॥ ११ ॥
बरवी लाभाची जाहली जोडी । उभारितों गंथाची गुढी ।
जे परिसती आवडी । त्यांसी गोडी सुधेहुनी ॥ १२ ॥

ह्या ओव्यांत दिलेल्या माहितीवरून शहामुनींची वंशावळ पुढें दिल्याप्रमाणें ठरते:—

शहाबावा×आमिना
|
जनाजी×पंडुबाई.
|
मनसिंग×अमाई ऊर्फ ताई.
|
शहामुनि

शहामुनीचा पणजा व पणजी यांचीं नांवें मुसलमानी दिसतात; शहामुनीचा पणजा फारसी भाषाप्रवीण होता, तोच संस्कार शहामुनीच्या भाषेवरही झालेला दिसतो; कारण त्यांच्या ग्रंथांत फारसी शद्ब बरेच आढळतात. शहाबावाचा जन्म प्रयाग येथें झाला, जनाजीचा जन्म उज्जनीस झाला, मनसिंगाचा जन्म सिद्धटेक येथें झाला व शहामुनीचा जन्म पुणें जिल्ह्यांत पेडगांव येथें झाला, यावरून ह्या घराण्यांतील पुरुष बहुधा प्रवासी वृत्तीनेंच राहात असत असें दिसतें.

शहामुनीस वेदांत योगमार्गाचा उपदेश मुनींद्र नामक सत्पुरुषाकडून मिळाला. ह्या मुनींद्रांची विशेष माहिती सिद्धांतबोध ग्रंथांत मिळत नाहीं. मुनींद्रांशिवाय प्रसिद्ध सत्पुरुष कबीर यांनींही आपणांस दर्शन दिलें होतें असें कवीनें म्हटलें आहे:—

'ऐसा कबीर जगीं धन्य । मातें स्वप्नीं दिधलें दर्शन ।
तोही गुरु माझा पूर्ण । जपें त्यासी अहर्निशीं ॥'

शहामुनीची गुरुभक्ति मोठी होती, आपल्या गुरूचे धन्यवाद सिद्धांतबोधांत त्यांनीं ठिकठिकाणीं गायिले आहेत.

'नाहीं पाहिलें यातीस । केला अंगीकार समर्थें ॥'

असे उद्गार स्वतःच्या गुरूसंबंधानें त्यांनीं काढिले आहेत.

'सांडोनि जातीचा अभिमान । श्रीगुरूस गेलों शरण ।
फिरलें जन्ममरणाचें धरणें । निमग्न झालों स्वानंदीं ॥'

असे धन्योद्गारही सर्वत्र आहेत. पूर्वीच्या सत्पुरुषांनीं लिहिलेले पुष्कळ ग्रंथ असतां नवीन ग्रंथाचें प्रयोजन काय, असा प्रश्न विचारणारास त्यांनीं असें उत्तर दिलें आहे कीं, 'गुरुकृपेनें हृदयांत बोधसूर्य प्रगटल्यावर त्याचीं शब्दरूप किरणें आपोआप बाहेर फांकूं लागलीं.'

'गुरुकृपेनें जाहला बोधु । हृदयीं भरला ज्ञानसिंधु ।
तोचि हेलावला सिद्धांतबोधु । आनंदलहरी विस्तारल्या' ॥
'उगीच अक्षरें जोडोन । नाहीं केलें ग्रंथलेखन ।
येथें श्रीगुरु अंतःकरण होऊन । उठाविला लोट कवितेचा' ॥

इत्यादि कवीचे उद्गार अक्षरशः खरे आहेत यांत संशय नाहीं. अध्याय ३५ मध्यें प्राचीन व अर्वाचीन संतांची नामावळी दिली आहे, तींत सुमारें १२५ संतांचीं नांवें आलीं आहेत. शेवटच्या अध्यायांत भगवद्गीतेवर ज्या संस्कृत व प्राकृत टीका आहेत, त्यांचीं नांवें दिलीं आहेत; यावरून शहामुनीचें वाचन बरेंच विस्तृत असावें, असें वाटतें. सिद्धांतबोध ग्रंथाच्या शेवटीं पुढील माहिती आहेः—

जाहली लिहावयाची सीमा । लेखणी वाहिली गुरुपादपद्मा ॥
शहामुनीचा आत्मा । अष्टभावें निवाला ॥ १ ॥

केले कष्ट गेले सिद्धि । तन्मय शहामुनीची बुद्धि ।
जाहली कार्याची सिद्धि । लेखणी सीमा येथोनी ॥ २ ॥
शके सत्राशांत जाण । ग्रंथ समाप्त जाहला पूर्ण ।
चांबळी ग्रामाकडे पठारी मंडण । तेथें लिहिला हा ग्रंथ ॥ ३ ॥
शहामुनीचा शिष्य जाण । लेखक भगवंत नारायण ।
उपनाम पांढरकामा जाण । वास्तव्य पाडळी धायगुडे ॥ ४ ॥

यावरून शके १७०० त सातारा जिल्ह्यांतील पठारी मंडण गांवीं हा ग्रंथ शहामुनींनीं रचिला व त्यांचे शिष्य भगवंत नारायण पांढरकामे—वास्तव्य ' पाडली धायगुडे—यांनीं तो लिहिला, हें स्पष्ट होतें. शहामुनीचे शिष्य बरेच होते व त्यांच्यापैकीं एक दोन शिष्यांचे कांहीं अभंग आढळतात. सिद्धांतबोध ग्रंथाशिवाय शहामुनींनीं आणखी कांहीं कविता केली आहे कीं काय, हें समजत नाहीं. परंतु सिद्धांतबोध ग्रंथ लिहिल्यावर त्यांनीं नवीन ग्रंथरचना केली नसावी, असें ' लेखणी वाहिली गुरुपादपद्मा ' आणि ' लेखणी सीमा येथोनी ' या वरील वाक्यांवरून दिसतें.

आतां सिद्धांतबोध ग्रंथांतल्या कांहीं सुरस ओंव्या येथें देतों.

नारदमुनींनी श्रीकृष्णापाशीं स्त्री मागितली व पुढें नारदांची नारदी होऊन त्यांची जी विटंबना झाली, तो कथाभागः—

भावें लोटांगण श्रीकृष्णचरणा । पूर्ण ब्रह्म तूं सनातना ।
तुजवांचून अन्य भावना । धरितां वैखरी दुखंड ॥ १ ॥
हाच निश्चय तुझ्या पायीं । धरावया मज सामर्थ्य नाहीं ।
तुझी कृपा जाहलीया पाहीं । तरीच जाईल सिद्धीतें ॥ २ ॥
नारदें तुजशीं धरिला अभिमान । म्हणे मी ब्रह्म तुजसमान ।
तूं मी साझें एकचि ज्ञान । भिन्न भेदाभेद असे ना ॥ ३ ॥
सर्व भोगून आलिप्त । मीही पापपुण्यातीत ।
सोळा सहस्र अंतःपुरांत । एक समर्पी मज भार्या ॥ ४ ॥

हांसोनि बोले मेघश्याम । नारदा तूं ज्ञानी परम ।
तुझिया ठायीं नाहीं विषम । समभावें बोलसी ॥ ५ ॥
सोळा सहस्र अंतःपुरीं । ज्या गृहीं नसेन मी कंसारि ।
तेच तुझी मुख्य अंतुरी । समर्पिली यथार्थ ॥ ६ ॥
कृष्णआज्ञा जाहलियावरी । नारदासि हर्ष परम अंतरीं ।
गाय नाचे शिखा पिंजरी । आह्लाद हृदयीं न समाय ॥ ७ ॥
म्हणे ' वीणा आतां कासयाला । फेडिली कौपीन पीतांबर नेसला ।
वस्त्रभूषणीं शृंगारिला । हरुषें चालिला कृष्णसदनीं ॥ ८ ॥
आपुले हृदयीं विचार विवरी । राहों नये द्वारकेभीतरीं ।
वनिता घेऊनि वनांतरीं । क्रीडा करीन विनोदें ॥ ९ ॥
आलिंगूनि करीन चुंबन । जानुस्थानीं बैसवीन ।
एकासनीं करीन शयन । सुरवाडेन रतीशीं ॥ १० ॥
ऐसें विचारूनियां मनीं । प्रवेश केला मुख्य सदनीं ।
तेथें देखिली रुक्मिणी । श्रीहरीस विडा देतसे ॥ ११ ॥
संकोचित मुरडोनि माघारा । गेला सत्यभामेच्या घरा ।
श्रीकृष्ण पक्षी मयूरां । नाचवीत बैसला ॥ १२ ॥
तेथूनि जाय दुजिया गृहासी । तेथेंही लक्षी सर्वोत्तमासी ।
अनेक गोपुरांत प्रवेशी । खेळे सारिपाट गंजिफा ॥ १३ ॥
कोठें निजला, कोठें बैसला । कोठें बुद्धिबळांचा डाव मांडिला ।
आणिक एक गोपुरीं प्रवेशला । भावी हरि हा नसे कीं ॥ १४ ॥
माडीवरी पाहे निरखुनी । तेथें बैसली मृगलोचनी ।
हे एकटी दिसे चंद्रवदनी । ऐसें भावूनि सरसावला ॥ १५ ॥
कवळूं पाहे श्रीकृष्णपत्नीसी । पुढें पहुडले हृषिकेशी ।
येरी म्हणे लाज नाहीं मुनीसी । एकांतसमयीं येतसां ॥ १६ ॥
जळो तुमची विरक्ती । कासया वाढविली महंती ।
एवढी वासनेची फजिती । तरी कां जाहलां गोसावी ॥ १७ ॥
नाहीं आवरिला क्रोध काम । तरी कां डोईसी लावितां भस्म ।
ऋषिवेष धरूनियां उत्तम । पूजा घेतसां विश्वाची ॥ १८ ॥

वचन ऐकतां ललनेचें । मन मुनीचें अंतरीं खोंचे ।
तरंग उसळती अनंगाचे । प्रयत्न अणुमात्र सुचेना ॥ १९ ॥
मौनेंचि फिरला मागुता । फार श्रमला हिंडतां ।
मध्यान्हीं पातला कालिंदीपिता । मुनिस्नाना चालिला ॥ २० ॥
दुरी गेला कोश एक । एकांत पाहे नदीतटाक ।
बुडी मारी धरूनि नासिक । म्हणे खेंकडा झोंबला ॥ २१ ॥
चांचपडोनि धरिलें हातीं । किरवें नोहे झमके मोतीं ।
डोई चोळितां केश लागती । फणीनें जैसे विंचरिले ॥ २२ ॥
करीं पाटल्या गोठ कांकणें । तर्जनींत मुद्रिका दर्पणाची सगुण ।
त्यांत पाहे मुख अवलोकून । विपरीत लेणें देखिलें ॥ २३ ॥
मूद राखडी डोईवरुती । केश मिशा न दिसती ।
कर्णीं मासबाळ्यांचे घोंस लोंबती । बुगड्या आणि तानवडें ॥ २४ ॥
भाळीं शेंदुराची चिरी उमटली । नेत्रीं अंजन ललाटीं बिंदलीं ।
मुखीं अंगनेची शोभा आली । गळां हार मोतियांचे ॥ २५ ॥
पयोधर उचलले कठोर । कवंठा ऐसे वर्तुळाकार ।
काळे ठिबके ओंठावर । गुंज्या जैशा झग्याच्या ॥ २६ ॥
बहुत मन जाहलें घाबरें । पायीं अनवट बिचवे पोल्हारे ।
वांकी सांखळ्या नेपुरें । वाळे घुळघुळ वाजती ॥ २७ ॥
पौषमासाचा वारा अद्भुत । वपु शीतांशें कांपित ।
कैसा प्रवेशूं ग्रामवस्तींत । कवणा दाखवूं हे दशा ॥ २८ ॥
ऐसें विचारून मानसीं । आश्रम पाहे वस्तीसी ।
निरखितां देखिलें गुंफेसी । संकोच चित्तीं प्रवेशला ॥ २९ ॥
पर्णकुटींत तपस्वी ब्राह्मण । धष्टपुष्ट वयें तरुण ।
नेत्रीं पाहे लक्षून । सौदामिनीशी चमके ॥ ३० ॥
विस्मयो पावोनि पृच्छा करी । तूं कवणाची कुमारी अंतुरी ।
सुरीं असुरीं राक्षसां घरीं । जन्मलीस तें सांगपां ॥ ३१ ॥
ऐकोनि विरक्ताची वाणी । हांसोनि बोले मृगलोचनी ।
म्हणे मी गंधर्वाची भगिनी । मृत्युलोकीं पातलें ॥ ३२ ॥

पाहें तरी देवलोकींची । मनीं श्रद्धा परपुरुषाची ।
आतां कांता होऊनि तुमची । शुश्रूषेस सदा तिष्ठेन ॥ ३३ ॥
तपस्वी म्हणे तूं अज्ञान । मी ब्रह्मचारी ब्राह्मण ।
सांगसी तितुकें व्यर्थ वचन । अघटित कर्म घडेना ॥ ३४ ॥
ऐसें संवादतां दिवस गेला । पुढें रात्रीसमयो पातला ।
वस्त्र नसे पांघरावयाला । करुणा आली ब्राह्मणा ॥ ३५ ॥
अर्ध वस्त्र घालोनि तिजवरी । सहज पहुडला शेजारीं ।
येरी हळूचि चरण चुरी । सेवा माझी होऊं द्या ॥ ३६ ॥
अंगास अंग लागल्यावरी । दोघां हृदयीं कामलहरी ।
खवळली अद्भुत भारी । भुजंग जैसा फुंपाटे ॥ ३७ ॥
मद्यापरीस मदाचा कैफ । उसळों लागला कंदर्प ।
मग पालवोनि दीप । उभयतां एकत्र कवळिती ॥ ३८ ॥
गाढालिंगन चुंबन । हास्यविनोद सुखमैथुन ।
चार युगें प्रहरासमान । ऐसा आनंद लोटला ॥ ३९ ॥
यापरी लोटले दिवस कांहीं । आठ पुत्र प्रसवले गेहीं ।
त्यांच्या खटपटीची नवाई । लिहितां विस्तार न पुरेची ॥ ४० ॥
समस्त अर्भकांचीं विष्ठामूत्रें । काढणें लागे दोहीं करें ।
नदीस प्रक्षाळी नेऊनि चिरें । सर्वेचि होती मलीन ॥ ४१ ॥
ऋषी विसरला जपध्यान । फार वेष्टिला अर्भकेंकरून ।
समस्त झोंबती अंगालागून । दाढी-मिशा ओढिती ॥ ४२ ॥
एक मागती उदकास । एक मागती भोजनास ।
एक लोळती भूमीस । एक रडती हांसती ॥ ४३ ॥
बहुत वेष्टिलें जंजाळें । कष्टी अर्भकीं फार केलें ।
म्हणती कोण कर्म ओढवलें । उभयतां त्रासूनि तंडती ॥ ४४ ॥
क्रोधें भरूनियां ब्राह्मण । म्हणे कोठून आलीस पापीण ।
माझें भंगलें अनुष्ठान । भ्रष्ट जाहलों तवसंगें ॥ ४५ ॥
येरी म्हणे लज्जा नाहीं तुम्हांसी । भोगितां सुरवाडलों रतीसी ।
आतां कंटाळोनी हेळिसी । क्रियानष्टा पापिष्ठा ॥ ४६ ॥

जेव्हां देसी आलिंगन । तेव्हां प्रार्थिसी आज्ञा प्रमाण ।
आतां वीट घेऊनि मन । जाई म्हणसी निर्लज्जा ॥ ४७ ॥
ब्राह्मण म्हणे ढालाची । होती वळवळ विषयाची ।
बाळां पडलीस येऊन कैंची । नसता कलंक लाविला ॥ ४८ ॥

**सिद्धांतबोध, अध्याय २.**

---

## मंगलाचरण.

ओं नमोजी गणनायका । ॐकारस्वरूपपीठिका ।
वेदशास्त्रांचा बीजांकुर देखा । तुजपासोनि उद्भव ॥ १ ॥
चारी पुरुषार्थ चारी भुजा । विवेक सोंड सरळ वोजा ।
अभयपाणी भक्तकाजा । महाराजा उभारिसी ॥ २ ॥
जीव शिव तोचि गंडस्थळें । भिन्न परी मस्तकीं मीनले ।
शोभायमान बरवे शोभले । भेद अभेद दावुनी ॥ ३ ॥
स्वीकारूनि शिव उपनिषदांचे लाडू । गिळिसी वेदांतींचा पेंडू ।
घालिसी भेद विघ्नावरी धाडू । होशी सुरवाडू निजदासां ॥ ४ ॥
नीतीचा करीं अंकुश । मिरविशी ज्ञानाचा फरश ।
शांति-पीतांबर शोभे कासेस । पायीं तोडर उदार ॥ ५ ॥
चौदा विद्या चौसष्टी कळा । ऋद्धिसिद्धि तिष्ठती जवळां ।
सहज स्वभावें करिशी लीला । अनंत कळा तुजपाशीं ॥ ६ ॥
चौसष्टी जोगिणी कात्यायनी । चामुंडा शीतळा मिळोनी ।
भोंवत्या मिरवती जैशा सौदामिनी । स्तविती पुराणीं आकार ।
तुज चिंतोनी सुरगण । करिती दैत्य निशाचरांचें कंदन ।
तुज नवशिल्या संपूर्ण । फळदाता तूं होसी ॥ ८ ॥
महाकवी ग्रंथकर्ते । प्रारंभीं स्तविती स्वामी तूतें ।
माझा केवा काय तेथें । तुझें स्तवन करावया ॥ ९ ॥
सर्वारंभीं तुझें पूजन । ब्राह्मण करिती तुजलागुन ।
तेथें मीही एक दीन । नमन करितों पायांसी ॥ १० ॥

जो उद्धाळा ब्रह्मभुवनीं । तेचि शारदा विश्वमोहिनी ।
आदिमाया मूळ भवानी । प्रकाशखाणी ज्ञानाची ॥ ११ ॥
सर्वकाळ सूत्रदोरी । हृदयीं हेलाविसी प्रेमलहरी ।
तूंचि होसी वागीश्वरी । कवित्वरस वोतिसी ॥ १४ ॥
ब्रह्मा हरिहर बालकें । निर्मिसी माये तूं कौतुकें ।
निजविशी उन्मनी पालखें । अक्षयसुख त्यां करिसी ॥ १३ ॥
आदिमाया तुर्या ज्योती । नादरूपिणी परा शक्ती ।
स्फूर्तीसी ज्ञानदीप्ति । तेचि सरस्वती तूं आम्हां ॥ १४ ॥
तूंचि होऊनि प्रसन्न । अभय देसी कवीलागुन ।
यालागीं करितों मनन । वारंवार पदांबुजीं ॥ १६ ॥
जयजयाजी आचार्या । अवलोकनें मीपण गेलें लया ।
वर्णावया गुरुवर्या । ठाव कैंचा मी–तूंपणा ॥ १६ ॥
लवण नमूं गेलें जीवनीं । नाठवे मीठ किंवा पाणी ।
गूळ विचारी गोडी कोठुनी । तेव्हां गोड आपणची ॥ १७ ॥
प्रभा पुसे दीपालागुन । किरण निरखिती रविवदन ।
आमुचा जन्म जाहला कोठून । ती गती जाहली आम्हांसी ॥ १८ ॥
घटाकाश पुसे नभा । कधीं भेटीच्या घाल लाभा ।
चंद्रबिंब चिंतित उभा । कधीं भेटेल चंद्रमा ॥ १९ ॥
पट म्हणे भेटवा तंतुला । तंतु पुसे कापूस कोठें राहिला ।
तैसें जाहलें आम्हाला । वेडावलों आपणातें ॥ २० ॥
घट पुसे मृत्तिका मज दावणें । नग म्हणे कोठें हरपलें सोनें ।
कर्पूर स्मरे सुवासाकारणें । ते गति जाहली आमुतें ॥ २१ ॥
मत्स्य पुसे उदक दाखवा । मृग विचारी कोठें सुवास बरवा ।
मेलागर म्हणे मज उटी लावा । सुगंधाची चांगली ॥ २२ ॥
आम्हीं आम्हां चुकलों । देव शोधावया लागलों ।
श्रीगुरु पाहतांच भेटलों । मी ब्रह्म अनादी ॥ २३ ॥
काय चेटक गुरूपाशीं । मंत्र फुंकितां श्रवणासी ।
हस्त ठेवितां शिरासी । अष्टभावें निवालों ॥ २४ ॥

सिद्धांतबोध, अ० ३५.

गारुडी सर्प हातीं धरी । इतर भिऊनि पळती दुरी ।
ज्ञान्यासी पाप नाहीं संसारीं । अज्ञानासि पापें वेष्टिलें ॥ १ ॥
आकाश पृथ्वी दोघें उगीं । मध्यें हिंदोळा खाती तिघीं ।
उदक वन्ही वायूच्या अंगीं । किती हेलपाटे सांगावे ॥ २ ॥
ज्याची वृत्ति सम निश्चळ । तो सुखी सर्वकाळ ।
ज्यासी वासनेचा मळ । त्यासी दुःख प्रबळ कीं ॥ ३ ॥
आंतील खुंट्यासी दाणा लागला । तो सुखी निश्चळ राहिला ।
खुंटा मोडितांचि रगडला । पीठ केला जात्यानें ॥ ४ ॥
जो गुरुज्ञानखुंट्यापाशीं बैसला । चौऱ्यांशींचें जातें काय त्याला ।
ज्यानें गुरुखुंटा सोडिला । तो रगडिला काळानें ॥ ५ ॥
जोंधळ्याच्या ताटांचा रस काढिला । तो कढईत शिजविला ।
तेणें गूळ नव्हेचि वाहिला । कष्ट होती वृथाची ॥ ६ ॥
इक्षुरसीं उपजे गूळ । तेवीं ज्ञानीं मोक्ष अढळ ।
इतर साधनांचें फळ । जिवीं रस कडव्याचा ॥ ७ ॥
यालागीं आपणासी उमगा । नातरी अवघाचि शिमगा ।
वळकट गुरूचे पायीं लागा । तेथें दगा दिसेना ॥ ८ ॥
जैसा दारूचा नळा पेटे । एक पडे एक फूल उमटे ।
तैसे जन्ममरणाचे चपेटे । किती म्हणोनि सांगावे ॥ ९ ॥
पाहतां वृक्षांची जाती । एक पत्रें लागती एक गळती ।
तैसे संसाराचे आवृत्ती । कित्येक फिरती पेंचांत ॥ १० ॥
यासाठीं भक्तिहीनाचें जिणें । तें दिसों लागे लाजिरवाणें ।
म्हणोनि ज्ञाते ते धन्य । किती प्रकारें सांगावे ॥ ११ ॥
हात अन्नातें चिवडिती । ग्रास उचलोनि मुखांत घालिती ।
हात चिकटतां लीद लाविती । जिह्वा लीद कां स्पर्शेना ॥ १२ ॥
ते जिह्वेपाशीं ज्ञान । सर्व रसांची चवी असे जाण ।
पदार्थ भक्षूनि आपण । हात मूर्ख त्या चिकटा ॥ १३ ॥
ज्ञात्या-मूर्खांसी इतुकें अंतर । नानात्व घ्यावें तुम्हीं चतुर ।
म्हणोनि ज्ञानियाचें घर । सेवणें हें उचित ॥ १४ ॥

ज्ञात्याची पाहोनि समभक्ती । अज्ञान्याची विषम जाती ।
ज्ञानी फिरंगीचें मोल करिती । मूर्ख करी मेणाचें ॥ १५ ॥
शहाणा मधास घेत । मूर्ख बाकस संग्रहीं करीत ।
मध रुपया शेर विकित । मेणाची किंमत पैसा शेर ॥ १६ ॥
ज्याचे हृदयीं ज्ञानप्रकाश । ज्ञाता त्यासी लक्षीतसे ।
मूर्ख पुसे यातीस । उंच किंवा नीच कीं ॥ १७ ॥
अवघीं एक्या मातीचीं मडकीं । त्यांसी उंच नीच काय पारखी ।
रांजणांत विटाळ उदकीं । न दिसे स्पर्श सर्वांचा ॥ १८ ॥
अग्नि सदां सोंवळा । पारुसपण नसे नदीला ।
अमृत साजुक शिळें बोला । हे काय परीक्षा पाहण्याची ॥ १९ ॥
गाय तांबडी काळी पांढरी । तैसीं दुग्धाचीं रंगें नाहीं जाहलीं ।
मोगरा चांफा गुलाब फुलीं । सुगंधीं रंग नसे कीं ॥ २० ॥
पक्षीं पांढरीं आणि काळीं । परी भेद न दावी साउली ।
पंचरंगांची आब्दागिरी केली । छाया उमटे एकची ॥ २१ ॥
अंगुष्ठ तर्जनी मध्यम कनिष्ठिका । सहित पांच अंगोळिका ।
परि कर एकाचि देखा । नसे लेखा दूसरा ॥ २२ ॥
नदी उगमीं संगमीं स्थिर असे । मध्येंच खळखळ वाहत दिसे ।
कुलालचक्र गरगरां फिरतसे । वरी मडकें स्थिर कीं ॥ २३ ॥
चंद्राचे अंगीं श्वेत शामिका । राशी नक्षत्राळी मिरवे देखा ।
कळा तुटती वाढती देखा । चंद्र निर्मळ अद्वैतपणें ॥ २४ ॥
लेखणीचें कांडें एक असे । लिहितां रेषा उमटतसे ।
मध्यें दोन जिभा चिरल्या दिसे । इतुकेन भेद कल्पावा ॥ २५ ॥
पाहतां मुळीं कांडें एक । शेवटीं रेषा उमटे एक ।
मध्यें द्वैत दावी देख । प्रमाण काय मानावें ॥ २६ ॥
चाक कणा बैल फिरे । विहीर तों बैसलीसे स्थिर ।
रात्रंदिवस वाहे नीर । दरडी उग्याचि असती ॥ २७ ॥
अभ्र वाहे निरंतर । मुलें म्हणती पळतो चंद्र ।
जातें फिरे खुंटा स्थिर । नक्षत्रें फिरती नभ अचळ ॥ २८ ॥

देह प्रारब्धें हिंडे । आत्मा तो अचळ अखंड ।
बैल चाले लाट हेलपाटे उदंड । घाणा उगाचि फिरेना ॥ २९ ॥
म्हशीचीं शिंगें वांकडीं । दुधांत काय पडतसे अडी ।
तैशी कमान वांकुडी । तीर नीट असे कीं ॥ ३० ॥
अक्षर मातृका वांकडी । वाचेसी काय पडतसे अडी ।
पोरें खेळती वाघुली । बहु रेषा परि एक चिरा ॥ ३१ ॥
त्रिगुणीं गुंफिले जन । यालागीं स्वभाव त्यांचा भिन्न ।
साधु पाहती समान । गुण स्वभाव त्यागूनि ॥ ३२ ॥
द्रुमीं वांकडिया फार शाखा । परी वृक्ष एकचि देखा ।
तेवीं विश्वाचिया वर्तणुका । विश्वंभर स्वयें वसे ॥ ३३ ॥
यालागीं अद्वैत भक्ति । करितां लाभे सुखविश्रांति ।
हेची कवीची विनंति । भक्ती श्रेष्ठ सर्वांसी ॥ ३४ ॥
भक्तीस नलगे वर्णाश्रम । जो आचार तो उत्तम ।
ऐसा वदे पुरुषोत्तम । गीतेमाजीं स्वमुखें ॥ ३५ ॥
भावें वंदितां संतांचे मोचे । भक्तीनें नीचाचे जाहले उंचे ।
दोष जावया जन्मांतरींचे । आन उपाय असेना ॥ ३६ ॥

**सिद्धांतबोध, अध्याय ३५.**

**३६-३९** अध्यायांत ब्रह्ममुनींनीं भगवद्गीतेवर सुलभ शब्दांत संक्षिप्त व्याख्यान केलें आहे, तें अवश्य वाचण्यासारखें आहे. व्याख्यानाचे शेवटीं कवि म्हणतातः—

'नाहीं लिहिला विस्तार । सोडिला नाहीं बीजांकुर ।
श्रोते समजोत चतुर । दूषण न ठेवावें कवीतें ॥ १ ॥
मागें टीका फार जाहली । पुढती होतील भविष्यावळी ।
गीतासिंधु माउली । किती मेघ उपसिती ॥ २ ॥
एका दीपीं अनेक दीप लाविती । परी उणी नव्हे दीपज्योति ।
तेवीं गंगेच्या अर्थीं । अगाध अर्थ भरलासे ॥ ३ ॥
शर्करेच्या गिरीसी । काय नेतील मुंग्या गृहासी ।
या अर्थासी । किती एक कवी वदतील ॥ ४ ॥

धत्तूरपुष्प वाहोनी । संतोष कीजे पिनाकपाणी ।
तैसें म्यां बाळभाषणीं । संतांपुढें बोललों ॥ ५ ॥
सिंधुउदक सिंधूसी अर्पिती । तैसे तुमचे अर्थ तुम्हांप्रती ।
मालधनी संत असती । शहामुनी तेथें हमाल ॥ ६ ॥

पुढील दृष्टांत पहाः—

घूस उकरी मातीसी । प्राप्ति नसे कष्ट जीवासी ।
निरवणूक करी घरच्या माणसांसी । आपण चाले मसणखाईं ॥ १ ॥
काळफांसे बैसले कंठांत । घोर लागला जीवांत ।
चित्त ओढी मुलांच्या हितांत । आपुलें स्वहित सुचेना ॥ २ ॥
तैसी संसारभ्रांती पाहीं । मोकळाचि असतां आपुले ठायीं ।
जो लीन होऊनि गुंते देहीं । खाय हिंदोळे लटिकेची ॥ ३ ॥
सहज खेळतां सोंकटीं । विषाद वाढला हांव पोटीं ।
येरयेरां मारिती मुष्टी । लाभ नसतां फजिती ॥ ४ ॥
आपणचि तमाखू खाई । म्हणे गळां पडली सुटत नाहीं ।
हे अविद्येची नवाई । आपुले हातें आपण फसे ॥ ५ ॥
श्वान पाहोनि दर्पणाला । प्रतिबिंब पाहोनि भुंकेला ।
तैसा जगाचा गलबला । दुजें नसतां बरळती ॥ ६ ॥
उत्पत्ति-स्थिति-संहार । हाही काल्पनिक व्यवहार ।
बुडबुडा उद्भवे फुटोनी विरे । नीर स्वभावें आपणचि ॥ ७ ॥

\+ \+ \+ \+

शिवरात्र व्रत धरी कोल्हा । मढें उकरी फराळाला ।
ज्याचे अंगीं जो स्वभाव आला । तो त्यासी सुटेना ॥ ८ ॥

खालील सदुपदेश सर्व ग्रंथाचें सार आहेः—

शूरपणाचें हेंची फळ । गाळावा अभिमान प्रबळ ।
सर्वांसी बोलावें मंजुळ । त्यांत बरें हरी करी ॥ १ ॥
आपण असल्या निष्कपट । कुबुद्धीचें होय तळपट ।
जैसा भजनाचा उठल्या लोट । पापाचा ठाव उरेना ॥ २ ॥

सर्वांभूतीं पहावा भगवंत । हेंचि ईश्वराचें मनोगत ।
या बोधें साधुसंत । मुक्त असती संसारीं ॥ ३ ॥
सोडोनि निंदा–स्तवन । जनीं पहावा जनार्दन ।
हे सज्जनाचे श्रेष्ठ गुण । ज्यांत संतोषे जगदात्मा ॥ ४ ॥

शेवटच्या—५० व्या अध्यायांत, भगवद्गीतेवरील संस्कृत-मराठी टीकाग्रंथांचीं नांवें देऊन शहामुनि म्हणतातः—

टीका जाहल्या पुढती होती । ज्ञात्यांच्या मतीं प्रवेशती ।
पुढें न करावें हें वदती । अज्ञानाचें लक्षण ॥ १ ॥
गंगोदक मागें आतां खर्चिती । पुढें पशुपक्षी विश्व स्वीकारिती ।
त्यांत गंगोदक काय न्यून होती । सांगा विवेकी चतुर हो ॥ २ ॥
भूगर्भीं सुवर्णखाण । मागें काढिलें पुढती काढिती जन ।
मही काय उणें होऊन । पुरे म्हणे लोकांसी ॥ ३ ॥
विष्णूची करूनियां भक्ती । वैकुंठपुरीं केली वस्ती ।
आतां काय पुरे म्हणती । दाटी जाहली करूं नका ॥ ४ ॥
**देवाची भक्ती चोखामेळा करी । त्यास लोक धरिती दुरी ।**
**वैकुंठीं महारवाडा वेगळा करी । नांदावया तयासी ? ॥ ५ ॥**
**उंच नीच नदींत शिरोन । बाहेर निघती कुंभ भरोन ।**
**मग म्हणती स्पर्शों नको चला दुरोन । उदकांत उभयतां उभीं होतीं ॥ ६ ॥**

वरील शेवटच्या दोन ओव्यांत जातिद्वेषाच्या कल्पनेवर जी टीका केली आहे, ती फार मार्मिक आहे यांत संशय नाहीं.

शेवटीं, सिद्धांतबोध ग्रंथासंबंधानें कवि म्हणतातः—

ज्ञानबोध गुरूचा शिका । तेणें ग्रंथ रचिला नेटका ।
धरोनी भक्तीचा आवांका । आश्रय संतपायांचा ॥ १ ॥
गुरुगृहीं भरिला ज्ञानसिंधु । आम्ही घेतला एक बिंदु ।
जैसा चातकास आनंदु । अल्प उदकें होतसे ॥ २ ॥

भरोनि भागीरथीचें पाणी । रामेश्वरा जाती कावडी भरोनी ।
तेवीं ज्ञानभांडारांतून । किंचित् अर्थ दाविला ॥ ३ ॥
मनुष्य स्वीकारी अन्न शेर । मुंगीस राळ्याइतुकें पुरे ।
साधु कवितातरणी पसरे । आमुचें कवन दीपकालिका ॥ ४ ॥
संक्रातीचीं सुगडें घेऊनी । ज्याचें त्यास देती परतोनी ।
तेवीं संतवचनें आणोनी । ज्यांचीं त्यां समर्पिलीं ॥ ५ ॥

ह्या ओंव्यांवरून कवीची शालीनता अगदीं उत्तम प्रकारें व्यक्त होत आहे. वर दिलेल्या ओंव्यांवरून शहामुनीच्या ग्रंथाच्या स्वरूपाची वाचकांस बरीच कल्पना होईल असें वाटतें. सिद्धांतबोध हा ग्रंथ प्रत्यक्ष वाचून पाहण्याकडे वाचकांची प्रवृत्ति व्हावी, याच उद्देशानें हे इतके वेंचे दिले आहेत. शहामुनीच्या कांहीं शिष्यांचे अभंग 'गुरुकिल्लीचे अभंग' या नांवानें प्रसिद्ध आहेत, त्यांतले चार अभंग पुढें दिले आहेत:—

१

दंडवत माझें गुरुरायाचरणीं । सांगा निवडोनी मजलागीं ॥ १ ॥
मूळारंभीं आधीं कोण उद्भवलें । त्रिगुण जन्मलें कोण्या परी ॥ २ ॥
त्रिगुणांचीं नांवें कैशीं तीं असती । तत्त्वांची उत्पत्ती सांगा वेगीं ॥ ३ ॥
ॐकाराचा जन्म कोणापासोनियां । ॐकारापासोन कोण झालें ॥ ४ ॥
शहामुनीचा हा प्रश्न केला तुम्हां । समजावून आम्हा द्यावा वेगीं ॥ ५ ॥

२

दासाचा किंकर सांगतो तुजला । घ्यावा बा दाखला गुरूपाशीं ॥ १ ॥
मुळारंभीं आधीं माया हेचि झाली । तत्त्वें निर्मियेलीं जाण बापा ॥ २ ॥
रज–तम सत्त्व हेची बा त्रिगुण । सांगतों मी खूण तूजलागीं ॥ ३ ॥
ॐकाराचा जन्म तत्त्वांपासोनियां । ॐकारापासोनी आकाश झालें ॥ ४ ॥
शहामुनीचा हा प्रश्न फेडियला । आनंदचि झाला मजलागीं ॥ ५ ॥

३

काय संतीं आरंभिलें । बंदीं कोणासी घातलें ॥ १ ॥
किल्ला कशाचा बांधिला । खंदक कोण्या आसनाचा केला ॥ २ ॥

वैराग्याचें काय केलें । भांडें कशावर ठेविलें ॥ ३ ॥
तेथें काय बा वाजलें । एवढें सांगावें ये वेळे ॥ ४ ॥
शहामुनीच्या ह्या बोला । सत्य माना हो सकळा ॥ ५ ॥

४

आरंभोनी अचाट नेमा । बंदीं घालोनियां कामा ॥ १ ॥
दुर्ग वैऱ्याचा बांधिला । वज्रासनाचा खंदक केला ॥ २ ॥
वैराग्याचा महाल बांधून । बुरुज शांतीचा ठेवून ॥ ३ ॥
भांडें ठेविलें विवेकाचें । नाद उठती सोहळ्याचे ॥ ४ ॥
शहामुनीचें उत्तर । नका मानूं दुष्टोत्तर ॥ ५ ॥

---

## श्रीशुभराय महाराज.

हे महासाधु पेशवाईच्या अखेरीस सोलापूर येथें होऊन गेले. मोरोपंत व रामजोशी हे शुभरायांचे समकालीन होत. शुभराय हे ‘ सुबरावबावा ’ या नांवानें विशेष प्रसिद्ध असून, ते मूळचे मद्रासेकडील राहणारे असल्यामुळें, ‘ सुबराव ’ हेंच त्यांचें खरें नांव असावें असें वाटतें. ह्यांचा जन्म मद्रास इलाख्यांतील पसकोट प्रांतापैकीं माल्लूर नामक गांवीं शके १६४७ च्या सुमारास झाला. महाराजांच्या मातुश्रीचें नांव पन्नामा व तीर्थरूपांचें नांव गिरधरराय. हे जामदग्न्यगोत्री ब्राह्मण. महाराजांना शंकरराव नांवाचे वडील बंधु असून, त्यांच्या धाकट्या बंधूचें नांव चौंडाप्पा असें होतें. महाराज लहानपणापासून मोठे कुशल व व्यवहारनिपुण होते. टिपुसुलतानाच्या कारकीर्दींत ते पालखीपदस्थ असून, तिकडे त्यांनीं मोठ्या हुद्दयाचीं कामें केलीं होतीं. त्यांच्या पत्नीचें नांव सुबाका. त्यांना संतति असल्याचा कोठेंही उल्लेख आढळत नाहीं. महाराज आपल्या तारुण्यावस्थेंतच विरक्त होऊन व मोठ्या अधिकाराच्या जागेचा व

ऐश्वर्याचा त्याग करून पंढरपुरास आले. तेथें त्यांनीं सुमारें एक तप श्रीची सेवा एकनिष्ठपणें केली, तेव्हां भगवंतानें प्रसन्न होऊन, स्वप्नांत येऊन त्यांस असें सांगितलें कीं, श्रीचंद्रभागेच्या डोहांत अमुक ठिकाणीं माझी ब्रह्मदेवपूजित वालुकामय मूर्ति सांपडेल, ती घेऊन तिची सेवा कर व त्या मूर्तीचीच उपासना वाढीव.' त्याप्रमाणें महाराजांनीं ती मूर्ति डोहांतून काढून सोलापुरास आणली व तेथील मठांत तिची स्थापना केली. हल्लीं सोलापुर येथें महाराजांच्या मठांत जी मूर्ति आहे, तीच ही मूर्ति होय. पुढें महाराजांनीं तिमप्पा रामदासी यांजकडून गुरूपदेश घेतला. सोलापुरीं आल्यापासून त्यांनीं ध्यान, भक्ति, उपासना इत्यादि साधनांच्या योगानें पुष्कळ प्राकृत जनांस भक्तिमार्गास लाविलें. महाराज सगुणोपासक व अद्वैत भट्टभास्कर सांप्रदायी होते. पूजा—उत्सवादि उपचार निरंतर चालावेत म्हणून पेशव्यांनीं त्यांना कांहीं इनाम जमिनी देऊं केल्या होत्या, परंतु उत्पन्न असलें म्हणजे तंटे उपस्थित होऊन पूजा उत्सवादि उपचार बंद पडूं लागतील, असा दूरवर विचार करून त्यांनीं इनाम जमिनी घेण्याचें साफ नाकारिलें व भिक्षेवरच सर्व उत्सव चालविले. आज तागाईत हे उत्सव केवळ भिक्षेवर उत्तम प्रकारें चालले आहेत. रामनवमी, हनुमज्जयंति, नृसिंहजयंति, वसंतपूजा, आषाढी व कार्तिकी एकादशीस रथोत्सव, चातुर्मास्यांत प्रत्येक एकादशीस रथोत्सव व भजन, गोपाळकाला, कोजागरी, गोवर्धनोत्सव, वसंतपंचमी, रथसप्तमी इत्यादि सर्व ऋतूंतील निरनिराळे राजोपचारयुक्त उत्सव व व्रतें मोठ्या थाटानें महाराज करीत असत व त्यांच्या पुण्यबलानें हे सगळे प्रकार अद्यापपर्यंत तसेच चालू आहेत. शुभराय महाराज मोठे कुशल कारागीर होते; त्यांनीं स्वतः रंगवल्ली काढण्याकरितां केलेल्या कातरकामाचे नमुने अद्याप त्यांच्या मठांत आहेत, ते पाहून

मोठमोठे कारागीर थक्क होऊन जातात. चातुर्मास्यांत दर एकादशीस ज्या रथांतून श्रीची मिरवणूक काढण्यांत येते, तो रथ महाराजांनीं स्वतः तयार केलेला आहे. महाराजांचे शिष्य सुमारें २०० होते, त्यांपैकीं कांहीं शिष्यांचीं नांवें पुढें दिलीं आहेत:--

१ शेषाप्पा २ महादाप्पा ३ रावजीबुवा ४ वासुदेवशास्त्री दाते (यांनीं संन्यास घेतल्यावर अच्युताश्रम हें नांव धारण केलें.) ५ धाकोपंत (वास्तव्य वाटेगांव, यांचे शिष्यास वाटोजीबुवा म्हणतात) ६ बाळकृष्ण भट दाते. ७ माधवराव बरवे सोलापुरकर. ८ भाऊशास्त्री सोलापुरकर ९ बाप्पा राळेरासकर (प्रसिद्ध सत्पुरुष रमावल्लभदास यांचे वंशज) १० सिदापा अण्णा देशमुख ११ बाबा देशपांडे १२ हरिभट मोने १३ बूलचंद राठोड १४ भानंभट १५ शिवरामभट १६ दासंभट (महाराजांचे पुरोहित) १७ "वासुदेवबाबा जाईल। कोप तयाचा कोण साहिल ? । अनुग्रही शिष्या राहिल । म्हणूनि तोहि वर्णावा' १८ रावजी चांदवडकर १९ आबई २० व्यंका पारटकल २१ विठ्ठलप्रसाद २२ बाजीराव सिद्धापुरे २३ चिंतोपंत बारामतीकर २४ बापू बारामतीकर २५ श्रमाबाई २६ जिऊबाई २७ रुक्मा साळी २८ राजूबाई देगांवकर २९ चिमाबाई अयाचित ३० नाना सहस्रबुद्धे ३१ विठ्ठल भारती ३२ बाळा गवळी ३३ गोपाळ नाईक ३४ व्यंकोजी सावंता ३५ नुरुंदधा जंगम ३६ तिप्पा सराफ ३७ संताबाई ३८ सोमणा साळी ३९ शामासा खेत्री ४० देवजी ढंवारे ४१ रंगाप्पा पाडमुखे ४२ लिंबाई शिंपीण ४३ हेटासिंग बापू ४४ हिरण्णा पाणीभाते ४५ लक्ष्मण पाणीभाते.

ह्या शिष्यमंडळींपैकीं वासुदेव बाबा जाईल हे मोठे विद्वान् असून भगवद्भक्त होते. ह्यांचें तीन शास्त्रांचें अध्ययन झालें होतें. ह्यांनीं चतुःश्लोकी भागवत, वेणुगीत, पंचकोश इत्यादि प्रकरणांवर फार

सुबोध व प्रेमळ अभंग केले आहेत. ह्यांनीं शुभराय महाराजांवर संस्कृतांत कांहीं अष्टकेंही रचिलीं आहेत. वासुदेवबाबांनीं 'ब्रह्मी-भूताख्यान' नामक शुभरायांचें एक ओवीबद्ध चरित्र लिहिलें आहे, त्यांतूनच ही सगळी माहिती घेतली आहे. वासुदेव बाबांनीं स्वतःसंबंधानें सदर चरित्रांत दिलेली ओंवी मागें दिलीच आहे; ती वाचून वाचकांस मोठी मौज वाटेल, यांत शंका नाहीं. 'वासुदेव बाबा जाईल। कोप तयाचा कोण साहील?।' असें बाबाच स्वतः म्हणतात! बाबा मोठे वेदांती असून त्यांचें वक्तृत्व, गायनकलाभिज्ञता व कीर्तनशैली फार वर्णनीय होती अशी प्रसिद्धि आहे. ह्यांचीं कांहीं पदें काव्यसंग्रहांत प्रसिद्ध झालीं आहेत, तीं जिज्ञासूंनीं अवश्य पहावीं.

वरील शिष्यांपैकीं वासुदेव शास्त्री व त्यांचे चिरंजीव हे सोलापुर अदालतींत शास्त्र्याचे हुद्यावर होते. रावजीबुवा हे मूळचे बारामतीचे राहणारे असून, त्यांजवर कांहीं संकट आल्यामुळें ते सहकुटुंब शुभराय महाराजांचे सेवेस येऊन राहिले होते. त्यांनीं महाराजांची सेवा इतकी एकनिष्ठपणें केली कीं, त्यांचेच वंशजांकडे महाराजांनीं श्रीच्या सेवेचा अधिकार वंशपरंपरेनें दिला व त्याप्रमाणें हल्लीं रावजी बुवांचे नातु हरिभक्त जयकृष्णबुवा हे श्रीची उपासना चालवीत असून, सगळा मठाधिकारही त्यांजकडेच आहे. महाराजांचे दुसरे शिष्य लक्ष्मण पाणीभाते हे जातीचे साळी होते. हे शुभराय महाराजांच्या मूळच्या गांवाकडील राहणारे असून महाराजांचे सहाध्यायी होते. हे आपला देश सोडून व्यापारानिमित्त सोलापुरीं येऊन राहिले होते व तेथें त्यांनीं पुष्कळ द्रव्य संपादन केलें. पुढें महाराजांचे इच्छेप्रमाणें त्यांनीं आपली संपत्ति अनेक प्रकारच्या सत्कार्यांत खर्च केली. शुभराय महाराज पंढरपुराहून श्रीची मूर्ति

घेऊन पहिल्यानेंच सोलापुरीं आले, तेव्हां प्रथमतः लक्ष्मण पाणीभाते यांच्याशीं त्यांची गांठ पडली.

प्रसिद्ध कविवर्य रामजोशी हे शुभरायांचे समकालीन होते, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. जोशीबुवांच्या वक्तृत्वामुळें त्यांचा श्रोतृसमाज जसा वाढूं लागला, तशी त्यांच्या कीर्तनासाठीं विस्तृत जागेची आवश्यकता वाढूं लागली. जोशीबुवांनीं एकदां आपल्या कीर्तनासाठीं शुभरायांचा मठ मागितला असतां त्यांनीं तो दिला नाहीं; म्हणून हट्टानें त्यांनीं त्यांच्या मठासमोर कीर्तन केलें व त्या प्रसंगीं

'हट्टातटानें पटा रंगवुनि जटा धरिसि कां शिरीं। मठाची उठाठेव कां करी? ॥'

ही लावणी रचून म्हटली व तींत अखेर ' सदा हरि कविरायावर फिदा ' म्हणून आपली कडी वर ठेवून दिली! परमार्थदृष्टीनें पाहिल्यास जोशीबोवांपेक्षां महाराजांची योग्यता किती तरी पटींनीं अधिक होती; पण तारुण्य व छांदिष्टपणा यांच्या भरांत आपण एका थोर सत्पुरुषाचा विनाकारण अपमान करीत आहोंत, ही गोष्ट जोशीबुवांच्या लक्ष्यांत आली नाहीं, ही खेदाची गोष्ट होय. जोशीबुवांची तमासगिरी व चंगीभंगीपणा यांची महाराजांस पुरी माहिती असल्यामुळें त्यांनीं आपला पवित्र मठ त्यांस दिला नाहीं, यांत त्यांनीं कांहीं मोठासा अन्याय केला असें होत नाहीं. असो.

शुभरायमहाराजांचे अंगीं कवित्वशक्ति चांगल्यापैकीं होती, पण तिचा उपयोग त्यांनीं एखादा मोठा ग्रंथ लिहिण्याकडे केला नाहीं. त्यांनीं आपल्या आवडीच्या वेदांतविषयावर फक्त १४७ पदें रचिलीं आहेत व तीं उपमा, अर्थगौरव, पदलालित्य इत्यादि गुणांनीं युक्त अशीं आहेत. तुकारामबुवांच्या अभंगांप्रमाणें शुभरायांच्या एकेका पदावर तासचे तास निरूपण करितां येतें, इतका व्यापक अर्थ त्यांत भरला आहे. पुष्कळ हरिदास या पदांचा उपयोग कीर्तनांत करितात. आपल्या पदांचे शेवटीं महाराजांनीं आपल्या

नांवाचा बिलकूल उल्लेख केलेला नाहीं; 'श्रीगुरुदास्य' किंवा 'श्रीगुरूदास्यप्रसादें' हे शब्द त्यांच्या प्रत्येक पदाच्या शेवटीं आढळतात. महाराजांचीं कांहीं पदें काव्यसंग्रहांत प्रसिद्ध झालीं आहेत.

शुभराय सोलापुरीं आल्यावर, तेथें त्यांनीं श्रीची सतत ३६ वर्षें सेवा करून, आपल्या अनेक दैवी लीलांनीं सोलापुरवासीयांचीं मनें उपासनामार्गास लावून, अनेक पाखंडी जनांस हरिभक्तीची दीक्षा देऊन व आपण लाविलेल्या भक्तिमार्गाच्या रोप्याचा प्रचंड वृक्ष झालेला पाहून, शके १७४२, भाद्रपद वद्य नवमी दिवशीं पुष्य नक्षत्रीं, आपली इहलोकींची यात्रा संपविली. त्यावेळीं त्यांचें वय ७५।८० वर्षांचें होतें. महाराजांचे शिष्य माधवराव बरवे यांनीं काढलेली महाराजांची तसबीर मठांत आहे, ती पाहतां, महाराज चांगले सुस्वरूप व आजानुबाहु होते असें दिसतें; महाराजांना प्रत्यक्ष पाहिलेले लोकही त्यांचें असेंच वर्णन करीत असत, असें सांगतात.

श्रीशुभराय महाराजांचीं कांहीं पदें येथें देतों:—

१

अंत त्या सुखासि नसे म्हणुनि म्हणती संत रे ।
घडे यापरी जेव्हां स्वरूपीं सत्वाचा एकांत रे ॥ ध्रु० ॥
तदाकारवृत्तीसरिसें । स्वप्रकाश आत्मा विलसे ।
त्याच अंगें पाहणें पावे । तेथेंचि विश्रांत रे ॥ १ ॥
विषयभान जेथें शून्य । चित्त चैतन्य अनन्य ।
स्फुरे प्रत्यय जैसा दीप । मंदिरीं निवांत रे ॥ २ ॥
विघरे प्रसरित स्मृति । उर्वरित पूर्ण ज्ञाप्ति ।
कैसें तें बोलावें जें कां । स्फूर्तीचाहि प्रांत रे ॥ ३ ॥
दासभावें जगन्निवास । विश्वात्मत्वें ध्यातां त्यास ।
दे कृपेनें प्रतिती ऐसी । श्रीगुरु लक्ष्मीकांत रे ॥ ४ ॥

२

तें नव्हे तें नव्हे ज्ञान । म्हणुनि सूचविति श्रुति ।
प्रत्ययाचा प्रांत जें कां । अनुमानानें जाणाया जाती ॥ ध्रु० ॥
मिथ्यत्वें निरसुनि देह । साक्षी स्वयें निःसंदेह ।
आत्मतत्त्वें हेंचि ये रिती । जाणविती बोध रीति ॥ १ ॥
परावाणी जेथें मौन । त्या ठायासी न पावून ।
भाविति आपुलें आंग । अहंस्फूर्तीचीही स्फूर्ती ॥ २ ॥
आपण ठायींचा अकर्ता । निस्पृहत्वें बोलती वार्ता ।
कर्तृत्वसंस्कार द्वंद्वेंकरुनि । कासाविस होती ॥ ३ ॥
विश्व हें सर्वांगें गोड । न जाणुनी म्हणती जड ।
श्रीगुरुदास्यांविण जीव । मुक्त ऐसी धरिती धृति ॥ ४ ॥

३

ये रीतीं स्वरूपीं मति जागवि बरवी । जागें झाल्यावरि शब्द ज्ञानासी न मिरवी ॥ध्रु०
विक्षेप विस्मृतिवीण उर्वरित तुर्या । प्रत्यगात्मदृष्टि त्याच दृष्टीमाजी पुरवी ॥१॥
प्रसरित पाहणें आंगें हरपे जेव्हां । अस्तिप्रत्ययपणें अनुस्मृति उरवी ॥ २ ॥
श्रीगुरुदास्यप्रसादें जग हें । त्या अंगें उमजुनि जड भ्रांतिसि नुरवी ॥ ३ ॥

४

नित्य नित्य याच विचारें लाहें समाधान रे ।
जीवन्मुक्त पदवी तेव्हां बाणे यापरि ध्यान रे ॥ ध्रु० ॥
प्रत्यग्वृत्तींचा जो साक्षी । त्यातें सर्वात्मत्वें लक्षीं ।
लक्ष तन्मयपणें स्फुरणें हेंचि आत्मज्ञान रे ॥ १ ॥
कल्पित माया सत्ताहीन । भासे जेणें ते परिपूर्ण ।
विवर्त अधिष्ठान ऐक्य ज्ञान तें विज्ञान रे ॥ २ ॥
सांठवि विश्व चिन्मय चित्तीं । वितळे स्मृति पुढें राहे गति ।
ऐशा अखंड ध्यानीं उरे ध्याता ध्येय भान रे ॥ ३ ॥
कल्पुनि मग आपणासि देव । त्याच अंगें दास्यभावें ।
पाहें प्रेमें अनादि मुळिंचें । ऐसें अनुसंधान रे ॥ ४ ॥




५

श्रीगुरुबोध हृदयिं धरुनि । धांव तूं मना रे ॥ ध्रु० ॥
धांवत धांवत मागें पाहें । स्वरूपीं विश्रांति लाहे ।
तन्मय पावुनि मागुतिं । झेंपाव तूं मना रे ॥ १ ॥
दाहि दिशा एकसरें । फिरणें तें बहुत बरें ।
त्याहूनि पुढें निजपदासी । पाव तूं मना रे ॥ २ ॥
दिसे सर्व सांठवुनी । कांहीं तेथें नाठवुनी ।
दासपण टाकि सकल । हांव तूं मना रे ॥ ३ ॥

६

सर्व वासुदेवभजनिं । जाग तूं मना ॥ ध्रु० ॥
स्वानुभूति शक्तिसहित । सगुण–ब्रह्म व्यक्तिरहित ।
सर्वसाक्षि सर्वातीत । जाण रे ॥ १ ॥
जाणण्यांत आंत पुढें । चित्प्रकाश असे उघड ।
स्वानुभवें होउनि सुघड । वाग रे मना ॥ २ ॥
चिच्छक्ति करुन आपण । आपणा जो दावि त्रिगुण ।
त्यास हृदयिं सांठव करुनि । धाइं रे मना ॥ ३ ॥
हरिच स्वयें मूर्ति सगुण । हरिच स्वयें मूर्ति त्रिगुण ।
दासपणें हे गुरुखुण । पाव रे मना ॥ ४ ॥

७

माघारें पाहात चाल स्वरूपीं रमाया । राजयोगपथें साधन कराया ॥ ध्रु० ॥
तामस राजस वृत्ति निषेधुनी । सत्व निश्चल करीं प्रयत्न बरा या ॥ १ ॥
ज्ञानमात्रचि वृत्ति प्रकाश । धरिं हळुहळु अहंकृति विसराया ॥ २ ॥
रसास्वादसुख सारुनि परतें । वृत्तिवीण निजसुख अंगीं उमटाया ॥ ३ ॥
दासपणें निजप्रत्यय उरवीं । विश्वरूप श्रीहरिसी भजाया ॥ ४ ॥

ह्या पदांचा अर्थ सुलभ नाहीं, गहन आहे. आणि ह्यावरून शुभराय महाराजांचा अधिकार फार मोठा होता, हें अगदीं स्पष्ट होतें. आणि अशा अधिकारी पुरुषाकडून सामान्य प्रतीचें लौकिक कवित्व निपजेल, अशी अपेक्षा करणेंही प्रशस्त होणार नाहीं, हें सांगावयास नकोच.

---

## गोपाळ.

हा कवि शके १६९० (इ. स. १७६८) च्या सुमारास नेवासें येथें होऊन गेला. या कवीचें मराठी ओंवीबद्ध महाभारत पंढरपुर येथें रा. पांगारकर यांस मिळालें. त्या ग्रंथाच्या अनुशासनपर्वांत कवीनें स्वतःसंबंधानें थोडीशी माहिती दिली आहे, ती येणेंप्रमाणें:—

ओंव्या

पुण्योदकें या मेदिनी । प्रवरा नामें वर तटिनी ।
मोहनीरूपें चक्रपाणी । साक्षात् असे तटाकीं ॥ १ ॥
महालया नामें सत्क्षेत्र । भूमंडळीं परम पवित्र ।
सर्व पुराणांतरीं चरित्र । वर्णिलें असे द्वैपायनें ॥ २ ॥
मोहनीचरण पद्मभ्रमर । असे तेथें कविकिंकर ।
सेवूनियां प्रवरातीर । देवीलागीं ध्यातसे ॥ ३ ॥
शके सोळाशें नवती । सर्वधारी संवत्सर क्षितीं ।
फाल्गुनमास उत्तरतिथी । वद्य पंचमी जाणिजे ॥ ४ ॥
वारांमाजीं उत्तम वार । सोमनामें परमसुंदर ।
दानधर्म हा सविस्तर । मेदिनीं समाप्ती पावला ॥ ५ ॥

आपली कुलस्वामिनी म्हणून मातापुरनिवासिनी देवीस कर्णपर्वाच्या प्रथमाध्यांत कवीनें वंदन केलें आहे. कवीचे गुरु अनंत या नांवाचे कोणी सत्पुरुष होते व त्यांच्याच कृपेनें महाभारत ग्रंथ लिहिण्यास आपण समर्थ झालों, असें कवीनें उद्योगपर्वाच्या ७ व्या व २१ व्या अध्यायांत म्हटलें आहे:—

अनंतरूपेच्या पाल्हाळें । भारत वर्णिजे गोपाळें ।
ज्ञानदेवाच्या कृपाबळें । जैसा म्हैसा श्रुतीतें ॥

चिन्मय नगरींचा राजा । श्री अनंत सद्गुरु माझा ।
गोपाळ वंदोनी पदरजा । योग्य झाला वदावया ॥

' ज्ञानदेवांच्या कृपाप्रसादानें रेडा जसा वेदवक्ता झाला, त्याचप्रमाणें श्रीअनंतगुरूंच्या कृपेनें मी भारत–रचनेस समर्थ झालों; ' असें जें कवीनें म्हटलें आहे, त्यावरून त्याची शालीनता व गुरुभक्ति हे गुण अगदीं स्पष्टपणें दिसून येतात. गोपाळकवीचें जें महाभारत पंढरपुरीं मिळालें, तें अपूर्ण आहे; त्यांत पहिलीं चार व मधलीं सौतिक व स्त्री हीं दोन मिळून सहा पर्वें कमी आहेत. ज्या गृहस्थांच्या संग्रहीं हा ग्रंथ आहे, त्यांनीं त्यांत मुक्तेश्वरांचीं पहिलीं चार पर्वें घालून तो ग्रंथ पूर्ण करून घेतला आहे. कदाचित्, मुक्तेश्वरांचीं पहिलीं चार पर्वें आपल्या ग्रंथास जोडून गोपाळ कवीनें पुढील पर्वें रचलीं असतील. पण मुक्तेश्वरी भारताचा उल्लेख कवीनें आपल्या उद्योगपर्वाच्या आरंभीं केला नसल्यामुळें ही कल्पनाही बरोबर दिसत नाहीं. उलट उद्योगपर्वाच्या आरंभीं गोपाळ कवि म्हणतातः—

विराटपर्व समाप्त मागें । आतां उद्योग अवलंबिला उद्योगें ।
जेवीं पूर्णिमेसी कुमुदरंगें । मावळतां होय सूर्योदयो ॥ २२ ॥

यावरून गोपाळकवींनीं संपूर्ण महाभारत लिहिलें, हें अगदीं स्पष्ट होत आहे. नेवाशाकडील शोधकांनीं त्या प्रांतांत शोध करून गोपाळकवीचा हा संपूर्ण ग्रंथ शोधून काढावा.

गोपाळकृत महाभारत हा ग्रंथ फारच विस्तृत आहे. त्याचीं जीं तेरा पर्वें उपलब्ध आहेत, त्यांची ओंवीसंख्या पुढें दिली आहेः—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ उद्योगपर्व | अध्याय | २१ | ओंव्या | १४६९ |
| २ भीष्मपर्व | ,, | १० | ,, | २८७३ |
| ३ द्रोणपर्व | ,, | ३४ | ,, | ४७९९ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ४ | कर्णपर्व | ,, | १८ | ,, | २५९४ |
| ५ | शल्यपर्व | ,, | ६ | ,, | ८९९ |
| ६ | गदापर्व | ,, | ७ | ,, | १०१५ |
| ७ | शांतिपर्व | ,, | ७९ | ,, | १२६८० |
| ८ | अनुशासनपर्व | ,, | ५० | ,, | ९७७० |
| ९ | अश्वमेधपर्व | ,, | १५ | ,, | २५१० |
| १० | आश्रमवासीपर्व | ,, | ६ | ,, | ८९९ |
| ११ | मौसळपर्व | ,, | २ | ,, | ३६२ |
| १२ | महाप्रस्थानिकपर्व | ,, | १ | ,, | १६७ |
| १३ | स्वर्गारोहणपर्व | ,, | २ | ,, | २४७ |
| १३ | | | २६१ | | ४२२१४ |

पहिलीं चार व मधलीं सौतिक व स्त्री हीं दोन मिळून सहा पर्वें कमी आहेत. हीं पर्वें सांपडल्यास गोपाळकवीच्या भारताची ओंवीसंख्या निदान साठ हजारांवर सहज जाईल असें वाटतें. शांतिपर्वाचा गोपाळकवीनें फार विस्तार केला आहे. या पर्वाचीं त्यांनीं तीन कांडें केलीं आहेत. तीं अशीं:—( १ ) राजधर्म अध्याय २८, ओंव्या ४३२०; ( २ ) आपद्धर्म अ० १९, ओंव्या २०४७; व ( ३ ) मोक्षधर्म, अ० ३६, ओंव्या ६३१३.

महाभारताशिवाय गोपाळकवीचे पुढील तीन ग्रंथ रा. पांगारकर यांजपाशीं आहेत:—( १ ) महालयामाहात्म्य, अ० २०; ( २ ) मल्हारीमाहात्म्य, अ० ८; व ( ३ ) व्यंकटेशमाहात्म्य, अ० १०. याशिवाय गोपाळकवीचे आणखी कांहीं ग्रंथ असण्याचा संभव आहे व यावरून गोपाळकवींनीं जवळजवळ एक लक्ष कविता लिहिली असावी, असें म्हणण्यास हरकत नाहीं. गोपाळकवीची कविता मुक्तेश्वराच्या तोलाची नाहीं, तरी बरीच उच्च प्रतीची

आहे. त्यांच्या कवितेंत प्रसाद आहे, कवित्व आहे व तत्कालीन श्रोत्यांस ती चांगली प्रिय झाली होती, असें कवींच्या पुढील उद्गारांवरून दिसतें:—

प्रफल्लित साहित्य कमळें । घमघमीत अर्थपरिमळें ।
सज्जनभ्रमर भाक्तिमेळें । आमोद घेती आवडीनें ॥ १ ॥
येणें परमानंद निरंतर । विसरलें विषय व्यवहार ।
सार्वकाळ प्रेमें उद्गार । हरिहरस्मरणाचे ॥ २ ॥

अनुशासनपर्व, अ. १

इतर महाराष्ट्र भारतकवींप्रमाणें गोपाळकवीनेंही मूळ महाभारतकर्त्या श्रीव्यासांची व भारताची यथायोग्य स्तुति प्रसंगवशात् केली आहे.

' श्रीभारत नंदनवन । विद्वज्जनाचें क्रीडास्थान '

हे कवीचे उद्गार किती समर्पक आहेत! पुढें कवि म्हणतात:—

भारतकथारत्नांचें भांडार । निर्मळ दशे क्षीरसागर ।
प्रमेय सुगंधाचा सुंदर । मलयागिरी त्रिलोकीं ॥ १ ॥
श्रवणें सर्वेंद्रियां तृप्तता । सायुज्यमुक्ति चढे हाता ।
तेवींच जन्म–मरण वार्ता । स्वप्नांतरीं नाढळे ॥ २ ॥
इति भारतसमुद्र । जेथें जन्मला चातुर्यचंद्र ।
साहित्यकिरणें हा समुद्र । श्रोते चकोर तोषती ॥ ३ ॥

अनुशासनपर्व, अ० ४०.

श्रीव्यासांचा भारत रचण्यांत कोणता हेतु होता, हें कवी सांगतात:—

' स्त्रीशूद्रांतें श्रुतिश्रवण । नसे, या लागीं द्वैपायन ।
कृपादृष्टीं भारत–व्याख्यान । कारिता झाला दीनार्थी ॥ १ ॥

गोपाळकवींनीं आपल्या द्रोणपर्वाला बराच मोठा उपोद्घात जोडला आहे; त्यांत प्रथमच देवास अनुलक्षून ते म्हणतात:—

ताम्रनाणें कनकाचळा । थिल्लरोदकें गंगाजळा ।
सन्मुख मार्तंड मंडळा । दर्पण जेवीं दाविजे ॥ १ ॥
तेविं हे माझी आर्ष वाणी । नित्य रुळो तुझ्या चरणीं ।
मज मूढाचिया वदनीं । कवित्ववैभवं सांठवीं ॥ २ ॥

ईश्वरावर पूर्ण विश्वास, सर्व कर्में ईश्वरार्पण करण्याची बुद्धि व स्वतःसंबंधानें अकर्तृत्वबुद्धि हे जे आमच्या जुन्या मराठी कवींचे सामान्य गुण, त्यांस गोपाळकवीही अपवादक नाहींत, हें वरील ओंव्यांवरून स्पष्ट होत आहे.

गोपाळकवींनीं आपल्या ग्रंथांत पुढील कवींस नमन केलें आहे.

व्यासवाल्मीकि वसिष्ठ । जैमिनी गौतम श्रेष्ठ ।
श्रीधर शंकराचार्य वरिष्ठ ॥ गौडपाद कपिल ऋषि ॥ १ ॥.
प्राकृत कवि ज्ञानदेव । सिंधुसारिखें बुद्धिवैभव ।
एकनाथ जनार्दन स्वयमेव । जातवेदाही मुक्तेश्वर ॥ २ ॥

यांत मुक्तेश्वरांस ‘ जातवेदा ’ म्हटलें आहे; यावरून मुक्तेश्वर हे अग्नीचा अवतार होते, अशी तत्कालीन लोकांची समजूत असावी असें वाटतें. मुक्तेश्वरांचें काव्य अत्यंत उज्ज्वल–तेजस्वी असल्यामुळें, कांहीं लोकांनीं तशी कल्पना लढविली असल्यास त्यांत मोठेंसें आश्चर्य नाहीं. मुक्तेश्वरी भारत श्रीधराप्रमाणें गोपाळ कवींनींही काळजीपूर्वक वाचलें होतें. मुक्तेश्वराची ओंवी, वामनाचा श्लोक व मोरोपंतांची आर्या यांचें अनुकरण पुष्कळ महाराष्ट्र कवींनीं केलें आहे. गोपाळकवींची एकंदर कविता पाहिली म्हणजे, ती रचतांना मुक्तेश्वरी भारत कवीच्या कानांत गुणगुणत असलें पाहिजे, असें वाटल्याशिवाय राहत नाहीं. महाभारतांत निरनिराळ्या तीन प्रसंगीं नीतिकथन केलें आहे, असें मुक्तेश्वरांनीं आपल्या सभापर्वांत म्हटलें आहे. सभापर्वांत नारदनीति; उद्योगपर्वांत विदुरनीति; व भीष्मपर्वांत कृष्णनीति–भगवद्गीता. गोपाळकवींनींही

आपल्या उद्योगपर्वांत ह्या तीन्ही नीतींचा उल्लेख केला आहे. मुक्तेश्वरांची नारदनीति व कृष्णनीति—भगवद्गीता प्रसिद्धच आहे; त्याचें उद्योगपर्व सांपडल्यास विदुर—नीतीही सांपडेल. गोपाळकवींनीं आपल्या उद्योगपर्वाच्या पांचव्या अध्यायांत विदुरनीति; व भीष्मपर्वाच्या ४—८ अध्यायांत कृष्णनीति वर्णिली आहे. मोरोपंतांनीं ह्या तिन्ही नीति आपल्या भारतांत गाळल्या असून, मुख्य कथाभागाकडेच विशेष लक्ष्य दिलें आहे. भगवद्गीतेवर वामनी समश्लोकी टीकेच्या आधारानें लिहिलेला पंतांचा स्वतंत्र ग्रंथ आहे; पण आपल्या भारतांत त्यांनीं असले प्रसंग बहुधा विस्तारानें वर्णिलेले दिसत नाहींत. श्रीधरांनीं आपला पांडवप्रताप संक्षेपरूपानें लिहिला असल्यामुळें, मुख्य कथाभागाशिवाय इतर गोष्टींस त्यांनीं फारसा थारा दिलेला नाहीं; तथापि त्यांची प्रवृत्ति नीत्युपदेशाकडे विशेष असल्यामुळें त्यांनीं असले नीतिकथनाचे प्रसंग वांयां जाऊं दिले नाहींत. असो; मुक्तेश्वरांनीं आपल्या आदिपर्वाच्या ४४ व्या अध्यायांत पांडवपराक्रमावर तरुण पुरुषाचें व कौरवसेनेवर नववधूचें सुंदर रूपक केलें आहे; हेंच रूपक गोपाळ कवींनीं थोड्या निराळ्या शब्दांत जशाचें तसें दिलें आहे:—

अबला वधू कुरुचमू । नूतन पुरुषार्थ विक्रमू ।
रणासन संघट्टणीं श्रमू । पावोनि पळे लाग वेगें ॥ १ ॥
लज्जावसन तें गळालें । धैर्य केश मोकळे झाले ।
शूरत्वता बोल त्यागिले । त्रास पावोनि भूपाळा ॥ २ ॥

गोपाळकवींचें भारत रसिकांच्या वाचनास सर्वस्वी पात्र आहे. त्यांच्या पहिल्या पर्वापेक्षां पुढचीं पर्वें अधिक सरस आहेत. शांति व अनुशासन या दोन पर्वांचा तर कवीनें फारच विस्तार केला आहे, तरी हींही पर्वें चांगलीं उतरलीं आहेत. भीष्मपर्वांतली समश्लोकी गीता व अनुशासनपर्वांतली विष्णुसहस्रनामावरील विस्तृत

टीका ( ओंवीसंख्या ११११९ ) हीं प्रकरणें तर विशेष वाचनीय आहेत. ' विश्वं विष्णुर्वषट्कारो ' या श्लोकांतल्या ' विश्वं ' शब्दावरील टीका पहा:—

विशती नामें प्रवेश कर्ता । कारणांतरीं ज्याची सत्ता ॥ १ ॥
संहारकाळीं जग समस्त । ज्या माजी रिघे तें ब्रह्म स्वस्त ।
विश्वीं विस्तारिलें अपरिमित । घृतकणिका यापरी ॥ २ ॥
कार्यरूपें तोचि कारण । परी कारणाहूनि असे भिन्न ।
हृदयीं निष्कामता पूर्ण । या लागीं विश्व बोलिजे ॥ ३ ॥

विष्णुसहस्त्रनामावरील गोपाळकवींची ही टिका कै. परशुरामपंत तात्यांच्या अवलोकनांत आली असती तर आपली ' नामार्थदीपिका ' रचण्याचा उद्योग त्यांनीं केला नसता असें वाटतें, असो.

अनुशासनपर्व, अ० १० मध्यें, स्वर्गगामी व निरयगामी यांच्यासंबंधानें सविस्तर विचार केला आहे; अ० ११ मध्यें गंगामाहात्म्य वर्णिलें आहे; १४ मध्यें स्त्रियांचें वर्णन केलें आहे व अ० ४२ मध्यें स्त्रीधर्म उत्तम प्रकारें सांगितला आहे.

'उदरबिळीं क्षुधासर्पिणी । पीडा करिते सर्वांलागुनी । '

अशासारखीं मुक्तेश्वरी पद्धतीचीं रूपकें गोपाळकवीच्या ग्रंथांत सर्वत्र आढळतात.

गोपाळकविकृत महाभारतांतले आणखी कांहीं उतारे येथें दिले पाहिजे होते, पण तो ग्रंथ मला अद्याप मिळाला नाहीं. काय करावें ?

---

## भारती विश्वनाथ.

हा कवि जातीचा न्हावी होता, असें त्याच्या ग्रंथावरून वाटतें. ह्याचा ' नाभिकपुराण ' या नांवाचा एक ग्रंथ छापून प्रसिद्ध झाला आहे, त्याचे १३ अध्याय असून ओंवीसंख्या १६३४ आहे. ह्या

ग्रंथात न्हावी जातीची उत्पत्ति, पौराणिक काळांतील त्या जातीचें महत्व, त्या जातीनें पाळावयाचे निर्बंध, इत्यादि गोष्टींसंबंधानें आदिपुराणाच्या आधारानें, फार विस्तृत माहिती दिली आहे. कवीनें ग्रंथसमाप्तीचा काल शके १२६० दिला आहे, परंतु ग्रंथाच्या एकंदर रचनेकडे व भाषेकडे पाहिलें म्हणजे हा ग्रंथ फार तर शंभर दोनशें वर्षांपूर्वी लिहिला गेला असला पाहिजे, असें निश्चयपूर्वक अनुमान होतें. ग्रंथाची भाषा फार सुलभ असून, त्यांतील एक सबंध अध्याय तर केवळ हिंदी भाषेंत लिहिलेला आहे. ग्रंथाच्या शेवटीं जो काळ दिला आहे, त्याच कालीं जर हा ग्रंथ लिहिला गेला असता, तर त्यांत ज्ञानेश्वरींतल्यासारखे पुष्कळ कठीण मराठी शब्द असले पाहिजे होते. त्याचप्रमाणें, मुसलमान लोकांच्या चालीरीतींचें व भाषेचें जें ज्ञान प्रस्तुत कवीनें प्रगट केलें आहे, तें शके १२६० तल्या मराठी कवीस प्रगट करितां येणें मुळींच शक्य नाहीं. कवीनें स्वतःच्या ग्रंथासंबंधानें प्रथमाध्यायांतच पुढील माहिती दिली आहे:—

## ओव्या.

"ऐसी वंदूनि ब्रह्मदुहिता । आतां नमावें श्रीगुरुदत्ता ।
ऐसें अंतरामाजीं भावितां । दत्त प्रत्यक्ष प्रगटला ॥ ४ ॥
तयाचें स्वरूप पाहुनी । प्रणिपात केला असे चरणीं ।
तंव तो मस्तकीं ठेवूनि पाणि । मजलागूनी बोलत ॥ ५ ॥
ह्मणे हे भारती विश्वनाथा । जयजयकार असो सर्वथा ।
अंतरामाजी मजसी तत्त्वता । भावें तुवां आठविलें ॥ ६ ॥
म्हणोनाचि म्यां तुजलागुन । वेगें दिधलें प्रत्यक्ष दर्शन ।
तरी मनींचें गुज संपूर्ण । निवेदन करीं पां ॥ ७ ॥
ऐसें दत्ताचें ऐकतां वचन । अंतरामाजीं हर्ष पावुन ।
म्हणे श्रीगुरो आजि आपण । दिधलें दर्शन कृपेनें ॥ ८ ॥

म्हणोनि सकळ जगाभीतरीं । कृतकृत्य झालों निर्धारीं ।
तरी तूं आतां मदिच्छा सत्वरीं । पूर्ण करीं दातारा ॥ ९ ॥
'तुजवांचून कोण इतर । इच्छा माझी पुरविणार ?' ।
ऐसी विनंति करुनि सादर । प्रश्न सुंदर केला असे ॥ १० ॥
अगा स्वामिया **श्रीगुरुदत्ता** ! । महाप्रळय झाला असतां ॥
पुनरपि शंभु स्वयें तत्त्वतां । कैसा उत्पन्न जाहला ? ॥ ११ ॥
आणि ब्रह्मा विष्णु सहस्रवदन । कैसे झाले तयापासून ।
चारी खाणी सृष्टि संपूर्ण । कैसी उत्पन्न जाहली ? ॥ १२ ॥
इत्यादि सर्व विस्तारून । सांगे स्वामिया मजलागुन ।
ऐसें माझें प्रश्नवचन । ऐकूनि दत्त बोलिला जें ॥ १३ ॥
तेंचि मी आतां सर्व जनांसी । समग्र कथितों ग्रंथरूपेंसी ।
तरी श्रोतीं सावधांतरेंसी । भक्तिभावें ऐकिजे ॥ १४ ॥

कवि म्हणतो ' श्रीक्षेत्र गाणगापुर येथें श्रीदत्तात्रयांनीं मला प्रसन्न होऊन न्हावी जातीच्या उत्पत्तीसंबंधानें जें वृत्त कथन केलें; तें मीं या ' नाभिकपुराण ' ग्रंथांत न्हावी लोकांच्या उपयोगासाठीं विस्तारानें ग्रथित करून ठेविलें आहे. वर दिलेल्या अवतरणांच्या भाषेवरून हा कवि किती अर्वाचीन असला पाहिजे. याची कल्पना वाचकांस सहज होईल. ग्रंथाच्या शेवटीं जो १२६० शक दिला आहे, तो छापणाराच्या चुकीनें पडला असून त्या ठिकाणीं १७६० किंवा फार तर १६६० हा शक असावा असें वाटतें. असो. येथपर्यंत दिलेल्या माहितीपेक्षां प्रस्तुत कवीची आणखी कांहींएक माहिती उपलब्ध नाहीं. त्याचा ' नाभिकपुराण ' हा ग्रंथ जरी विशेषेंकरून आमच्या नापितबंधूंसाठींच लिहिण्यांत आला आहे, तरी तो इतर जातीच्या लोकांनींही अवश्य वाचण्यासारखा आहे. कवीची वाणी प्रायः शुद्ध, सरळ आणि सुलभ अशी आहे. मद्यपान, मांसभक्षण इत्यादि बाबतींत स्वजातीय लोकांसाठीं त्यानें जे निर्बंध घातले आहेत, ते इतर

जातींच्या लोकांनींही अवश्य पाळण्यासारखे आहेत. इंग्रजी राज्या-पूर्वीं, आमच्या देशांतील कनिष्ठ जातींच्या लोकांस शिक्षण जरी फारसें सुलभ नव्हतें, तरी त्यांच्यापैकीं ज्या थोड्या लोकांस तें मिळत असे, ते चांगलेच विद्वान् आणि रसिक निपजत असत, ही गोष्ट अवचितसुत काशी, शहामुनि, भारती विश्वनाथ, मैनानाथ इत्यादिकांच्या उदाहरणावरून उत्तम प्रकारें सिद्ध होते.

आतां भारती विश्वनाथाच्या ' नाभिकपुराण ' ग्रंथांतले कांहीं उतारे येथें देतों; म्हणजे हा लेख पूर्ण होईल.

न्हावी जातीचा मूळ पुरुष जो नाभिक त्याच्या उत्पत्तीसंबंधानें विश्वनाथ भारती यांनीं पुढील कथा सांगितली आहेः—

**ओंव्या.**

' शंभूच्या हृदयीं विष्णु । विष्णूच्या नाभीं ब्रह्मतनु ।
शुद्ध हृदयीं जन्मला विष्णु । म्हणोनि तया शुद्ध म्हणती ॥ ६२ ॥
तयापासूनि जन्मला ब्रह्मा । म्हणोनि पावला ब्राह्मण नामा ।
जो सर्वदा सृष्टिकामा । चालवीतसे ॥ ६३ ॥
ऐसें ब्रह्मयासी जन्म झालें । स्वरूपीं स्वरूप प्रकाशलें ।
तया पाहुनि मन वहिलें । आनंदलें शंभूचें ॥ ६४ ॥
तंव विष्णु म्हणे जाश्वनीळा ! । ममनाभीं ब्रह्मा जन्मला ।
तुवां काथिलें अवलीला । तैसें प्रत्यया आलें पैं ॥ ६५ ॥
परी हें माझें नाभिकमळ । अष्टपत्रीं असे निर्मळ ।
तयामाजी हा ब्रह्मा केवळ । उत्पन्न जाहला ॥ ६६ ॥
तरी यासी ब्राह्मणपण । आति पवित्र असे जाण ।
म्हणोनि आदि मौंजीबंधन । अवश्य केलें पाहिजे ॥ ६७ ॥
ऐशिये विष्णूच्या बोला । ऐकूनि शंभु प्रसन्न झाला ।
मग तया वेद अर्पिला । सकळही ॥ ६८ ॥

\+ \+ \+ \+

‘ परी व्रतबंधावांचुनीं । द्विजत्व नव्हे कदा जाणीं ।
यालागीं त्वां वेद अर्पुनी । मौंजीबंधन करावें ’ ॥ ८० ॥
ऐसें विष्णु बोलिला । ऐकूनि शंभु विचारीं पडला ।
कीं कमळनयन जें वदला । तेंचि सत्य असे पैं ॥ ८१ ॥
परी शिखासूत्रावांचून । द्विजत्व नये कदा पूर्ण ।
द्विजावांचून वेदपठण । इतरां नव्हेची ॥ ८२ ॥
तरी आतां ब्रह्मयासी । शिखा प्राप्त होईल कैसी ? ।
एवं प्रकारें आपुल्या मानसीं । विचार करीतसे ॥ ८३ ॥
तंव एक विचार सुचला । कीं शेष आहे कंठमाळेला ।
तयाहस्तें कार्यभाग भला । साधेल सर्वही ॥ ८४ ॥
मग शेषासी बोलावूनि जवळी । म्हणे तूं जन्मलासी नाभि
तरी सांकडें फेडीं ये वेळीं । सकळ माझें ॥ ८५ ॥
तुवां जन्मावें नाभीपासून । तुज अष्टांगीं देतील मान ।
ऐसे रीतीं तो त्रिनयन । शेषाप्रति बोलिला ॥ ८६ ॥
मग शेष म्हणे ‘ त्रिनयना । कैसें जन्मावें नाभिस्थाना ।
जन्म घेतां काय आपणा । प्राप्ति होईल ? ’ ॥ ८७ ॥
शंभु म्हणे शेषालागून । तूं मज आवडता प्राणाहून ।
तुज न विसंबें कदा जाण । पावसी मान सर्वत्र ॥ ८८ ॥

× × × ×

ऐसें बोलिला शंकर । तंव विष्णु बहु सादर ।
शेषाप्रति अतिमधुर । बोलत कीं ॥ ९९ ॥
तूं सखा आमुचा जाण । जन्मलासि शंभूपासून ।
तुज मजसीं बंधुपण । आहेचि निर्धारें ॥ १०० ॥
तरी आमुच्या कार्यसाधनीं । साह्य करावें त्वां अनुदिनीं ।
तुजवांचून आम्हां निदानीं । साह्य कोणी नाहींच ॥ १०१ ॥
आमुच्या कार्याकारितां साह्य । सर्वत्र प्राप्त होय विजय ।
ऐसा अंतरामाजीं निश्चय । करूनियां राहें तूं ॥ १०२ ॥

सकळ तीर्थीं तुजसी जाण । सर्वदा देतील सन्मान ।
गोहत्यादि पापें संपूर्ण । तुझे हस्तें निरसती ॥ १०३ ॥
आणि भ्रताराविण ज्या नारी । अति अपवित्र निर्धारीं ।
तयांची शुद्धि तुझेनि करीं । होईल जाण ॥ १०४ ॥
देव दानव यक्ष किन्नर । चारी वर्ण याती समग्र ।
तुझेनि हस्तें अतिपवित्र । जगामाजीं होतील ॥ १०५ ॥
आणि जोगी संन्यासी । मुनिजन आणि संत ऋषी ।
ते उद्धरतील तव हस्तेंसी । निश्चयें ' ॥ १०६ ॥
ऐसें बोलिला लक्ष्मीरमण । तंव शंकर हाक मारून ।
म्हणे ' शेषा ! तुजवांचून । कार्य नव्हे आमुचें ॥ १०७ ॥

× × × +

तरी आतां मम नाभि सुंदर । दशपाकोळिका कमळ पवित्र
तेथें घेऊनियां अवतार । कार्यभाग संपादीं ' ॥ ११२ ॥
ऐसें शिवाचें ऐकूनि वचन । शेष झाला आनंदपूर्ण ।
मग नाभिकमळापासून । मनुष्यरूपें उद्भवला ॥ ११३ ॥
श्रीशंभूच्या नाभिस्थानीं । तीर्थस्थान कुंडालिनी ।
तेथें उद्भवला असे म्हणोनी । गोत्र कौंडिण्य तयाचें ॥ ११४ ॥
तया देखोनी सर्वोत्तम । आनंदला असे परम ।
नाभीपासूनि पावला जन्म । म्हणोनि नाभिक नाम ठेविलें ॥ ११५ ॥

हा नाभिकच नापित जातीचा मूळ पुरुष होय. आपली जात सर्व जातींत कशी श्रेष्ठ आहे, तीर्थक्षेत्रांत, लग्नकार्यांत नापिताशिवाय लोकांचें कसें चालत नाहीं, इत्यादि गोष्टींचें जें प्रतिपादन कवीनें केलें आहे, त्यास मूळ कोणत्या संस्कृत ग्रंथाचा आधार आहे, याचा शोध मीं केला नाहीं; परंतु सदर प्रतिपादन आणि तें करितांना लढविलेला कोटिक्रम हीं इतकीं विलक्षण हास्यरसोत्पादक आहेत कीं, त्यांचें वास्तविक स्वारस्य समजून घेण्याची ज्यांस जिज्ञासा असेल, त्यांनीं सदर कवीचा ' नाभिकपुराण ' हा ग्रंथ एकवार अवश्य

वाचला पाहिजे; ग्रंथवाचनांत जाणारा काळ खात्रीनें व्यर्थ नाहीं, हें मी स्वानुभवानें सांगतों. अस्तु.

न्हावी जातीच्या लोकांचें नित्यवर्तन कसें असावें, सांगतातः—

**ओंव्या.**

नित्य प्रभातीं उठोन । करोनि शौच मुखमार्जन ।
तदनंतर यथाविधीनें । शुद्ध स्नान कीजिये ॥ ३० ॥
नेसोनियां शुभ्र वसन । कपाळीं टिळक लाविजे जाण ।
मग शिवाचें ध्यान करून । भक्तिभावें कीजिये ॥ ३१ ॥
ऐसें करोनि नित्यकर्मासी । मग घेऊनियां आउतांसी ।
क्षौरकर्म करावयासी । आरंभ कीजिये ॥ ३२ ॥
आणि सर्व नाभिकवंशांनीं । प्रभातीं स्नान केल्यावांचूनी ।
क्षौरकर्म करावयालागुनी । जरी आरंभ केला पां ॥ ३३ ॥
तरी एकविंशति पूर्वजांसहित । कल्पपर्यंत रौरवीं पचत ।
असें शिवाचें असे भाषित । सत्य सत्य त्रिवाचा ॥ ३४ ॥
यालागीं सर्व नाभिकांनीं । प्रातःकाळीं स्नान करोनी ।
मग कीजे क्षौरालागुनी । ऐसा निर्धार केला असे ॥ ३५ ॥

× × × ×

या सकळ त्रैलोक्यांत । ईश्वरें केले सर्व पदार्थ ।
परी तयांत शुद्ध बहुत । आणि अशुद्धही असती पां ॥ ४३ ॥
परी त्या अशुद्ध पदर्थांभीतर । मद्य असे निंद्य फार ।
म्हणोनि तयालागीं चतुर । सकळही वर्जिती ॥ ४४ ॥
मद्यपानासमान । दुसरें पातक नाहीं जाण ।
इतर पापांसी सोडवण । प्रायश्चित्तें होतसे ॥ ४५ ॥
परी मद्यप्राशनकर्त्यासी । सोडवण नाहीं निश्चयेंसीं ।
धर्मशास्त्रीं मद्यप्यासी । एक प्रायश्चित्त कथिलेंसे ॥ ४६ ॥
तें म्हणसी कवण । तरी सांगतों तुजलागुन ।
उत्तम शीसक तापवून । मद्यप्यालागून पाजावें ॥ ४७ ॥

तेणें सुरापानाचा दोष । तत्काळ होय निःशेष ।
परी तो मुकतो प्राणास । त्या तप्त शीसकरसानें ॥ ४८ ॥
ऐसे देहांत प्रायश्चित्त । कथिलें असे धर्मशास्त्रांत ।
यावांचुनि अन्य निश्चित । नाहीं जाण सांगितलें ॥ ४९ ॥
सकळ पापांमाजी विशेष । मद्यपानाचा असे दोष ।
यालागीं तयासी निःशेष । सर्वी दूरचि टाकावें ॥ ५० ॥
ऐसें अतिनिंद्य मद्यपान । म्हणोनि शिवें नाभिकालागुन ।
कथिलें कीं तंववंशिकीं जाण । मद्यप्राशन न करावें ॥ ५१ ॥
आणि मम आज्ञा उल्लंघोनी । जरी ते रमतील मद्यपानीं ।
तरी सहस्र पूर्वजां घेऊनी । अधःपतनीं पडतील ॥ ५२ ॥
तेथूनि तयांसी मुक्तता । कल्पपर्यंत नव्हे सर्वथा ।
यालागीं तववंशिकीं तत्त्वता । मद्यपान वर्जावें ॥ ५३ ॥
जे मद्यप्राशन करिती । तयांलागीं यमदूत नेती ।
आणि कुंभिपाकीं टाकूनि निश्चितीं । दुःख देती बहुसाल ॥ ५४ ॥
मूत्रपुरीष तापवून । मुखामाजीं ओतिती जाण ।
कटू तिखट रस संपूर्ण । बळें घालिती घशामाजीं ॥ ५५ ॥

हल्लींच्या मद्यपाननिषेधाच्या चळवळीच्या काळीं, मद्यपाननिषेधा-संबंधानें, इतक्या समर्पक शब्दांत गोंवलेला उपदेश दुसरीकडे मिळणें कठीण. विशेषतः, एका कनिष्ठ जातीच्या कवीनें स्वजातीयां-साठीं हा जो उपदेश केला आहे, त्याचा उपयोग प्रस्तुत काळीं जातीजातींच्या सभा भरवून, त्या दिशेनें मद्यपाननिषेधाची चळवळ करणाऱ्या गृहस्थांनीं अवश्य करून घ्यावा. हिंदुधर्मांत जातिभेदाचें प्रस्थ फार माजलें आहे, ही गोष्ट जरी कांहीं बाबतींत अनिष्ट असली तरी एकंदरींत, प्रत्येक जातीच्या हाडींमाशीं हिंदुधर्माचीं उदात्त मूलतत्त्वें कशीं खिळून गेलीं आहेत, हें पुढें दिलेल्या ओंव्यांवरून वाचकांच्या लक्षांत येईल:—

**ओंव्या.**

‘आतां कलियुगामाजीं जाण । जे करितील मांसभक्षण ।
तयांलागीं अधःपतन । प्राप्त होय निश्चयें ॥ ६० ॥
सर्व दोषांमाजी थोर । हिंसा पाप असे दुर्धर ।
हिंसायोगें सर्व पितर । महा रौरवीं पडताती ॥ ६१ ॥
हिंसादोषासमान । पाप नाहीं दुसरें महान ।
हें माझें सत्यवचन । धर्मशास्त्रा मान्य असे ॥ ६२ ॥
ह्मणोनि नाभिक वंशिकांनीं । हिंसा करूं नये जाणीं ।
हिंसाकर्म केल्यावांचुनी । जरी मांस भक्षिलें ॥ ६३ ॥
तरी हिंसेचा महादोष । लागतो मांसभक्षकास ।
ह्मणोनि सर्व स्ववंशिकांस । पूर्वीं नाभिकें कथिलें कीं ॥ ६४ ॥
अहो ममवंशिक समग्र । मांसभक्षणीं पाप उग्र ।
ह्मणोनि तुह्मीं तेथें तत्पर । कदापिहि न व्हावें पैं ॥ ६५ ॥
मत्स्यमांसादि भक्षण । केलिया पाप घडे दारुण ।
ह्मणोनि तुह्मीं सावधान । धर्मरक्षणीं असावें ॥ ६६ ॥

नाभिकपुराण, अ० १४.

आपली जात सर्वांत चांगली असें प्रतिपादन करणारा भारती विश्वनाथ आपल्या जातीच्या लोकाचें वर्तन शुद्ध असावें, ह्यासाठीं फार काळजी घेत आहे, हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. वर दिलेल्या उपदेशाप्रमाणें नित्य पहाटेस उठून शौचमुखमार्जन व स्नान केल्यावर शंकराचें दर्शन घेणारा व मद्यमांसापासून अलिप्त असणारा न्हावी ब्राह्मणाच्याही आदरास कां बरें पात्र होणार नाहीं?

---

# विठ्ठल नरसिंह.

हा कवि मोरोपंताच्या कालानंतर होऊन गेला असावा, असें वाटतें, कारण ह्यास आर्यारचनेची स्फूर्ति मोरोपंती काव्यदर्शनामुळें झालेली दिसते. रा० रा० भगवंत बाळकृष्ण पै रायकर यांनीं या कवीसंबंधानें थोडीशी माहिती काव्यसंग्रहांत प्रसिद्ध केली आहे, तीवरून असें समजतें कीं, "हा विठ्ठल नरसिंह गोमांतकांतील केरी गांवीं सुमारें १२५ वर्षांपूर्वीं होऊन गेला. हा काश्यपगोत्री गौड सारस्वत ब्राह्मण; याचें पुरें नांव विठ्ठल नरसिंह नाईक सांखोळकर. यानें आपल्या पदांत आपला कुलदेव मंगीश याचा वारंवार उल्लेख केला आहे. मंगीशाचें देवालय अंत्रूज महालांत वेलंग नामक गांवीं आहे. हा विठ्ठल नरसिंह जाडा विद्वान् असून, त्यानें काशीच्या पंडितांकडून मानपत्र मिळविलें होतें; त्यांत त्याच्या बहुमानासाठीं त्याच्या आसनास दोन पाट ठेवावे असें लिहिलें होतें ! हा विठ्ठल नरसिंह इतका विद्वान् होता, तरी त्यास उपरति—ज्ञानाचा गंधही नव्हता असें दिसतें व त्याची फारशी प्रसिद्धि न होण्याचें कारणही हेंच असावें असें वाटतें. ह्याच्या विद्वत्तेवरून ह्यास 'विठ्ठलाचार्य' असेंही म्हणत असत. एकदां एके ठिकाणीं मौंजीबंधनप्रयोग चालला होता, तेथें हे विठ्ठलाचार्य गेले; पण तेथें त्यांचा यथायोग्य सन्मान न झाल्यामुळें त्यांस मोठा राग आला. त्यावेळीं 'आच्छादनं दूरीकृत्वा' ह्या प्रयोगास नुकताच प्रारंभ झाला होता. तेव्हां विठ्ठलाचार्यांनीं ऋत्विग्मंडळीस प्रश्न केला कीं, 'या आपल्या दूरीकरणाची मर्यादा कोठपर्यंत समजावयाची ? मंडपाचे तटापर्यंत कीं गांवचे सीमेपर्यंत कीं कोठपर्यंत ?' ऋत्विग्मंडळीस कांहीं समाधानकारक उत्तर देतां येईना. तेव्हां त्यांनीं विठ्ठलाचार्यांची

माफी मागितली व त्यांचा योग्य तो सन्मान करून पुढें प्रयोगास सुरुवात केली. हा कवि वेदशास्त्रनिपुण होता, त्याप्रमाणें तो गायनकलाभिज्ञही असावा, असें त्याच्या पदांवरून दिसतें. यापेक्षा या कवीची अधिक माहिती मिळाली नाहीं. कदाचित् कवीचे वंशज गोमांतक प्रांतीं असण्याचा संभव आहे, त्यांनीं विठ्ठलाचार्यांची विस्तृत माहिती प्रसिद्ध केल्यास महाराष्ट्रजनांवर त्यांचे मोठे उपकार होतील.

विठ्ठल नरसिंहाची पुढील कविता काव्यसंग्रहांत प्रसिद्ध झाली आहे. १ वामनचरित, आर्या ९९; २ शुकरंभासंवाद, आर्या ४९; ३ कबीरकथा व पदें सुमारें ६०. याची कविता मध्यम प्रतीची आहे; कांहीं आर्या थेट मोरोपंती थाटाच्या आहेत. कवितेवरून कवीची विद्वत्ता जितकी स्पष्ट दिसते, तितकें कवित्व दिसत नाहीं; तरी पण कांहीं ठिकाणीं ह्याची रचना बरीच चित्तवेधक आहे, यांत शंका नाहीं. पुढील उतारे पहाः—

**आर्या.**

स्वसुताचें दितिजांनीं हरिलें सर्वस्व ह्मणुनि तडफडली ।
आदिति पतीस निवेदी हृद्गतचिंता समग्र, जड पडली ॥ २ ॥
हास्य करुनि कश्यपमुनि बोले दयितेस 'आइकें सुभगे ।
हे हरिमाया चित्राचि, विचारितां काय तें अशुभ शुभ गे ॥ ३ ॥
यश–अपयश जय–अपजय समयविशेषेंचि पावती जंतू ।
परि तें मायिक विसरुनि, हरि न विसरिजे जगत्पटीं तंतू ॥ ४ ॥
आदिति वदे 'मुनिराया ! हें ब्रह्मज्ञान काय वनितांतें ।
तुष्ट कराव मातें स्वसुतातें विविध दुःखजानितातें ॥ ५ ॥
सत्वर सुतांसि माझ्या सुरभुवनप्राप्ति संपतीसहित ।
व्हावी, सुख मज तेणें, लेंकीं सुख तेंचि दंपतीस हित ॥ ६ ॥

मुनि तीस वदे चतुरे ! सुतहितकारिणि विचारितां गमतें।
सकल सुखास्पद विष्णुव्रत विश्वीं मान्य आत्मयोनिमतें ॥ ७ ॥
ज्यासि पयोव्रत आख्या तें आचारितांचि कामना पूर्ती।
हे गोष्टि सत्य मानीं, मी तुज सांगेन कां मनापूर्ती ? ॥ ८ ॥
मुनिगदित विधांपूर्वक विष्णुव्रत सांग आचरोनि सती।
झाली त्रिभुवनधन्या, तत्तुल्या अन्य बहु तशा नसती ॥ ९ ॥
तीच्या व्रतपुण्यबळें वरदेशें तीस दाविली वरता।
सायुध सांग चतुर्भुज वर माग ह्मणे "सुरांबिके पुरता" ॥ १० ॥

ह्या आर्या मोरोपंती थाटावर रचण्याचा कवीनें प्रयत्न केलेला दिसतो, पण त्यांत कवीस फारसें यश आलें आहे, असें वाटत नाहीं. तथापि कांहीं आर्या अगदीं मोरोपंती आर्यांसारख्या बेमालूम उतरल्या आहेत, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. खालील आर्या पहा:—

'ते हरिपद विधि भावुनि प्रवेशतां विधिसभासदांसहित।
निरखुनि वदूनि पूजुनि ह्मणति पदांतें करीं स्वदासहित ॥ ६१ ॥
हरिपदमार्जित जल तें सरिद्वरा होय भारता राया।
गगनपथें उतरे या महिवरि कृतदुरितभार ताराया ॥ ६२ ॥
सर्वस्व हरण बळिचें निरखुनि ते दानवी सकल सेना।
वामनहननार्थ निघे, चित्त जिचें लव नृशंस कलसेना ॥ ६३ ॥
नंद सुनंदादि तदा हरिगण ताडिति तदीय कटकातें।
बळि दनुजांसि म्हणे ' कां मरतें मत्सैन्य फुकट ? हटका तें ॥ ६४ ॥
अस्मद्धितकर हरि तो झालासे साह्य विबुधनिकरातें।
जय अपजय कालोद्भव समजुनि करिती न विबुध निकरातें ॥ ६५ ॥
जो त्रिदश पक्षपाती त्यातें हा पक्ष कायसा मान्य।
धरिला सुरार्थ जेणें, पहा पहा काय काय सामान्य ॥ ६६ ॥
या बलिवचनश्रवणें दितिदनुसुतकुल रसातळीं शिरलें।
कुशलहि काय करिल तरि जरि समयीं दैव पाठिशीं फिरलें ॥ ६७ ॥

'विठ्ठल नृसिंह यांस उपरतिज्ञानाचा गंधही नव्हता' हें सर्वस्वीं खरें नाहीं, असें पुढील पद्यावरून म्हणावें लागतें:—

आर्या.

'यापरि हरिचीं चरितें ऐकुनि गाउनि भवार्णवीं तरती ।
त्यांच्या चरणरजाची विठ्ठल–हृदयांत पूर्ण सतत रती ॥'

विठ्ठल नरसिंहाच्या आर्यांपेक्षां त्यांचीं पदें अधिक सुरस व त्यांवरून परमार्थज्ञानासंबंधानें तो अगदींच शंख होता वाटत नाहीं:—

पद १

तो यदुराज साजणी! राजीवनयन वाजवी पांवा ।
गरिब नवाज वाजवी पांवा ॥ ध्रु० ॥
नामोच्चरितें कृतसंकेतें । भाव मनीं समजावा ॥ १ ॥
कुवलयनयना गोकुलललना । घेति वनांतरिं धांवा ॥ २ ॥
विठ्ठलप्रियकर तो करुणाकर । प्रेमें हृदयीं धरावा ॥ ३ ॥

२

यशोदे तुला काय गे । सांगों माय गे ॥ ध्रु० ॥
चपल कटाक्षें भुलविति मातें । बाळ मी करूं कैसा उपाय गे ॥ १
कठिण कुचाग्रें तनुतें रोंविति । भासतें ते क्षणिं प्राण जाय गे ॥
विठ्ठलप्रिय मी अन्यथा न वदें । माय तूं तुझे साक्षी पाय गे ॥

३

चल जाऊं साजणी श्रीहरीकडे । कां इकडे तिकडे गडे गमसि चहूंकडे
दडसी वेडे ॥ध्रु०॥ मुरलीधर मुरलीच्या नादें भरि वृंदावन करि पदप
बससि काय यदुरायपाय मज । माय दाखवीं चारिन मृदु पेढे ॥ १ ॥
सासु काय करि नणंद जाऊ तरि । दीर मला उंदीर गमतसे ।
धीर धरुनि चल नीरजनयने । उशिर होतसे भीति काय भ्याडे ॥ २
. . पास जन हांसति म्हणवुनि रास मंडळीं विलास विवर्जिसी ।
यासि हे चारुकुसुमशरमार । फार मन नावडती विठ्ठलविभुचेडे ।

४

नमो नृसिंहा तुझ्या चरणकमला । ह्याचि गमला मला लाभ विमला ॥ध्रु०॥
जेथ निरुपाधिकानंद लक्षोनि चपलासमा राहिली स्वस्थ कमला । ब्रह्म-
भावासि वर्णाक्षरें वर्णितां निगमत्रय शेष फणिसहित दमला ॥ १ ॥
त्रिविध तापानळें परम संतप्त हा जीव विश्रांति भंगें विरमला ।
म्हणुनि दीनावना शरण आलों तुला तत्क्षणीं भृंगवत्पूर्व रमला ॥ २ ॥
करुनि करुणा जगद्वंद्य करुणानिधे दे स्वसुख चिद्घना विहित शमला ।
मग सहज विठ्ठलभ्रांतिचा वात संताप संजात निभ्रांत शमला ॥ ३ ॥

५

मन जडलें गुरुपायीं । कोणी कांहिं म्हणो ॥ ध्रु० ॥
निशिदिनिं मजला ध्यान तयाचें । न सुचे त्याविण कांहीं ॥ १ ॥
शोधित होतें त्रिभुवन सारें । सार दुजें नसे कांहीं ॥ २ ॥
श्रीगुरुचरणीं विठ्ठल तरला । भेद त्यजुनियां पाहीं ॥ ३ ॥

वरील पद्यांवरून, विठ्ठल नरसिंह यांस उपरतिज्ञानाचा गंध होता, इतकेंच नव्हे, तर ते प्रेमळ हरिभक्त असून त्यांनीं गुरूपदेशही घेतला होता, ही गोष्ट अगदीं उघड रीतीनें सिद्ध होत आहे. एके ठिकाणीं ‘ सहज हरिची मनिं मूर्ति जडतां अन्य स्फूर्ति राहिली । ’ असे उद्गार काढून, ‘ भीमातटीं वाळुवंटीं विठ्ठलमूर्ति’ पाहिल्याचा उल्लेख कवीनें केला आहे; यावरून विठ्ठल नरसिंह हे आपल्या तारुण्यांत जरी कदाचित् थोडेसे गर्विष्ठ असले, तरी पुढें पुढें वामनाप्रमाणें त्यांचें चित्त भक्तिमार्गाकडे वळून ते मोठे प्रेमळ साधु झाले असावेत, असें वाटतें.

विठ्ठल नरसिंह यांनीं कांहीं संस्कृत पदेंही केलीं आहेत. ह्यांची प्रसिद्ध झालेली कविता अगदींच थोडी आहे. त्यांची इतर कविता गोमांतकांत उपलब्ध होण्याचा संभव आहे, तरी ती मिळविण्याचा प्रयत्न तिकडील रसिक शोधकांनीं अवश्य करावा. काव्यसंग्रहांतील

लघुकाव्यमालेच्या चौथ्या भागांत गजगौरीव्रताख्यान नामक एक आर्याबद्ध काव्य छापलें आहे, तें विठ्ठल नरसिंहकृतच असावें, असें वाटतें. या काव्याच्या ७६ आर्या असून, त्यांत ऱ्हस्वदीर्घांच्या चुका बऱ्याच आढळतात.

---

# अनंतफंदी.

फंदी अनंत कवनाचा सागर । अजिंक्य ज्याचा हातखंडा ।
चमत्कार चहुंकडे चालतो । सृष्टीवर ज्याचा झेंडा ॥

होनाजी बाळा.

अनंतफंदी हा नामांकित कवि पेशवाईच्या अखेरीस संगमनेर येथें होऊन गेला. ह्यांचा जन्म शके १६६६ (इ. स. १७४४) या वर्षीं झाला व शके १७४१ (इ. स. १८१९) सालीं हे मृत्यु पावले, त्यावेळीं त्यांचें वय ७५ वर्षांचें होतें. मोरोपंत, शिवदिन केसरी, रामजोशी व होनाजीबाळा हे कवि अनंतफंदीचे समकालीन होत. फंदींचें उपनांव घोलप, हे यजुर्वेदी कौंडिण्य गोत्री देशस्थ ब्राह्मण. ह्यांचे आईचें नांव राऊबाई. ह्यांचे पूर्वज गोंधळीपणा व सराफीचा धंदा करीत असत. अनंतफंदींच्या पत्नीचें नांव म्हाळसाई. ह्यांस दोन पुत्र होते; एक श्रीपतफंदी ऊर्फ सवाईफंदी व दुसरे बापूफंदी. पैकीं बापू हे पूर्ववयांतच निवर्तले; श्रीपतफंदी हे शके १७९३, कार्तिक शुद्ध ५ या दिवशीं मृत्यु पावले. त्यांच्या कुटुंबाचें नांव गंगाबाई. मृत्युकालीं सवाईफंदी सुमारें पाऊणशें वर्षांचे होते.

अनंतफंदीचें आडनांव ‘ घोलप ’ असतां, त्यांनीं आपल्या नांवापुढें ‘ फंदी ’ हें नांव धारण केलें, यावरूनच ही व्यक्ति किती रंगेल व महत्त्वाकांक्षी असेल, याची थोडीशी कल्पना होते. ह्यांनीं

फारसी विद्याभ्यास केला होता, असें ह्यांच्या कवितेवरून दिसत नाहीं; तरी पण मराठी व ऊर्दू या दोन भाषांचें त्यांस चांगलें ज्ञान होतें, यांत संशय नाहीं. बहुश्रुतता, वक्तृत्व आणि निस्पृहता हे त्यांचे तीन गुण त्यांच्या कवितेंत स्पष्टपणें दग्गोचर होतात. कीर्तनकार या नात्यानें त्यांची फार प्रसिद्धि होती, व त्या कलेंत रामजोशांचे खालोखाल फंदींचा क्रम लागतो. त्यांनीं आपल्या तारुण्यांत जी कविता केली, ती बहुतेक सगळी उत्तानशृंगारयुक्त आहे, सभ्य स्त्री-पुरुषांस वाचतांना संकोच वाटल्याशिवाय राहणार नाहीं, इतका शृंगाररस तींत भरला आहे. रामजोशांच्या पुष्कळ लावण्या शृंगारिक आहेत, पण जोशीबुवा फार विद्वान् असल्यामुळें, कठिण संस्कृत शब्दांच्या पडद्याआड त्यांच्या शृंगाराचा अतिरेक झांकून गेल्यासारखा दिसतो.

अनंतफंदी यांस कवित्वस्फूर्ति होण्यास भवानीबोवा नामक साधूचा वरप्रसाद कारण झाला, अशी आख्यायिका आहे. प्रवरा नदीच्या कांठीं संगमनेर येथें हे भवानीबोवा अवलिया वृत्तीनें राहत असत. त्यांची समाधि संगमनेर येथें आहे. हे बुवा बालोन्मत्त-पिशाचवृत्तीचे राजयोगी होते. एक दरिद्री ब्राह्मण द्रव्यप्राप्ती-साठीं सप्तशृंगीचे देवळांतील देवीची आराधना करीत असतां, देवीनें त्यास दृष्टांत दिला कीं, ‘ तुझे प्रारब्धीं द्रव्य नाहीं, तूं येथून जा.’ ब्राह्मणानें तिकडे लक्ष्य न देतां पुनः आराधना चाल-विली. पुनः दृष्टांत झाला कीं, “ प्रवरातीरीं संगमनेर येथें भवानीबुवा साधु वास्तव्य करीत आहेत, त्यांस तूं जाऊन भेट. तुझी इच्छा त्यांजकडून पूर्ण होईल.” हें ऐकतांच ब्राह्मण मुकाट्यानें गडावरून खालीं उतरला व संगमनेरास येऊन बुवांचा शोध करूं लागला. कांहीं दिवस गेले तरी बुवांची व त्याची भेट झाली नाहीं. मग बुवांच्या

वास्तव्यस्थानीं ब्राह्मणानें उपोषणें आरंभिलीं. त्याचा निर्धार पाहून बुवा एके दिवशीं झाडींतून अकस्मात् बाहेर पडून त्याजपुढें उभे राहिले. ब्राह्मणास भवानीबोवा ते हे असें कळतांच त्यानें त्यांस साष्टांग नमस्कार घातला व देवीनें दिलेल्या दृष्टांताची हकीकत सांगितली. तेव्हां, देवीस अनुलक्षून बुवा म्हणाले, "त्या टवळीनें तुला मजकडे पाठविलें काय? ठीक आहे." मग त्यांनीं त्या ब्राह्मणास आपल्या मागून येण्यास सांगितलें व आपण झपाट्यानें चालूं लागले. बरेच दूर गेल्यावर मार्गें वळून ते ब्राह्मणास ह्मणाले, 'पदर पसर, तुला द्रव्य देतों.' ब्राह्मणानें पदर पसरला, तों तेथें झाडाखालीं एक मेलेलें कुत्रें पडलें होतें, तें उचलून बुवांनीं त्याच्या पदरांत टाकिलें व आपण अदृश्य झाले. तें कुत्रें इतकें कुजून गेलें होतें कीं, त्याची घाण घेववेना म्हणून ब्राह्मणानें तें टाकून दिलें व पुनः असल्या भानगडींत न पडण्याचा पश्चात्तापपूर्वक निश्चय करून, कुत्र्याच्या मांसानें भरलेलें धोतर धुण्यासाठीं तो नदीवर गेला. धोतर पाण्यांत बुडवितांच, जे मांसखंड धोतरास चिकटले होते, ते सगळे पीतवर्ण सुवर्णखंड झाले आहेत, असें त्याच्या दृष्टीस पडलें! तें सगळें सोनें भराभर काढून घेऊन, ज्या ठिकाणीं कुत्रें टाकलें होतें, तिकडे तो धांवत गेला, पण तेथें कुत्रें नाहीं आणि सोनेंही नाहीं, असें पाहतांच त्याची निराशा मात्र झाली.

भवानीबोवांसंबंधानें आणखी एक गोष्ट प्रसिद्ध आहे, ती अशी:— संगमनेरचे एक गृहस्थ, परगांवच्या एका गृहस्थाबरोबर बाजारांतून बोलत चालले असतां, तिकडून भवानीबोवांची स्वारी आली. त्यांनीं संगमनेरकर गृहस्थांच्या गालास हळूच चिमटा घेतला व कांहीं अमंगळ शब्द उच्चारून त्यांची संभावना केली. ह्याचा परिणाम असा झाला कीं, त्या दिवसापासून त्या गृहस्थांच्या अभ्युदयास प्रारंभ होऊन

ते लवकरच मोठे संपत्तिमान् झाले! दुसऱ्या गृहस्थासंबंधानें तसा प्रकार न झाल्यामुळें त्यांची पूर्वस्थिति तशीच कायम राहिली. ह्या भवानीबोवांच्या वरप्रसादामुळेंच अनंतफंदीस कवित्वस्फूर्ति झाली, हें पूर्वी सांगितलेंच आहे. फंदीबुवा बाळपणापासूनच फार खोडकर होते. घरांतील माणसांचें न ऐकतां गांवभर उनाड मुलांबरोबर भटकत फिरावें, हा त्यांचा नित्यक्रम. एके दिवशीं त्यांची आई त्यांस फार रागें भरली, त्यामुळें रुसून फंदीबोवा घरांतून बाहेर पडले व रात्रीं भवानीबोवांचे मठांत जाऊन निजले. दुसरे दिवशीं सकाळीं त्यांची आई त्यांस शोधीत शोधीत त्या ठिकाणीं आली. तिनें फंदीबुवांस घरीं येण्याविषयीं परोपरीनें विनाविलें, पण त्यांनीं तिकडे बिलकुल लक्ष्य दिलें नाहीं. मग तिनें भवानीबोवांपाशीं मुलाचें गाऱ्हाणें नेलें. ती म्हणाली, ‘ महाराज, हा मुलगा अतिशयित व्रात्य आहे, कोणाचें ऐकत नाहीं. उनाड मुलें जमवून त्यांजबरोबर धिंगामस्ती करीत असतो. ह्याला लावण्या ऐकण्याचा भारी छंद! रात्रीं प्रहर रात्रपर्यंत घरीं येत नाहीं. माझा तर उपाय हरला; आतां आपण तरी याला दोन गोष्टी सांगून पहाव्या.’ हें ऐकतांच बुवांनीं फंदीकडे वळून म्हटलें ‘ नीघ येथून; घरीं जा. ’ पण फंदी जागेवरून उठेनात. मग दगड घेऊन बुवा त्यांच्या मागें लागले व तो दगड फेंकून फंदीस त्यांनीं घालवून दिलें! ह्याच दिवसापासून अनंतफंदीस कवित्वस्फूर्ति झाली. ह्या सगळ्या गोष्टी सकृद्दर्शनीं अमळ चमत्कारिक वाटतात, पण ‘ रहस्योद्ग्राही ’ पद्धतीनें त्यांचा विचार केला असतां, त्यांतही एक प्रकारचें रहस्य—गुप्तज्ञान आहे असें कदाचित् दृष्टोत्पत्तीस येण्याचा संभव आहे. असो.

यानंतर अनंतफंदी यानीं पुष्कळ लावण्या रचल्या व तमाशा आरंभिला. मलकफंदी, रतनफंदी, व राघवफंदी असे तीन गृहस्थ

अनंतफंदींचे साथीदार होते. अनंतफंदीस 'फंदी' नांव पडण्याचें कारण पूर्वीं संगमनेर येथें मलकफंदी या नांवाचा एक फकीर होता, तो लोकांत नेहमीं चमत्कारिक रीतीनें वागत असे, म्हणून लोक त्यास 'फंदी' म्हणत असत व अनंतफंदींचा व त्याचा स्नेह असल्यामुळें लोक त्यांसही फंदी म्हणूं लागले, असें नवनीतांत लिहिलें आहे. एकदां हे चौघेही फंदी आपला तमाशा घेऊन होळकरशाहींत गेले, त्यावेळीं तेथील राज्यसूत्रें सती अहल्याबाई यांच्या हातीं होतीं. आपल्या राज्यांतून कोणी विन्मुख जाऊं नये, या उदारबुद्धीनें त्यांनीं फंदींचा तमाशा राजवाड्यांत करविला. तमाशा झाल्यावर, अहल्याबाई फंदीस म्हणाल्या, 'तुम्हीं ब्राह्मण असून तमाशासारख्या हलक्या कामांत आपल्या कवित्वशक्तीचा व्यय करावा हें चांगलें नाहीं;यापेक्षां हीच कवित्वशक्ति परमार्थमार्गाकडे लावाल तर तुमचा फायदा होऊन, सामान्य जनास सुलभ भाषेंत परमार्थाचें ज्ञान करून दिल्याचें श्रेय तुम्हांस मिळेल.' अहल्याबाईसारख्या अधिकारी साध्वीच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच, अनंतफंदीची बुद्धि एकदम पालटली. त्यांनीं आपल्या हातांतला डफ तत्काळ फोडून टाकला व तमाशाबद्दलची बिदागीही न घेतां, त तसेच निघून संगमनेरीं आले. ह्या दिवसापासून त्यांनीं तमाशा न करण्याचा निश्चय करून तो अमलांतही आणिला.

पुढें, संगमनेर येथें अनंतस्वामीच्या पुण्यतिथीचा वार्षिकोत्सव चालू असतां, तेथील पाटलानें व इतर लोकांनीं अनंतफंदीस तमाशा करण्यास सांगितलें. फंदींनीं आपला निश्चय त्यांस कळविला व पुष्कळ आढेवेढे घेतले. परंतु शेवटीं ग्रामस्थांच्या अत्याग्रहामुळें त्यांस तमाशा करणें भाग पडलें. योगायोग किती विलक्षण आहे पहा! हा तमाशा चालू असतां, अहल्याबाईंची स्वारी संगमनेरावरून पुण्यास चालली होती. स्वारी ज्या रस्त्यानें जात होती, त्या रस्त्यावर माणसांची मोठी गर्दी झालेली

पाहून, त्यासंबंधानें चौकशी करितां, तमाशा चालू असल्याचें त्यांस समजलें. त्या साध्वीस असल्या गोष्टींचा मनापासून कंटाळा असल्यामुळें, तमाशा कोण करीत आहे, इत्यादि चौकशी करावयास सांगून त्यांची स्वारी पुढें चालती झाली. चौकशीअंतीं, तमाशा करणारे गृहस्थ अनंतफंदीच आहेत, ही हकीकत बाईस कळतांच, 'फंदीचें डोकें मारावें' अशा इराद्यानें त्यांची स्वारी माघारी फिरली. इकडे अनंतफंदीस ही बातमी समजतांच त्यांस आपल्या पूर्वप्रतिज्ञेचें स्मरण होऊन फार पश्चात्ताप झाला व आतां अहल्याबाईच्या क्रोधाग्नींत आपली आहुति पडते कीं काय, या विचारानें ते अगदीं थिजून गेले. पण त्यांच्या अंगीं एक प्रकारची समयसूचकता होती, त्यामुळें ह्या प्रसंगांतून ते कसे तरी पार पडले. अहल्याबाई आपणास शासन करण्यास येत आहेत, हें ऐकतांच फंदीनीं तमाशांतील स्त्रीवेषधारी नर्तकास व एका टाळकऱ्याशिवाय इतर साथीदारांस तत्काळ निघून जाण्यास सांगितलें व स्वतः मध्वनाथांचें पुढील पद म्हणून त्यावर कीर्तन आरंभिलें:—

हरि तुझि मुरली घरघेणी ॥ ध्रु० ॥
मुरलिनें कसें लाविलें पिसें ।
गोपी विंचरतां विसरली वेणी ॥ १ ॥
वृंदावनीं धीट झालों आम्हीं नीट ।
लोकलाजेवरी सोडिलें पाणी ॥ २ ॥
मध्वनाथस्वामी भाग्यवंत आम्हीं ।
हेचि मागतसे शेवटली घेणी ॥ ३ ॥

अहल्याबाई येऊन पाहतात, तों फंदीबुवा कीर्तनांत अगदीं गढून गेले आहेत, असें त्यांच्या दृष्टीस पडलें. बाईस कीर्तनश्रवणाची फार हौस असल्यामुळें बुवांच्या रसाळ वक्तृत्वानें त्या अगदीं रंगून गेल्या. फंदीचें हें पहिलेंच कीर्तन असतांही आपल्या

वाक्पाटवानें आणि चतुरस्रतेनें सगळया श्रोत्यांच्या चित्तवृत्ति त्यांनीं अगदीं तल्लीन करून सोडल्या ! कीर्तन संपतांच बाईनीं फंदीबुवांस बहुमोल पोषाक व सोन्याचीं कडीं देऊन त्यांची चांगली संभावना केली व त्यांचा निरोप घेऊन त्या पुण्याकडे निघून गेल्या. बाईसारख्या परम साध्वीच्या अल्प सान्निध्याचा फंदींच्या मनावर इतका सुपरिणाम झाला कीं, त्या दिवसापासून तमाशाचा नाद त्यांनीं अगदीं सोडून दिला. नैतिक सामर्थ्याचा प्रभाव किती विलक्षण आहे पहा !

पुढें फंदींनीं आपलें सर्व आयुष्य कीर्तनांतच घालविलें. रामजोशीबुवांसारखी असामान्य विद्वत्ता फंदींच्या अंगीं नव्हती, किंबहुना संस्कृत भाषेचेंही फारसें ज्ञान त्यांस होतें, असें त्यांच्या कवितेवरून दिसत नाहीं; तथापि त्यांच्या अंगीं खरी कवित्वशक्ति व उत्तम वक्तृत्व यांचा सतत निवास असल्यामुळें, त्यांच्या कीर्तनाची सगळया महाराष्ट्रभर अतिशय प्रसिद्धि झाली. फंदींचे समकालीन कवि होनाजी बाळा यांनीं केलेल्या पुढील लावणीवरून, तत्कालीन कीर्तनकारांत फंदींची योग्यता केवढी मोठी होती, हें लक्ष्यांत येईलः—

फंदी अनंत कवनाचा सागर अजिक्य ज्याचा हातखंडा ॥
चमत्कार चहुंकडे चालतो सृष्टीवर ज्याचा झेंडा ॥ ध्रु० ॥
मूळ संगमनेर ठिकाण त्याचें कीर्ति उदय जैसा अर्की ॥
नविन तऱ्हा नारळी डोईला पदर पागोट्याची फिर्की ॥
वाचावंत संपत्ति सारखी बहुतांचें तनमन हरकी ॥
लांगेलंगे कवि भेदरले अवघ्यांवर त्याची गुर्की ॥
समोर गातां कोणि टिकेना मनामधीं बसली कर्की ॥
धन ज्याचा हातचा मळ केवळ तो रुपयांचा हंडा ॥ १ ॥
फंदी अनंदी छंदी वरदी ब्राह्मण त्यावर गुरुकृपा ॥
सरस्वती जिव्हाग्रिं अक्षयीं भंग नसे ज्याच्या हरपा ॥
कवन बहुत उदरामधिं भरलें फणस जसा मोठा कापा ॥

भाळीं त्रिपुंड्र टिळा केशरी  कस्तुरिचा वरती छापा ॥
मोठमोठ्या राज्यांमधिं महशुर  जगजाहिर चारी तर्फा ॥
अकट विकट कवनाच्या चाली  नित्य नव्या अक्षयि थापा ॥
विद्याअभिमान नाहिं जयाला  असा कवी कंचा धुंडा ॥ २ ॥
नांवाचें चांदणें जगाचें  मुख्य मुख्य खासे खासे ॥
कीर्तनरंगीं झडा घालिती  मानवला सर्वत्रांसि असे ॥
पुढें मागें ऐसा नसे दुसरा  मृत्युलोकिंचा रहिवासी ॥
पहावें रत्न पंधरावें माता  धन्य जन्मली हो त्यासी ॥
असा पुरुष चिरकाल असावा गुणनिर्गुण पंडित राशी ॥
होनाजीबाळा म्हणे जगावा बहुत काळ आयुष्य यासी ॥
अवीट ज्याची करणि ऐकतां  देहप्राण होतो थंडा ॥
गुरव त्याचे संगें सोबती  कुशल कला जाणे उदंडा ॥ ३ ॥

या लावणीवरून तत्कालीन तमासगीर लोकांत अनंतफंदींचें प्रस्थ फार मोठें होतें, हें अगदीं स्पष्ट दिसतें. ‘ कवनाचा सागर ’ ‘ वाचावंत ’ या शब्दांवरून फंदीबुवांचें शीघ्रकवित्व; ‘ संपत्ति सारखी ’ ‘ तो द्रव्याचा हंडा ’ या शब्दांवरून त्यांची श्रीमंती; ‘ डोईला नारळी पदराचें पागोटें ’ ‘ बहुतांचें तनमन हरकी ’ ‘ फंदी, आनंदी, छंदी ’ ‘ केशरी टिळा, वरती कस्तुरिचा छापा ’ इत्यादि शब्दांवरून त्यांचें सौंदर्य व ऐटबाजपणा; ‘ लंगे लुंगे कवि भेदरले ’ ‘ समोर गातां कोणि टिकेना ’ ‘ कवन बहुत उदरामधिं भरलें ’ या शब्दांवरून त्यांची समयसूचकता व कवित्वशक्ति; ‘ सरस्वती जिव्हाग्रिं अक्षयी ’ व ‘ कीर्तनरंगीं झडा घालिती ’ या पदांवरून त्यांचें विलक्षण वक्तृत्व इत्यादि गुण व्यक्त होतात; व यामुळेंच ‘ हा ब्राह्मण वरदी असून त्याच्यावर गुरुकृपा झाली आहे ’ असें होनाजीबाळा यांनीं म्हटलें आहे. ‘ पुढें मागें ऐसा नसे दुसरा ’ हें वाक्य अंमळ अतिशयोक्तिपूर्ण दिसतें, कारण फंदीपूर्वी रामजोशीबुवांसारखा नामांकित कवि नुकताच होऊन गेला होता व खुद्द

होनाजीबाळा याची कविताही फंदींच्या कवितेहून वरच्या दर्जाची आहे. एकंदरींत या लावणीवरून फंदींच्या योग्यतेचें जितक्या स्पष्टतेनें आविष्करण होत आहे, तितक्याच स्पष्टतेनें होनाजीबाळांचा निरभिमानीपणा व परोत्कर्षसहिष्णुता, हे गुण दृश्यमान होत आहेत. तमासगीर लोकांची एकमेकांशीं चाललेली चुरस, होनाजीबाळांचा पेशव्यांच्या दरबारीं झालेला बडेजाव, व शेवटीं त्यांच्या प्रतिस्पर्धी तमासगिरांकडून त्यांचा झालेला खून, या गोष्टी लक्ष्यांत घेतां, वरील लावणी रचून फंदीबुवांचें स्तुतिस्तोत्र गाण्यांत होनाजीबाळांनीं असामान्य मनौदार्य प्रगट केलें आहे, असें म्हणणें भाग पडतें. अर्वाचीन ग्रंथकार आणि कवि यांना ह्या गोष्टीपासून पुष्कळ बोध घेतां येण्यासारखा आहे.

पेशवाईंत गुणी जनांच्या गुणाचें चांगलें चीज होत असे, त्यामुळें अनेक शाहीर, कवि, योद्धे, मुत्सद्दी त्याकाळीं उदयास आले. अनंतफंदीस पेशव्यांकडून चांगली प्राप्ति होत असे, त्यामुळें त्यांस दुसरा व्यवसाय करण्याची जरूरी पडली नाहीं. अद्यापपर्यंत या राजद्रव्यानें फंदीच्या वंशजांची उपजीविका चालत आहे. शिवाय बडोद्याच्या फत्तेसिंग गायकवाडांचाही अनंतफंदीस चांगला आश्रय होता; व अद्याप त्यांचे वंशज, प्रतिवर्षी एक नवा फटका रचून दाखवून बडोद्याच्या महाराजांकडून आपलें वर्षासन मिळवीत आहेत.

अनंतफंदींनीं पुष्कळ कविता केली, त्यांपैकीं माधवग्रंथ नामक एक ओवीबद्ध ग्रंथ व कांहीं फटके व लावण्या इतकी कविता रा० शंकर तुकाराम शालिग्राम यांनीं प्रसिद्ध केली आहे. ही कविता बरीच अशुद्ध दिसते. ओवीबद्ध माधवग्रंथाचे अध्याय ६ असून, ओव्या ३६० आहेत. पुणें येथें सवाई माधवराव पेशवे गच्चीवरून उडी टाकून मृत्यु पावले, त्यावेळीं पुण्याचे कारभारी मंडळींनें

झालेल्या हकीकतीचें पत्र दुसऱ्या बाजीरावाकडून अनंतफंदीस लिहविलें व त्याजवर कविता करण्यास सांगितलें; त्यावरून फंदींनी हा ग्रंथ लिहिला. ह्यांतील इतिहास पुष्कळ अंशीं विश्वसनीय असून, ग्रँटडफ यांच्या बखरींतील माहितीपेक्षां ह्या ग्रंथांतली माहिती अधिक विस्तृत आहे. हा ग्रंथ फारच मनोरंजक असून, तो प्रत्येक साक्षर महाराष्ट्रीयानें एक वेळ तरी अवश्य वाचावा, अशी शिफारस करितों. ह्या ग्रंथांत म्हणण्यासारखें काव्य नाहीं; ओवी वृत्तांत लिहिलेलें तें गद्यच आहे. असें म्हटलें तरी चालेल. तथापि दुष्काळाच्या वेळच्या देशस्थितीचें चित्र फंदींनीं इतकें सुरेख रेखाटलें आहे कीं, तो सगळा भाग काव्यमयच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. कीर्तनाच्या उपयोगासाठीं हाच माधवग्रंथ फंदींनी निरनिराळ्या वृत्तांतही रचिला आहे, पण छंदःशास्त्र आणि काव्य या दोन्ही दृष्टींनीं त्या ग्रंथास फारसें महत्त्व येईल असें वाटत नाहीं. फंदींची वाणी जोशीबुवांच्या वाणीसारखी सुसंस्कृत नाहीं, तरी पण ती बरीच प्रासादिक असून, तींत स्पष्टवक्तृत्व हा गुण प्रमुखत्वानें दृश्यमान होतो.

अनंतफंदींचे चिरंजीव श्रीपतफंदी उर्फ सवाईफंदी हेही चांगले कवि होते. ते आपल्या बापाप्रमाणें कीर्तनावर आपला चरितार्थ चालवीत असत. 'फंदी मूल' हीं अक्षरें ज्या कवितेच्या शेवटीं आढळतात, ती सगळी कविता ह्यांची होय. हे अत्यंत निस्पृह होते. शेवटच्या बाजीरावाच्या कारकीर्दीवर ह्यांनी आपल्या एका फटक्यांत चांगलेच कोरडे ओढले आहेत. ह्यांस पुत्र दोन; अनंत ऊर्फ बळवंतफंदी व गणपतफंदी. हे दोघेही हल्लीं संगमनेरीं राहात असून पूर्वार्जित मिळकतीवर, निस्पृहतेनें पूर्वजांचा बाणा बाळगून काळक्रमणा करीत आहेत. श्रीमंत तुकोजीराव महाराज होळकर ( हल्लींच्या

महाराजांचे पितामह ) यांची स्वारी जेजुरीस जाण्यासाठीं इंदुराहून निघाली असतां, वाटेंत संगमनेर येथें त्यांनीं एक दिवस मुक्काम केला. तेव्हां बळवंतफंदी यांनीं महाराजांची भेट घेऊन, त्यांच्या स्तुतिपर एक लावणी तावडतोब रचून म्हणून दाखविली. तेणें-करून संतुष्ट होऊन, पोषाक, मंदील व एक शाल मिळून सुमारें चारपांचशें रुपयांचा ऐवज महाराजांनीं त्यांस दिला.

अनंतफंदींनीं चिरकाल चालेल अशी देणगी मिळविली नाहीं. सवाईफंदी यांनीं मात्र गायकवाडींत ५०० रुपयांचें वर्षासन मिळ-विलें व तें अद्याप चालू आहे. ह्यांचे वंशजही चांगली कविता करतात, पण ती प्रसिद्ध करूं देण्यास ते तयार नाहींत. जुनी पुराणी समजूत आहे, कधीं बदलेल तेव्हां बदलेल. फंदींचे वंशज बडोद्यास गेले म्हणजे त्यांस सरकारची गाडी, छत्री मशाल इत्यादि सरंजामानिशीं शहरांत आणण्याची चाल अद्याप आहे.

अनंतफंदींच्या कवितेंत 'रहनेवाला धनवडका' असे शब्द कांहीं ठिकाणीं आढळतात, यावरून धनवड येथेंही ते कांहीं दिवस राहिले असावेत, असें वाटतें. अनंतफंदींच्या चरित्रांतल्या कांहीं आख्यायिका इतर व्यक्तींसंबंधानेंही प्रसिद्ध आहेत. नाना फडणविसांच्या मागून पेशव्यांचे कारभारी झालेले सदाशिव माणकेश्वर यांस एका हरिदासबुवांनीं आपण वीणा खालीं ठेविला आणि आम्हीं उचलला ' असें उत्तर दिल्याचें प्रसिद्ध आहे. रा० शालिग्राम म्हणतात कीं, हे हरिदासबुवा अनंतफंदीच होत; व फंदींच्या स्पष्टवक्तृत्वाकडे पाहतां रा. शालि-ग्राम यांनीं दिलेली माहिती खोटी असेल, असेंही म्हणवत नाहीं. त्याचप्रमाणें, गांवांतील कुटाळ लोकांच्या सांगण्यावरून, श्रीशंकरा-चार्यांनीं संध्या म्हणावयाची आज्ञा केली, त्यावेळीं "केशव करणी अगाध लीला" ही चोवीस नांवांची लावणी म्हणून दाखवून

आचार्यांस संतोषित केलें, ही आख्यायिका अनंतफंदी व रामजोशी या दोघांसंबंधानेंही प्रसिद्ध आहे. तरी पण, सदर लावणीची एकंदर रचना जोशीबुवांच्या रचनेसारखी दिसते. शेवटीं कविनामानिर्देश मुळींच नसल्यामुळें ह्या लावणीचा कर्ता कोण हें निश्चयानें सांगतां येणें कठीण आहे.

अनंतफंदी एकदां माळव्यांतून दक्षिणेंत येत असतां, सातपुड्यांतील भिल्ल लोकांनीं त्यांस वेढलें व त्यांचे जवळचा सर्व ऐवज लुटला. फंदींनीं मोठी समयसूचकता लढवून त्या भिल्लांवर एक लावणी रचली व ती त्यांच्या नायकास म्हणून दाखविली. ती ऐकून ते भिल्ल फार खूष झाले, आणि त्यांनीं फंदींचें सगळें द्रव्य त्यांस परत देऊन वर आणखी एक चांगला पोषाख व दोनशें रुपये रोख दिले! भिल्लांच्या नायकानें फंदींबरोबर पांच भिल्ल देऊन, त्यांस संगमनेरच्या वेशीपर्यंत सुखरूपपणें पोंचतें केलें.

आतां अनंतफंदी व श्रीपतफंदी यांच्या कवितेंतले कांहीं निवडक उतारे देऊन हें प्रकरण पुरें करूं.

श्रीमंत सवाई माधवराव पेशवे मरण पावले, त्यावेळच्या स्थितीचें वर्णनः—

## ओंव्या.

आश्विन शुद्ध द्वादशी । उडी टाकिली ते दिवशीं ॥
श्रीमंत शुद्ध पौर्णिमेसी । कैलासवासी जाहले ॥ १ ॥
एकाएकीं उडी आपुल्या सुखें । टाकिली त्या घाशीरामांतकें ॥
प्रयत्नही केले बहुतेकें । परंतु असाध्य जाहले ॥ २ ॥
नानासी कळलें वर्तमान । श्रीमाधव पावले मरण ॥
चिंताक्रांत बाळाजी जनार्दन । गोड कांहीं न लागे ॥ ३ ॥
म्हणे हें काय उलटें जाहलें । आम्हांस कां येथें ठेविलें ॥
अर्थातचि स्वराज्य संपलें । चांगलें न केलें श्रीमाधवें ॥ ४ ॥

एकचि जाहला हलकल्लोळ । नाना पिटीत वक्षस्थळ ॥
जीवजंतु समस्त पक्षीकुळ । शोकार्णवीं पडियेलें ॥ ५ ॥
प्रजा लोकपाळ जितुके । शोकार्णवीं पडिले तितुके ॥
श्रीमाधवें केलें इतुकें । पुढें दुःख कितुकें कळेना ॥ ६ ॥
असो, यापरी दुःख जाहलें जना । रुद्रभूमीस नेलें माधव नारायणा ॥
सवें बरोबर मुख्य नाना । दहन करविलें रायाचें ॥ ७ ॥
शहरचा करोनि बंदोबस्त । लोकपाळ घरा गेले समस्त ॥
नाना आपुले सदनीं स्वस्थ ॥ चिंताक्रांत बैसले ॥ ८ ॥
म्हणे आतां कैसा करावा विचार । बोलावुनी शिंदे होळकर ॥
अष्ट उमरावही समग्र । बोलाविले नानांनीं ॥ ९ ॥
आतां दत्तक घ्यावा म्हणे नाना । हें योग्य मानवलें समस्त जनां ॥
परी शिंद्याच्या नये मना । नानासी बोलता जाहला ॥ १० ॥
नानासी ह्मणे दवलतराव शूर । धनी असतां उभय वीर ॥
एकापरीस एक धुरंधर । मग दत्तक तो कासया ॥ ११ ॥
अदुग्ध नसतां मुलाची माय । मग दुधाचें कारण काय ॥
जरी नसते अप्पा बाजीराय । मग दत्तक घेणेंचि प्राप्त ॥ १२ ॥
पदरीं असतां लाखों धन । मग कासया व्याजी ऋण ॥
टाकुनियां गंगाजीवन । कूपोदक तें कासया ? ॥ १३ ॥
सागवानी मोडूनि घर । उभे करावे एरंड शेर ॥
जिवंत असतां लग्नवर । मग कां करावा पाटाचा ? ॥ १४ ॥

या ओंव्यांत शिंदे, नाना फडणवीस इत्यादि तत्कालीन अधिकारी जनांसंबंधानें फंदींनीं खुशाल एकवचन दडपून दिलें आहे, हें त्यांच्या स्पष्टवक्तृत्वाचें निदर्शक होय. माधवग्रंथांतील कथाभागासंबंधानें फंदी म्हणतातः—

हें कथानक राघवपुत्रें । आपल्या स्वहस्तें लिहिलीं पत्रें ॥
त्या पत्रावरूनि हीं चरित्रें । कवीनें कविता केली असे ॥ ४३ ॥
यांत पदरचें नाहीं यत्किंचित । बाजी रघुनाथ साक्षीभूत ॥
टीका केली प्राकृत । लहान थोरांस समजावया ॥ ४४ ॥

पूर्वी पांडवांच्या ख्याती । राजारजवाड्यांच्या किताबती ॥
दामाजीपंताच्या बखरा वाचिती । ह्या पुढें तैशाच होतील ॥ ४५ ॥
ज्या ज्या कथा जाहल्या जितुक्या । त्या त्या कवीनें वर्णिल्या तितुक्या ॥
पुढें आणीक होतील जितुक्या । अनंतफंदीमुखें ऐकाव्या ॥ ४६ ॥
स्वस्तिश्रीमाधवकवन सुंदर । संमत बाजी रघुनाथ पत्राधार ।
श्रोते परिसोत पंडित चतुर । द्वितीयोध्याय गोड हा ॥ ४७ ॥

माधवग्रंथ, अध्याय २.

मराठी राज्याच्या इतिहाससंबंधानें जुन्या मराठी कवीनें लिहिलेला ओवीबद्ध ग्रंथ, या दृष्टीनें माधवग्रंथाची योग्यता मराठी वाङ्मयांत अगदीं अद्वितीय आहे. विशेषतः, अनंतफंदी हे विद्यमान असतां त्यांच्या काळीं पेशवाईच्या अखेरीस जे बरे वाईट प्रकार घडले, ते सगळे, खुद्द बाजीराव रघुनाथ यांच्या पत्रांच्या आधारानें या ग्रंथांत वर्णिले असल्यामुळें ऐतिहासिक दृष्ट्याही ह्या ग्रंथाची योग्यता फार मोठी आहे, यांत शंका नाहीं. पुण्यांतलें कारभारीमंडळ, बाजीरावांच्या हातून एकंदर हकीकतीचें पत्र लिहवून, त्याजवर कविता करण्यासाठीं तें फंदींकडे पाठवून देतें, यावरून फंदींची योग्यता व मान्यता तत्कालीन महाराष्ट्रीयांत केवढी होती, याची सहज कल्पना होते.

अनंतफंदींच्या ओंव्या महिपतींच्या ओंव्यांसारख्या दिसतात. महिपतींप्रमाणें नानाप्रकारचे दृष्टांत देण्याची अनंतफंदींचीही चाल आहे. पुढील ओंव्या पहाः—

“लोह जरी परिसावरी । आदळुनियां ताडिला जरी ॥
तरी तो लोहाचें सुवर्णचि करी । स्वभाव गुण न टाकी ॥ ३५ ॥
कुठार घातली मैलागिरीवरी । राय राय तुकडे केले जरी ॥
तरी त्याचा सुवास दिगंतरीं । स्वभावगुण न टाकी ॥ ३६ ॥
सज्जनास भेटला दुर्जन । तो कसेंही करी त्याचें छळण ॥
परी दुर्जनाचेंच इच्छी कल्याण । स्वभावगुण न टाकी ॥ ३७ ॥

कागदीं बांधूनि कस्तुरीचे पुडे । फेंकूनि दिधले एकीकडे ॥
तरी त्यांचा सुवास लोपे ऐसें न घडे । स्वभावगुण न टाकी ॥ ३८ ॥

माधवग्रंथ, अ० २.

देवावांचूनि देऊळ सुनें । कीं नासिकावांचूनि वदन ॥
कीं पुत्रावांचूनि जैसें सदन । व्यर्थ काय तें जाळावें ॥ २ ॥
कीं गळ्यावांचूनि गायन । कीं बुबुळावांचूनि नयन ।
कीं शरीर जैसें प्राणाविण । पंडितावीण सभा जैसी ॥ ३ ॥
कीं शूरत्वावांचूनि शिपायगिरी । कीं हिऱ्यावांचूनि मुद्रिका करीं ॥
कीं पतीवांचूनि दिव्य नारी । कीं यजमानावांचूनि याचक ॥ ४ ॥
कीं चंद्रावांचूनि तारांगण । कीं वस्त्रावांचूनि शरीर नग्न ॥
कीं वरावांचूनि जैसें लग्न । शोभा नेदी सर्वथा ॥ ५ ॥

कित्ता, अध्याय ३.

चवथ्या आणि पांचव्या अध्यायांत परशुरामभाऊ पटवर्धन यांनीं बाजीराव यांस फसवून शिंद्याच्या लष्करांत कसें पाठवून दिलें, चिमाजी अप्पास त्यांचे इच्छेविरुद्ध जबरदस्तीनें नेऊन त्यांचा उपमर्द कसा केला व यशोदाबाईची अवहेलना करतांना भाऊंच्या मनास यत्किंचित्‌ही दिक्कत कशी वाटली नाहीं, इत्यादि गोष्टींचें वर्णन दिलें आहे; तें वाचतांना अंगावर शहारे उभे राहतात ! फंदींनीं वर्णिलेल्या ह्या गोष्टी जर खऱ्या असतील, तर त्या परशुरामभाऊ पटवर्धनाच्या चारित्र्यास कलंक लावणाऱ्या होत, असें म्हटल्याशिवाय गत्यंतर नाहीं. पुढील ओंव्या पहा:—

‘ भाऊ म्हणे अबरू कशास्तव मुला* । व्यर्थ कां गमाविशी नुमजे तुला ॥
मर्यादा टाकोनि बोलता जाहला । अमर्यादा बहु केली ॥ ४९ ॥
आपास गर्हिवर दाटे । काय करील आभाळ फाटे ॥
डेऱ्यांत शिपाई अविंध मराठे । आपासभोंतीं बैसले ॥ ५० ॥

\+ + + + +

* १ चिमाजी आप्पा.

## पंचचामर वृत्त.

'बहिरोपंत सातान्यास भाऊ पाठवी जेव्हां ।
बळेंच राजापासुनी वस्त्रें आणिलीं तेव्हां ॥
तेव्हां यशोदाबाईलागीं भाऊनीं बोलाविलें ।
तों बाईनीं निरोप धाडिला नव्हे हें चांगलें ॥ ३३ ॥
तुम्हीं प्रबुद्ध थोर काय सांगावें तुम्हांस रे ।
कसे अपास दत्त देतसां ते माझे सासरे ॥
सून त्यांचि मी मला ते दत्त देतसां कसे ।
अयोग्य कर्म काय भाऊ वर्ततां तुम्ही असे ? ॥ ३४ ॥
पुनः यशोदाबाइला निरोप भाऊ पाठवी ।
सून सासऱ्याचि कल्पना मनांत नाठवीं ॥
तुम्हीं स्वसंतोषें अलांत फार चांगलें म्हणे ।
न आलियास मग आम्ही आणूं तुम्हां बुरेपणें ॥ ३५ ॥
बाई भ्यालि अंतरीं म्हणे हे अब्रु घेतिल ।
करूनियां जुलूम दत्त चिमा अपास देतिल ॥
अबरू टिके कशी एतदर्थीं बाई हो भारी ।
चिमा अपाविधान समयीं खेद अंतरीं करी ॥ ३६ ॥

या चार श्लोकांवरून यशोदाबाईवर परशुरामभाऊंनीं कसा जुलूम केला, हें अगदीं स्पष्ट दिसत आहे. सातारच्या महाराजांकडून 'बळेंच' पेशवाईचीं वस्त्रें आणून, बाजीरावास विश्वासघातानें शिंद्यांच्या लष्करांत पाठवून, चिमाजी अप्पास दुरुत्तरें बोलून, परशुरामभाऊंनीं जी अपकीर्तीची इमारत उभारली, तिजवर, यशोदाबाईस, तिची अब्रू घेण्याचा धाक घालून त्यांनीं कळसच चढविला असें म्हटलें पाहिजे! बरें, इतक्या जुलमानें उभारलेल्या या कारस्थानाचा शेवट तरी चांगला झाला असता, तर गोष्ट थोडीशी निराळी होती, पण तसेंही झालें नाहीं. शिंद्यांनीं चिमाजी अप्पाचें दत्तविधान रद्द करून पुनः बाजीरावास पेशवाई दिली व भाऊंचा

व्यूह सपशेल ढांसळून टाकला. एकंदरींत, नीति व मुत्सद्देगिरी या दोन्ही दृष्टींनीं भाऊचें आचरण गर्हणीयच दिसतें. असो.

सहाव्या अध्यायांत दुष्काळाचें वर्णन दिलें आहे, तें तर अंगावर शहारे आणणारें आहे. ह्या दुष्काळाचें भविष्य ‘ चिंतामणि जोशी ’ नामक एका ज्योतिषानें पूर्वींच करून ठेवलें होतें असें फंदी म्हणतात:—

ओंव्या.

‘पूर्वीं भाकित होतें जाणे जोशी । कीं पुढें येईल रुद्रवंशी ।
काळ पडेल दाक्षिणदेशीं । वर्णसंकर होईल ॥ ४ ॥
राज्यांत माजेल धुमाळी । घरोघर आपल्या होतील बळी ।
बळी तोच कान पिळी । महा अनर्थ होईल ॥ ५ ॥
पाळणें लागतील डोंगरीं । मनुष्यें पळतील गिरीकंदरीं ।
विसा पंचविसा कोसांवरी । वस्तीलागीं एक ग्राम ॥ ६ ॥
सहस्र घरांची वस्ती जेथें । दहा पांच घरें राहतील तेथें ।
खून पडावे मार्गपंथें । तें तें आलें अनुभवा ॥ ७ ॥
डोंगरावरी लागेल दिवा । गांवांत भुंकतील भालुवा ।
हें आवडेल महादेवा । रुद्रवंशी लागतांची ॥ ८ ॥
याला जो असत्य म्हणेल कोणी । मग मी करीन त्याची पुरवणी ।
तरीच हा **जोशी चिंतामणी** । हें वाक्य माझें सत्य जाणा ॥ ९ ॥

हा चिंतामणि जोशी मोठा नामांकित ज्योतिषी होऊन गेला असावा, असें वाटतें. ‘ चिंतामणी शकुनवंती ’ या नांवाचें एक हस्तलिखित पुस्तक माझ्या संग्रहीं आहे, त्याचा कर्ता हाच चिंतामणि जोशी असण्याचा संभव आहे. या पुस्तकाची भाषा दोन अडीचशें वर्षांपूर्वींची दिसते. असो.

‘‘त्याच्या कारकीर्दींतल्या ह्या बंडाचें व दुष्काळाचें वर्णन

असो, पुढें बंडाला आरंभ झाला । जोही ज्याच्या गृहांत गेला ।
घरधनीच होऊनि उभा ठेला । यजमान जैसा तस्कर ॥ १ ॥
ज्यास जी वस्तु आवडावी । तितुकी त्यानें सावडावी ।
मना जे नावडावी । ते ठेवावी घरधन्यास ॥ २ ॥
दह्यातुपाचीं चारुळीं । भक्षुनी भरावीं थारोळीं ।
घरधनी मारितां आरोळी । आधीं त्याजला चोपावें ॥ ३ ॥
मग त्याची गृहस्वामिनी । करीत भोंवती शंखध्वनी ।
तों तिची बांधूनियां वेणी । मार देती फरमासी ॥ ४ ॥
लावूनियां दरवाजा । यथासांग घालिती पूजा ।
तेथें ईश्वराखेरीज दुजा । कोण त्याला वांचवी ॥ ५ ॥
हरतऱ्हेचे मार द्यावे । ताऊनियां तप्त तवे ।
मोठमोठाले नखरी नवे । उभे करावे त्यावरी ॥ ६ ॥
कर्णघ्राणीं दारू भरिती । वरूनि बत्ती लाविती ।
तिळमात्र दया नुपजे चित्तीं । शिवाय कुरघोड्या वेगळ्या ॥ ७ ॥
शें दोनशांस करावे ओणवे । उडून त्यांवरी बैसावें ।
राख मिर्चीं घालूनि द्यावे । तोबरे मुखीं घोड्यांच्या ॥ ८ ॥
अशक्ताची करावी घोडी । वर बसवावा जड गडी ।
स्वस्थपणें ओढीत गुडगुडी । तोंड झोडी चाबकानें ॥ ९ ॥
चराटांची सरासरी । त्याची करावी गळसरी ।
मग तो डोळे वटारी । प्राण जाऊं पाहतो ॥ १० ॥
खटमार म्हणजे जगविख्यात । वरकड मार त्याचे आश्रित ।
ही टूम ईश्वरें अनश्रुत । कोठूनि काढिली कळेना ॥ ११ ॥
इंद्रियातें बांधोनी दोरी । उचलूनी त्याचे तराजू करी ।
एक येतां जातां मारी । कोठवरी सोसाव्या यातना ॥ १२ ॥
कांकडे घेऊनियां आपुले हातीं । समग्र दाढी मिशा जाळिती ।
एक मोचासुद्धां हाणिती । मुखावरी ब्राह्मणाच्या ॥ १३ ॥
मुखावाटे वाहे रुधिर । तों पुनः मारिती वारंवार ।
आरडताती जैसे ढोर । हे उपचार शरीराचे ॥ १४ ॥

पायांस बांधावी चऱ्हाटें । झाडासी बांधिती उफराटे ।
मग ते ब्राह्मण अथवा मराठे । कोण तेथें निवडितो ? ॥ १५ ॥
अग्निहोत्र यांच्या यज्ञकुंडीं । कोपोनी रांधिती अजामुंडी ।
होमशाळेमाजीं धुंडी । घरधनी कोठें धरा हो ॥ १६ ॥
घरदार लुटावें सर्वपरी । घरधनीच धरावा बिगारी ।
बायका मुलें लहान थोरी । बिगारी अवध्यांनीं पोंचवावी ॥ १७ ॥
घरें लुटूनियां बिगारी न्यावे । मुकामीं झाडासी बांधावे ।
आणिकही त्यांजला पुसावें । दौलत कोठें दाखवा ॥ १८ ॥
मग ते बोलतां दीनवदन । दौलत आणिली आपण ।
आतां आमुचे प्राण । मस्तकें ठेविती पायावरी ॥ १९ ॥
तइचें मस्तक धरूनि त्यांनीं । आपटित असावें मेदिनी ।
हाय हाय म्हणोनी । प्राण जाती कैकांचे ॥ २० ॥
तथापि त्याला न सोडिती । राहिले त्यांसही तोडिती ।
माकडहाडें मोडिती । कुठार जैसी काष्ठावरी २१ ॥
आलें जैसें पिरगळावें । तैसें मनुष्य धरूनि मुरगळावें ।
गळ्यांत बांधोनियां दावें । ओढावें जैसें मेंढरूं ॥ २२ ॥
एक नासिक पिरगाळिती । एक उगेच गालोरे घेती ।
एक उडूनियां बैसती । घोड्यापरी माणसावरी ॥ २३ ॥
समय पातला उफराटा । ज्याचे सदनीं सुवर्णसांठा ।
त्याला अपवाद पिठाचा तोटा । दोन प्रहराची भ्रांती त्याला ॥ २४ ॥
लुटीचीं वस्त्रें अपरिमित । महारपोरग्यांस झालीं प्राप्त ।
परंतु पांघरावयाची पूत । काय त्याला ठाउकी ॥ २५ ॥
मस्तकीं गुंडाळिती पितांबर । लुगडेंच पांघरती वेडे पीर ।
बायकांचे अलंकार । गळयांत घालावे आपुल्या ॥ २६ ॥
हार पुतळ्यांचे घालिती गळां । भाषेंत आपुल्या सांगे सकळां ।
कांहीं आहेत सुनेच्या माळा । दुसऱ्या लेइल्या दुल्लडी ॥ २७ ॥
कोलदांडे घालोनियां एकसरीं । झाडासि टांगिताती हारोहारी ।
जळत काष्ठें घालिती शिरीं । मांस तोडिती सांडसानें ॥ २८ ॥

दुधारीं ठेवावीं वक्षस्थळीं । एक उगाच बोटें मुरगाळी ।
एक नाकपुडी पिरगाळी । एक निपसितो दाढीमिशा ॥ २९ ॥
एकदांचि धरोनियां शें दोनशें । बळदांत कोंडावीं माणसें ।
पुनः त्यांचें स्मरणहि नसे । जीवंत किंवा मेले ते ॥ ३० ॥
कैसेंही शक्तिवान् असेल मनुज । तें शक्त्यनुसार उचलील ओझें ।
पहिलवान मस्तकीं सहज । गज कैसा घेईल ॥ ३१ ॥
पोहणार नेला समुद्रतीरीं । म्हणे परत जाऊनि ये माघारीं ।
लक्ष मनुष्यांचें अन्न पात्रीं । बलिष्ठ तेथें काय करी? ॥ ३२ ॥
असो, पुरुषाची जेव्हां ऐशी दशा । मग ठेविल्या असतील स्त्रिया कैशा ।
मनास ज्याच्या आवडेल जैशा । त्यानें तैशा भोगाव्या ॥ ३३ ॥
चांगल्या अथवा ओंगळी । ज्यास जी मिळे क्षुधाकाळीं ।
तोच तिला कवटाळी । भ्रताराचे सन्मुख ॥ ३४ ॥
तो अविचार सांगतां यथायुक्त । दोष घडेल आणि वाढेल ग्रंथ ।
हे अविचाराचे पर्वत । कोठवरी सांगावे ॥ ३५ ॥
अन्न न मिळे मनुष्यांतें । कोट्यावधि पडलीं प्रेतें ।
जननी आपुलिया बाळकातें । हिरवेंच लागे भक्षावया ॥ ३६ ॥
वृक्षास न राहे एक पर्ण । मग अपक्क राहतील कोठून ।
सोतरोंठे बरबडे भक्षून । तरी वांचले नाहींत ॥ ३७ ॥
वृषभ धेनु सूकर श्वानें । मत्स्य मंडूक गणपतीवाहनें ।
सर्वही भक्षिले भिकाऱ्यानें । शेवटीं प्राण गेले हो ॥ ३८ ॥
असंख्यात पर्वताचे पर्वत । बिदोबिदीं शिरें लोळत ।
काक घारी श्वान बहुत । प्रेतालागीं तुडविती ॥ ३९ ॥
असें जें भक्षूं नये तें भक्षिलें । शेवटीं ईश्वरीं उपेक्षिलें ।
त्यांतून चवथाई रक्षिलें । तीन हिस्से गतप्राण ॥ ४० ॥
हातानें तोलावें सुवर्ण । धान्य मोजावें ताजव्यानें ।
अच्छेर दीडपाव दाणे । रुपयाचे तेही न मिळती ॥ ४१ ॥
अन्नावांचून चालले प्राण । लोक जाहले ते निर्धन ।
मायांच्या गळां मिठी घालोन । मुलें बाळें आक्रंदतीं ॥ ४२ ॥

अन्नाकरितां प्राण गेले । अधम कैंचे रस्त्यात मेले ।
तेथें भिकारी अवतरले । त्या प्रेताल भक्षावया ॥ ४३ ॥
जैसे दाणे काढिती कणसाचे । मग काय प्रयोजन बिटोरियाचें ।
तैसें मांस रक्त भक्षावें त्याचें । सांपळे हाडाचे लोळती ॥ ४४ ॥
तें मांस ज्यानें भक्षिलें । सर्वेंचि त्याचे प्राण गेले ।
असो ऐसे लक्षानुलक्ष मेले । गणित कोणा न करवे ॥ ४५ ॥
कोणी गृहस्थ ठेवावा चाकरी । तो चोरूनि आधीं भक्षितो भाकरी ।
इतकी धान्याची अखेरी । कधीं पाहिली न ऐकिली ॥ ४६ ॥
स्त्री पाहतसे भ्रताराचें मढें । तिच्याही न पाहवे पोटाकडे ।
तान्हें लेंकरूंही न घेववे कडे । त्याचीही आस्था सोडिली ॥ ४७ ॥
कोण प्रेताला ओढितो? । येथें अवघ्यांचा प्राण जातो ।
कोण कोणाचा समाचार घेतो? । यांत वांचतो कोणता? ॥ ४८ ॥

इतकें वर्णन देऊन अनंतफंदी म्हणतात:—

महा अभिमानी देखण्या नारी । त्या घरोघर लागल्या दाण्यावारी ।
घरधनी वरूनि काठ्या मारी । मग अभिमान कोठें राहिला? ॥ ४९ ॥
बंड आणि महर्घतेचा संयोग । या उभयतांचा घडतां योग ।
प्रलय झाला यथासांग । रुसावयाला जागा न ठेविली ॥ ५० ॥
**स्वामीचा जे घात योजिती । शेवट त्यांच्या ऐशा गती ।**
**सत्क्रियेसी न जागती । ते अधोगतीं मरताती ॥ ५१ ॥**

वरील वर्णन वाचून, त्यांत अतिशयोक्तिचा भाग फार आहे, असें कित्येकांस वाटण्याचा संभव आहे; पण अनंतफंदी म्हणतात:—

‘ प्रताप असे यत्किंचित । परंतु कवीचा लाघव बहुत ।
तैसा येथें अनर्थ अत्यद्भुत । कवीनें यत्किंचित वर्णिलें ॥ ’

असा भयंकर छल सहन करून दगदगलेल्या महाराष्ट्रीयांनीं शांततामय इंग्रजी राजसत्तेचा अभिनंदनपूर्वक स्वीकार केला यांत आश्चर्य तें काय?

सांगतात कीं, रावबाजींनीं एकदां आपणावर कांहीं कविता करण्याविषयीं फंदीस सांगितलें. त्यावेळीं फंदींनीं खालील ओंव्या म्हटल्या:——

वडिलांचे हातचे चाकर । त्यांस न मिळे भाकर ।
अजागळ ते तूप साकर । चारूनि व्यर्थ पोशिले ॥ १ ॥
सत्पात्राचा त्रास मनीं । उपजे प्रभूचे मनांतूनि ।
ज्या पुरुषास न पुसे कोणी । आधीं त्याला भजावें ॥ २ ॥
तट्टू ज्यास न मिळे कधीं । पालखी द्यावी तयास आधीं ।
मडकें टाकूनि भांड्यांत रांधी । ताट वाट्या भोजना ॥ ३ ॥
द्रव्य देवोनि आणिक आणिक । नवे तितके केले धनिक ।
जुन्याची तिंबुनि कणिक । राज्य आपुलें हरविलें ॥ ४ ॥
जो पायलीची खाईल क्षिप्रा । पालखी द्यावी तया विप्रा ।
निरक्षर एखाद्या विप्रा । त्याला क्षिप्रा चारावी ॥ ५ ॥
एके दिवशीं व्हावी खुशाली । स्वारी पुढें शंभर मशाली ।
एके दिवशीं जैशी निशा आली । मशाल एकही नसावी ॥ ६ ॥
मेण्यांत बसावें जाउनी । कपाटें घ्यावीं लावुनी ।
स्वरूप कोणा न दाखवूनी । जागे किंवा निजले कळेना ॥ ७ ॥
हुताशनीच्या सुंदर गांठ्या । शेरशेर साकरेच्या पेट्या ।
विप्रकंठीं जैशा घंट्या । उग्याच कंठ्या घालाव्या ॥ ८ ॥
तशाच राख्या जबरदस्त । सांभाळितां जड होती हस्त ।
दौलत लुटूनि केली फस्त । हस्त चहूंकडे फिरविला ॥ ९ ॥
तुरा शिरीं केवढा तरी । बहुतचि मोठा चक्राकारी ॥
हार गजरे नखरेदारी । सोंगापरी दिसावें ॥ १० ॥
हात हात रेशमी धोतरजोडे । चालतां ओझें चहूंकडे ।
आंगवण दहादां पडे । चरणीं खडे रुतताती ॥ ११ ॥
पोषाग दिधले बाजीरावें । मोच्यांस पैका कोठें आहे? ।
तैसेंच अनवाणी चालताहे । शास्त्री अथवा अशास्त्री ॥ १२ ॥

घडींत व्हावें क्रोधयुक्त । घडींत व्हावें आनंदभरित ।
घडींत व्हावें कृपण बहुत । घडींत उदार कर्णोपरी ॥ १३ ॥
घडींत व्हावी सौम्य मुद्रा । घडींत यावा कोप रुद्रा ।
घडींत घ्यावी क्षणैक निद्रा । स्वेच्छाचारी प्रभु हा ॥ १४ ॥

हें वर्णन वाचून ज्यास हसूं येणार नाहीं असा गंभीर मनुष्य क्वचितच सांपडेल. आख्यायिकेंत सांगितल्याप्रमाणें फंदीबुवांनीं ह्या ओंव्या बाजीरावांस प्रत्यक्ष ऐकविल्या असतील, ही गोष्ट संभवनीय दिसत नाहीं. शिवाय, 'राज्य आपुलें हरविलें' या वाक्यावरून, बाजीरावसाहेब पेशवे पदभ्रष्ट झाल्यावर फंदींनी या ओंव्या रचिल्या असल्या पाहिजेत, हें उघड होतें. इ० स० १८१८ त पेशवाई बुडाली व इ० स० १८१९ त फंदीबुवा कैलासवासी झाले; या काळाच्या दरम्यान केव्हां तरी वरील ओंव्या रचिल्या असाव्यात.

खर्ड्यांच्या लढाईवरचा फंदींचा पोवाडा प्रसिद्धच आहे. ह्या पोवाड्यावरून व इतर उद्गारांवरून श्रीमंत सवाई माधवराव पेशव्यांसंबंधानें फंदींची मोठी पूज्यबुद्धि दिसते. पुढील चरण पहा:—

'सवाई' माधवराव सवाई भाग्योदय ज्याचे पदरीं ।
यशवंत श्रीमंत पेशवे अपेश तेथें पाणी भरी ॥'

पेशव्यांप्रमाणेंच नाना फडणवीस, यशवंतराव होळकर, फत्तेसिंग गायकवाड, चिंतामणराव पटवर्धन, बाळासाहेब पटवर्धन इत्यादि ऐतिहासिक पुरुषांवर अनंतफंदींनीं केलेले फटके प्रसिद्ध आहेत. या फटक्यांत त्या त्या पुरुषाच्या स्तुतीबरोबरच थोड्याशा व्यंजनेनें त्यांच्या दुर्गुणांचें व दुष्कृत्यांचेंही दिग्दर्शन करण्यास फंदींनीं कमी केलेलें नाहीं. तथापि धाकट्या बाजीरावांसंबंधानें अनंतफंदी व त्यांचे चिरंजीव सवाईफंदी यांनीं जसा तिरस्कार प्रदर्शित केला आहे, तसा दुसऱ्या कोणत्याही पुरुषासंबंधानें केलेला नाहीं.

## सवाई फंदीकृत रावबाजीचा पोवाडा.

उव्या केशरी टिळा कस्तुरी कमालखानी हार गजरे ।
गहेनाजि बहेनाजि अक्षयीं जवळ पालखीच्या हुजरे ॥
जुनीं माणसें तीं कणसाला महाग गैर त्याची बुज्ज रे ।
चार चटारी भटारि हलके जाणुनि घे अलबत मुजरे ॥
सुंदर स्त्री दुसऱ्याची तिसरा.................... ॥ १ ॥
शाल्योदन मिष्टान्न भोगता सवा शेर ज्याचा सवता ।
चौविस वर्षे चैन भोगिली राज्यक्रांति जाणुन नवता ॥ ध्रु० ॥

* * * * *

दौलतीस बाजीराय करील अपाय म्हणत होते नाना ।
खेळ करुनि उफराटा वरवंटा रयतेच्या भंवता ॥ २ ॥
कुलकल्ला त्रिंबकजी डेंगुळ अगादिं राहिले दिडबोट ।
पंढरपुरीं महाद्वारीं शास्त्री ठार केले कर्मच खोटें ॥
चौकुन मग विचकोचा तोबा हाय सुकुन गेले ओठ ।
आळ येतांच चंडाळ गडावर पदरिं काय पडला धोट ॥
सर्वांची रग जिरलि म्हणुनि ताळि भरलि आला दीप मालवता ।
**फंदी मूल** ह्मणे असति विरस कां गादि पुण्याची घालवतां ॥ ३ ॥

पुढील फटक्यांत गायकवाडी आणि पेशवाई व बडोदें आणि पुणें यांची तुलना व वर्णन हीं फार मार्मिकपणें केलीं असून, त्यांवरून फंदींचें सूक्ष्मावलोकन व व्यवहारचातुर्य उत्तम प्रकारें व्यक्त होतें.

## फत्तेसिंग गायकवाडांचा पोवाडा.

पुण्यांत बाजीराय, बडोद्यांत फत्तेसिंग महाराज ।
उदार स्वामी सेवक त्यांना कर्णाची उपमा साजे ॥ ध्रु० ॥
इकडे अमृतराय वडील, तिकडेही आनंदराय दादा ।
इकडे प्रभु बाजिराय, तिकडे फत्तेसिंहसाहेब जादा ॥
इकडे आप्पासाहेब तिकडे, महाराज सयाजी उमदा ।
इकडे पांच चार वाडे, तिकडेही तसाच महाल जुदा ॥

इकडे स्वामीचाकरीस पलटणें, तिकडे सेवक इंग्रज ।
उदार स्वामी सेवक त्यांनां कर्णाची उपमा साजे ॥ १ ॥

इकडे स्वार शिपाई, तिकडेहि तसेच थोडेबहुत ।
इकडे श्रावणमासीं दक्षिणा, तिकडेही धर्म होत ॥
इकडे आल्यागेल्याचा आदर करितात यथास्थित श्रीमंत ।
तिकडेही जो आला गुणिजन तो नाहीं गेला रिक्तहस्त ॥
इकडे पेशवे, तिकडे गायकवाड उभयतांही शिरताज ।
उदार स्वामी सेवक० ॥ २ ॥

इकडे भरगच्ची पांघरुणें, तिकडेही त्याहून चढी ।
इकडे अन्नशांतिचा तडाखा, तिकडेही चालू खिचडी ॥
इकडे आदितवार बुधवार तिकडेही मांडवींत घडामोडी ।
इकडे मुळामुठा, तिकडे विश्वामित्री जोडी ॥
इकडे तलाव पर्वतीचा, तिकडे सुरसागर नांव गाजे ॥
उदार स्वामी सेवक त्यांना० ॥ ३ ॥

इकडे भूमिवर अंथरुण, तिकडे रीतिमुळें घरोघर खाटा ।
इकडे पैका पुष्कळ, तिकडेही सुवर्णाच्या लाटा ॥
इकडे जुनावाडा, तिकडेही लहरिपुऱ्याचा बोभाटा ।
इकडे पुरण वरण, तिकडे चुरमा, क्वचित् वरवंटा पाटा ।
इकडे पैठणी लफ्फे, तिकडे उशाजवळ अमदाबाद ॥
उदार स्वामी सेवक० ॥ ४ ॥

इकडे हत्ती घोडे पालख्या, तिकडेही कमती नाहीं ।
इकडे रावबाजी, तिकडे फत्तेसिंगाची दाहिदुराई ।
इकडे जोगेश्वरी, तिकडेही दैवतें बेचराई ।
इकडे देवस्थानें, तिकडेही तशींच सांगूं काई ।
इकडे लोक दक्षिणी, तिकडे गुजराथी न्यारि मिजाज ॥
उदार स्वामी सेवक० ॥ ५ ॥

इकडे उत्साह गणपतिचा, तिकडे तशीच चंपाषष्ठी ।
इकडे हरदासांच्या बिदाग्या, तिकडे तशाच भरमुष्टी ।

इकडे मेघडंबरी, तिकडे तर्शीच पहा जा दृष्टीं ।
इकडे ओंकारेश्वर, तिकडे मुक्तेश्वर नवीच सृष्टी ।
इकडे दिग्गज पहिलवान, तिकडे जेठी कुस्ती रोज ॥
उदार स्वामी सेवक० ॥ ६ ॥

इकडे नाना फडणिस, तिकडे सिताराम दिवाण गाजी ।
इकडे पंत सदाशिव, तिकडे शास्त्री गंगाधर दाजी ।
इकडे बागमळे, तिकडे हरजिन्नस शाखभाजी ।
इकडे माती, तिकडे रेती हारफेर जमिनीमाजी ।
इकडे हौद पाण्याचे, तिकडे कुव्यावर मोठी मौज ॥
उदार स्वामी सेवक० ॥ ७ ॥

इकडे रावबाजी पंढरीस आषाढि यात्रे जातात ।
तिकडे विसां कोसांवर डाकुरजी पंढरिनाथ ।
इकडे गंगा जवळ, तिकडेही तसेंच रेवातीर्थ ।
इकडे तसेंच तिकडे वटाव दोन्हीकडला यथार्थ ।
इकडे कडेतोडेवाले, तिकडेही तशीच लहज ।
इकडे अनंतफंदी, तिकडेही जाउनि आला सहज ।
उदार स्वामी सेवक त्यांना० ॥ ८ ॥

फंदीबुवांनीं हा फटका रचला, त्यावेळीं गंगाधर शास्त्र्यांचा खून झाला नव्हता व पुण्याचा राज्य—कारभार नानाफडणीस यांच्याकडेच होता अर्थात् बाजीरावासंबंधानें फंदींचें मन त्यावेळीं फारसें कलुषित झालेलें नसल्यामुळें, वरील फटक्यांत बाजीरावांची स्तुतीच केलेली आढळते. शेवटच्या चरणांतर्लें ‘ इकडे अनंतफंदी, तिकडेही जाउनि आला सहज ’ हें वाक्य फार मौजेचें आहे, यांत संशय नाहीं.

फंदीबुवांस आपल्या कवित्वाचा केवढा अभिमान वाटत होता हें त्यांच्या पुढील उद्गारांवरून समजेल:—

‘ विवेकीं विचार सारासार । कविता अनंतफंदी करी ।’
ताल सूर नमुदा लागली ॥’

'अनंतफंदीचे छंद जखमा जशा जिव्हारीं शस्त्राच्या ।'
'अनंतफंदीचे छंद ऐकतां लढाई झाली ही सारी'
'फंदी मलिकचा ठिकाण *पोखरिशी ।
करि अभंग लावण्या धाक पडे वैऱ्यांसी ॥'
'फंदि अनंताचि लपेट झपेट ही विकट बिकट धरणी ।'
'गावयास अनंतफंदीचे फटके मागें सरूं नको ।'
'फंदी अनंताची कविता सवाई सोटा रे सोटा ॥'

अनंतफंदीची 'चंद्रावळी' ची लावणी मोठी असून फार सुरस आणि बहारीची आहे; पण तींत शृंगाररसाचा थोडासा अतिरेक झालेला असल्यामुळें ती येथें उतरून घेतली नाहीं. फंदीच्या हिंदुस्थानी लावण्याही सरस आहेत. असो. शेवटीं फंदीबुवांची एक उपदेशपर लावणी येथें देऊन हें चरित्र पुरें करितों:—

येउं दे वाचे नाम देवाचें अष्टौ प्रहरा शिव हर हर ॥ ध्रु० ॥
दे टाकुनि हे छंद वाउगे फंद विषयाची काय मजा ।
हरिनामाची लावि ध्वजा ॥ असार हा संसार त्यजा ।
तमोगुणाला धाच रजा । रजसत्वाची करीं पूजा ।
क्षमा शांति मनिं धरीत जा । भगवीं वस्त्रें करीं पोटभर
भिक्षा मागें घर घर घर ॥ १ ॥
परोपकारा शरीर झिजावें जैसा मैलागिरी चंदन ।
कर सज्जनचरणीं वंदन । सा शत्रूंचें करिं कंदन ।
गृहवैभव वाजी स्यंदन । अशाश्वतीं ह्या हो धुंद न ।
आठविं मनिं दशरथनंदन । अनंतफंदी घालि विठ्ठला
गरके गर गर गर ॥ २ ॥

---

* यांत 'मलिकफंदीचा' उल्लेख असून, ते 'पोखरी' येथें राहत असत असें दिसतें.

## होनाजीबाळा.

ह्या कवीची 'घनश्यामसुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला' ही सुंदर भूपाळी ज्यानें ऐकली नाहीं, असा महाराष्ट्रीय विरळा. रा० देवल यांनीं आपल्या शारदा नाटकांतल्या 'जरी कुणा श्रीमंताची सून होय शारदा' ह्या लोकप्रिय पदाची रचना ज्या मूळ पदाच्या चालीवर केली आहे तें 'राधे हा मुकुंद कडिये उचलोनि घेई घेई' हें पदही होनाजीबाळाचेंच होय. महाराष्ट्रांतल्या अत्यंत प्रतिभासंपन्न कवींपैकीं होनाजीबाळा हे एक होत. पेशवाईच्या शेवटच्या अमदानींत होनाजीबाळाचें नांव सगळ्या महाराष्ट्रांत दुमदुमून राहिलें होतें. सोलापुरास रामजोशी, कोंकण प्रांतांत प्रभाकर, गंगथडींत परशुराम शाहीर, संगमनेरास अनंतफंदी व पुणें प्रांतांत होनाजीबाळा आणि सगनभाऊ ही सगळी मंडळी समकालीन होती; व ह्या सर्वांनीं मराठी वाङ्मयांत आपल्या कवित्वानें जी भर घातली आहे, तीमुळें त्या वाङ्मयाचें स्वरूप थोडें तरी बदलल्याशिवाय राहिलें नाहीं.

धाकट्या बाजीरावसाहेबांच्या कारकीर्दींत लावण्या करणारे मराठी कवि आणि शाहीर प्रथमतः उदयास आले. बैठकीच्या लावण्या रागातालांत रचून त्या आपणास कोणी म्हणून दाखविल्यास आपण मोठ्या आनंदानें ऐकूं असें बाजीराव एकदां म्हणाले होते; व ही त्यांची इच्छा शेवटीं होनाजीबाळा यांनीं पूर्ण केली. बाजीरावसाहेबांस तमाशे ऐकण्याचा भारी छंद असे; नटाचें तोंड आणि त्यानें केलेले हावभाव, बाजीरावसाहेब मोठ्या कौतुकानें पाहत असत. बाजीरावांचेपूर्वीं तमाशे फारसे प्रचारांत नव्हते; त्या कलेची पूर्णता व उत्कर्ष बाजीरावांचेच कारकीर्दींत झाला. बडोद्याचे खंडेराव महाराज गायकवाड यांनींही तमासगीर लोकांस बरेंच उत्तेजन दिलें.

होनाजीबाळा हे जातीचे गवळी; त्यांचें आडनांव शिलारखाने. त्यांचे आजोबा साताप्पा गवळी. हे पुणें येथेंच राहात असत व ते स्वतः लावण्या रचून त्या म्हणत असत. ह्यांस शंकराचें वरप्रदान होतें, असें सांगतात. साताप्पांची समाधि पुणें येथें संगमावर हरनामगिरीचे घाटावर आहे, त्या स्थळास शांतलिंग म्हणतात. ह्या लिंगापुढें, श्रावणमासांत प्रत्येक सोमवारीं तमासगीर लोक हाजिरी देतात, असें ऐकतों. साताप्पांस तीन मुलगे होते; बाळा, कुशाबा आणि सयाजी. ह्यांपैकीं बाळा हा कवि व गवई होता. बाळाचा साथीदार बहिरू रंगारी. ह्या दोघांचे नांवाच्या पुष्कळ लावण्या प्रसिद्ध असून, त्यांत 'बाळाबहिरू' अशीं नांवें आढळतात. 'होनाजीबाळा' या नांवांचा प्रकारसुद्धां असाच आहे. होनाजीस त्यांचे घरची मंडळी होनाप्पा म्हणत असत, व त्याचा सोबती बाळा शिंपी कारंजकर या नांवाचा एक गुणी मनुष्य होता. हे दोन्ही मित्र एके बैठकींत असल्यामुळें व तमाशांत त्यांची नेहमीं जोडी असल्यामुळें पेशव्यांचे व इतर लोक त्या दोघांस 'होनाजीबाळा' या नांवानें संबोधीत असत. होनाजींनींही आपल्या लावण्यांत सर्वत्र याच नांवाचा उल्लेख केला आहे. होनाजीचा चुलता बाळा व त्याचा साथीदार बहिरू हे चांगले गवयी असून, साताप्पाच्या मागें त्याचें नांव बाळानें चांगलें राखिलें. ह्याच्या सर्व लावण्या बैठकीच्या आहेत. होनाजीनेंही आपल्या आजोबाचें व चुलत्याचें अनुकरण करून लावण्या रचण्यास प्रारंभ केला. फडावरील ज्या उंच स्वराच्या लावण्या असतात, त्या होनाजींनीं कधीं म्हटल्या नाहींत. भैरवी रागांत पहाटेच्या सुरावर लावणी म्हणण्यासंबंधानें होनाजीची फार प्रख्याति असे. पेशवाईच्या अखेरीस पुण्यांत शुक्रवारांतून दोन प्रहर रात्रीं, बावनखणीवरून जातांनां तेथील वारांगनांचे जे रागबद्ध सुस्वर आलाप ऐकूं येत असत, ते हळूहळू बंद

पडून, एकदम डफावर थाप पडली ! पुण्यपत्तनस्थ विश्वयोषितांच्या कन्यका, रागदारीच्या "सुरांत गाण्यासाठीं ख्याल, टप्पे वगैरे चिजा शिकत असत, त्यांना शेवटीं होनाजी बाळाच्या लावण्या शिकण्याचा प्रसंग आला ! त्या वेळच्या ह्या गायनक्रांतीविषयीं एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, ' रात्रीस रस्त्यांत आणि बोळांत फिरणाऱ्या विलासी लोकांचीं मनें आपणाकडे ओढून घेणाऱ्या चिमणी, साळू, मैना यांच्या कंठांत होनाजीबाळानें घातलेले खडे सूर आणि फौजे-कडील शिलेदार, बारगीर, शिपाई आणि शहरांतील सुखवस्तु शिंपी, माळी, सराफ, दुकानदार यांस रिझविण्यासाठीं बहिरू, मल्हारी, धोंडीबापू, सगनभाऊ, आणि रामा गोंधळी यांनीं सज-विलेले डफतुणतुण्याचे तमाशे आणि कलगी तुऱ्याचीं भांडणें; हे सर्व थाट रावबाजीच्या उल्लसित मनोवृत्तीच्या प्रेरणेनें पुणें शहरांत जेथें तेथ गाजून राहिले होते. मग ' यथा राजा तथा प्रजा ' या न्यायानें त्या प्रेरणेचा अंमल सर्व पेशवाईंत पसरला नसेल असें संभवत नाहीं. त्या काळीं सर्व गुणीजनांचे आशेनें भरलेले डोळे पुणें शहराकडे लागले असून, त्या शहरानें जो कित्ता घातला होता, त्याची नक्कल जेथें तेथें होऊन कित्येक ठिकाणीं त्या नकलेवर ताण करणारे उमेदवारही निपजूं लागले.'

होनाजीबाळांवर पेशव्यांची इतकी मर्जी बसली होती कीं, त्यांज-कडून त्यांस शेले, दुपेटे, आणि रोकड पैसा किती तरी मिळाला. हें द्रव्य होनाजीनीं त्रिंबकजी डेंगळ्याच्या घरीं ठेविलें होतें. पुढें त्रिंबकजीवर पटवर्धनशास्त्र्यांचा खून केल्याचा आरोप येऊन त्याच्या संपत्तीची विल्हेवाट लागली, त्यांतच होनाजीबाळांच्या संपत्तीचीही वाताहत झाली. शुक्रवारांत भातकरांच्या हवेलीसमोर पूर्वेस मारुतीचें देवालय आहे, त्याचे शेजारींच त्रिंबकजी डेंगळ्याचा वाडा होता. त्या वाड्यांत होनाजीबाळांची म्हणून एक निराळीच खोली

असे, तेथें त्यांची बैठक असे. तेथेंच डफ, तंबोरी, मंजिरी इत्यादि तमाशाचीं वाद्यें असून, त्याच खोलींत ते आपली मिळकतही ठेवीत असत. पण त्रिंबकजीसारख्या दुष्ट मनुष्याच्या सान्निध्याचें फल शेवटीं त्यांस कसें मिळालें, हें वर सांगितलेंच आहे.

होनाजीबाळांचा शेवट थोड्याशा चमत्कारिक रीतीनें झाला. भाद्रपद कृष्णत्रयोदशीचे दिवशीं दोन प्रहरीं, होनाजींचे घरची सर्व मंडळी रानांत गेली आहे, अशी संधि साधून दोघां महारांनीं होनाजींस बानवडीकडे फसवून बोलावून नेलें व बानवडीच्या अलीकडील रानांत आणखी कांहीं मारेकऱ्यांस जमवून, त्यांजकडून होनाजींस त्यांनीं पुष्कळ मार देवविला. नंतर दोन प्रहर रात्र उलटल्यावर त्यांनीं होनाजींस शहरांत आदितवार पेठेच्या कोंपऱ्यावर आणून ठेविलें. असें करण्यांत त्या मारेकऱ्यांचा काय हेतु होता, हें बरोबर कोणी सांगत नाहीं. कोणी म्हणतात कीं त्या महारांकडून होनाजीनीं सात आठ रुपयांचें गवत घेतलें होतें, त्यासंबंधानें बोलाचाली होऊन प्रकरण इतक्या विकोपास गेलें. दुसरें कारण असें सांगतात कीं, त्यावेळच्या सर्व तमासगीर मंडळींत होनाजीबाळांचें विशेष वर्चस्व असे व त्यामुळें पेशव्यांचे वाड्यांतही त्यांला अधिक मान मिळत असे, हा प्रकार पाहून इतर तमासगीर होनाजींचा द्वेष करीत असत. ह्या द्वेषी लोकांपैकींच कोणीतरी तमासगिरानें होनाजींवर मारेकरी घातले असावे. भाद्रपद कृष्ण चतुर्दशीचे दिवशीं कांहीं नागरिकांनीं होनाप्पांस उचलून त्यांच्या घरीं पोचतें केलें. परंतु मारेकऱ्यांनीं त्यांस इतकें बेदम मारिलें होतें कीं, त्या मारानें त्याच दिवशीं त्यांचा अंत झाला.

बाळाबहिरूची समाध सासवड येथें आहे, त्याप्रमाणें होनाजींची समाध पुणें येथें संगमावर होती, पण पुढें त्या जागेच्या मालकानें ती समाध काढून टाकून, त्या ठिकाणीं खणेसाठीं एक बेकाचें झाड

मात्र लाविलें. हें झाड तेथील लोक अद्याप दाखवितात. होनाजी-बाळाच्या प्रेतसंस्कारास शहरांतले बहुतेक तमासगीर नदीवर गेले होते. तेराव्या दिवशीं, शहरांतील गवळी लोकांनीं आपल्या जातीस व सगळ्या तमासगिरांस भोजन घातलें. त्या दिवसापासून, भाद्रपद कृष्ण चतुर्दशीचे दिवशीं गवळी आळींत होनाजींच्या वाड्यासमोर शहरांतील सगळ्या तमासगिरांनीं हजिरी देण्याचा परिपाठ पडला, तो अद्याप चालू आहे.

होनाजीबाळांनीं पेशवाईंत बहुत द्रव्य मिळविलें, पण तें शेवटीं कसें नष्ट झालें, हें मागें सांगितलेंच आहे. एकं-दरींत, होनाजीबाळांचे व्यवसायबंधु रामजोशी हे जसे शेवट-पर्यंत फटिंग राहिले, तोच प्रकार होनाजीबाळांचाही झाला. पेशव्यां-कडून होनाप्पांस रोकड पैसा पुष्कळ मिळाला; परंतु कायमची मिळकत कांहींएक मिळाली नाहीं. होनाप्पास दोन पुत्र होते; कुशाबा आणि बाबाजी. कुशाबास गणपति आणि कोंडिबा असे दोन पुत्र होते. कुशाबा आणि बाबाजी हे होनाजीच्या लावण्या फार कुशलतेनें म्हणत असत. यांच्या पुढील वंशजांत ही कुशलता कमी होत गेलेली आढळते. असो.

कोंडणपुर येथें जो डोंगर आहे तो व त्या भोंवतालचें रान हीं होनाजीबाळांस पेशव्यांनीं इनाम दिलीं होतीं, असा लोकप्रवाद आहे; पण त्यांत कांहीं तथ्यांश दिसत नाहीं. कारण या बाबतींत अशी माहिती मिळते कीं, सवाई माधवराव पेशव्यांनीं चौधरी गवळी जातीच्या एका स्त्रीस सदर डोंगर गुरें चारण्यासाठीं इनाम दिला असून, त्या स्त्रीच्या घराण्याचा होनाजीबाळांच्या घराण्याशीं पुढें शरीर-संबंध झाल्यामुळें, होनाजींचीं गुरेंही त्याच रानांत चरावयास जाऊं लागलीं. पुण्यांतील शनिवार वाड्यापुढें शिमग्यांत पांच दिवस तमाशा करण्याबद्दल होनाजीबाळांस पेशव्यांकडून सालीना ३०० रुपये मिळत

असत. पुढें इंग्रजी झाल्यावर देखील होनाजींचे मुलगे, बुधवार-वाड्यासमोर पांच दिवस तमाशा करीत असत व त्याबद्दल सरकारांतून त्यांस १०० रुपये मिळत असत, असें तेथील वृद्ध लोक सांगतात. बडोद्याचे थोरले सयाजीराव महाराज गायकवाड यांजकडून होनाजींस दोनशें रुपयांचें वर्षासन मिळत असे. होनाजी-बाळांच्या पश्चात् ग्यानूपाड नारळवाला हा प्रतिवर्षी बडोद्यास जाऊन हें वर्षासन घेऊन येत असे. ग्यानूच्या मृत्यूनंतर हें वर्षासन बंद पडलें.

होनाजीबाळांची एकंदर कविता बरीच आहे. यासंबंधानें रा. शंकर तुकाराम शालिग्राम यांनीं इ. स. १८७९ सालीं असें लिहिलें आहे कीं, 'त्यांच्या ( होनाजींच्या ) घरीं आज तो संग्रह शिल्लक आहे, तो मात्र सर्व होनाजींचाच असेल असें वाटत नाहीं. कारण तो आमच्या अवलोकनांत आला आहे; त्यावरून असें वाटतें कीं, इतकें काम एका माणसाचे हातून उठावयाचें म्हणजे कठीणच आहे. तो संग्रह जुनाट मोडी लिपींत लिहिलेला असून फार अशुद्ध आणि खराब झालेला असा आहे. त्यांतून चाळून पाहतां पाहतां बाळा बहिरू, साताप्पा यांच्याही पुष्कळ लावण्या आम्हांस आढळल्या. यावरून असें वाटतें कीं, होनाजी बाळाच्या आजोबांपासून संग्रह जो केला असेल तोही त्यांत असेल.' होनाजी बाळाची बरीच कविता रा. शाळिग्राम यांनीं प्रसिद्ध केली आहे; ही कविता बरीच अशुद्ध दिसते.

होनाजी बाळा मोठे विद्वान् होत असें नाहीं, तरी पण तत्कालीन मराठी भाषेच ज्ञान त्यांस चांगलें होतें यांत संशय नाहीं. त्यांस संस्कृत भाषेचेंही थोडेंसें ज्ञान होतें, असें त्यांच्या कवितेवरून दिसतें. हिंदी व गुजराथी ह्या भाषाही त्यांस चांगल्या अवगत होत्या. केवळ कवित्वाच्या दृष्टीनें पाहिल्यास होनाजी बाळांची कविता

बरीच वरच्या दर्जाची ठरेल, यांत संशय नाहीं. अनंतफंदींसंबंधानें होनाजींचा फार चांगला अभिप्राय होता, हें फंदींवर त्यांनीं केलेल्या एका लावणीवरून स्पष्ट होतें. ही लावणी याच ग्रंथांत अनंतफंदींच्या चरित्रांत दिली आहे. होनाजी बाळांची 'घनश्याम सुंदरा श्रीधरा' ही एकच भूपाळी त्यांचें नांव महाराष्ट्रांत कायम ठेवण्यास पुरेशी आहे. ही भूपाळी म्हणजे मराठी भाषेंतील अस्सल कवित्वाचा एक उत्तम मासला होय. या भूपाळीवरून, होनाजीबाळा हे जरी शृंगारिक कवि होते, तरी ते प्रेमळ भक्तही होते, ही गोष्ट लक्ष्यांत आल्याशिवाय राहात नाहीं. आमच्या जुन्या कवींत जें काय वैशिष्ट्य आहे, तें हेंच होय. ईश्वरासंबंधानें खरें प्रेम मनांत बाणलेलें असल्याशिवाय केवळ कवित्वाच्या आणि शब्दसौष्टवाच्या जोरावर असलीं प्रेमळ पद्यें रचतां येणें कठीण आहे. आतां ही गोष्ट मात्र लक्ष्यांत ठेविली पाहिजे कीं, होनाजीबाळांचा पेशा तमासगिरीचा होता व त्यास अनुसरून लोकाभिरुचीप्रमाणें आपल्या कवितेंत शृंगाररसास प्राधान्य देणें त्यांस भाग पडलें. होनाजीबाळांस जर उत्तम प्रकारचें शिक्षण मिळालें असतें व उदरनिर्वाहासाठीं तमासगिरीचें अवलंबन करण्याचें त्यांस कारण पडलें नसतें, तर त्यांच्या हातून मुक्तेश्वर मोरोपंतांप्रमाणें अत्यंत उच्च प्रतीची कविता लिहिली गेली असती, यांत मुळींच संशय नाहीं. होनाजींची कवित्वशक्ति—प्रतिभा—उज्वल आहे; पण शिक्षण व परिस्थिति यांच्या प्रतिकूलतेमुळें त्या उज्वलतेस किंचित् अंधुकता आली आहे. लोकांस बोध आणि मनोरंजन यांचा लाभ एकसमयावच्छेदेंकरून व्हावा, हा मुक्तेश्वर मोरोपंतांचा काव्यहेतु; व तात्कालिक मनोरंजन हा होनाजी बाळांचा काव्यहेतु; या हेतुभिन्नत्वामुळें व अधिकारभिन्नत्वामुळें त्यांच्या काव्यांत एवढें अंतर पडलें. अस्तु.

होनाजीबाळांच्या बहुतेक लावण्या गोड सुराच्या आहेत. त्यांच्या चालीही फारशा अवघड नाहींत. सगनभाऊच्या लावण्यांच्या चाली जशा बिकट आहेत, तशा होनाजींच्या लावण्यांच्या नाहींत. रामजोशी, प्रभाकर यांच्या लावण्या विद्वान् लोकांसही आवडण्यासारख्या आहेत, परंतु त्या सामान्य लोकांच्या तोंडीं फारशा नसून त्या लावण्यांचा गूढार्थ अशिक्षित लोकांच्या मनांत लवकर उतरत नाहीं. सगनभाऊच्या सर्व लावण्या शृंगाररसानें भरलेल्या असून त्या उत्तान अर्थास अनुलक्षून रचलेल्या आहेत, आणि म्हणूनच गांवढळ लोकांस त्या विशेष प्रिय वाटतात. होनाजींच्या लावण्यांची एकंदर रचनाच अशी आहे कीं, सुज्ञ आणि अज्ञ यांस त्या सारख्याच प्रिय वाटतात. त्यांच्या लावण्यांची रचना सरळ असून त्यांतील शब्दलालित्य व अर्थगांभीर्य हे गुण वर्णनीय आहेत. शृंगारवर्णनाकडे होनाजींची प्रवृत्ति विशेष दिसते खरी, पण ईश्वरी लीला वर्णन करण्यांतही त्यांनीं आपलें बरेंच कवित्व खर्च केलें आहे. पुराणांतील पुष्कळ कथानकांवर व विशेषतः कृष्णचरित्रावर होनाजींनीं पुष्कळ लावण्या केल्या आहेत. नेहमीं रानावनांत राहून गाई, म्हशी राखाव्या आणि जंगलांतील व डोंगरावरील लोकांशीं बोलावें चालावें, हा ज्याचा व्यवसाय, त्या मनुष्यानें सर्व प्रकारच्या लोकांच्या आदरास पात्र होण्यासारखी कविता रचून आपलें नांव गाजवावें, ही गोष्ट महाराष्ट्रवाङ्मयाच्या इतिहासांत केवळ अपूर्व होय.

आतां, होनाजी बाळांच्या कवितेंतले थोडेसे उत्कृष्ट वेंचे येथें देऊन हा चरित्रलेख पूर्ण करितों. होनाजीच्या ज्या भूपाळीसंबंधानें पूर्वी उल्लेख केला, ती भूपाळी जरी सर्वप्रसिद्ध आहे, तरी ती येथें उतरून घेतल्याशिवाय माझ्यानें राहवत नाहीं.

'घनश्याम सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला ।
उठिं लवकरि वनमाळी उदयाचळीं मित्र आला ॥ ध्रु० ॥

सायंकाळीं एके मेळीं द्विजगण अवघे वृक्षीं ।
अरुणोदय होतांचि उडाले चरावया पक्षीं ॥
अघमर्षणादि करुनि तापसी तपाचरण-दक्षी ।
प्रभातकाळीं उठुनि कापडी तीर्थपंथ लक्षी ॥
करुनि सडा-संमार्जन गोपी कुंभ घेउनि कुक्षी ।
यमुनाजळासी जाति मुकुंदा, दध्योदन भक्षीं ॥
मुक्तता होऊं पाहे कमळिणीपासुनियां भ्रमरा ।
पूर्वदिशे मुख धुतलें, होतसे नाश तिमिरा ॥
उठिं लवकरि गोविंदा सांवळ्या नंदकुमरा ।
मुखप्रक्षालन करीं अंगिकारीं भाकरकाला ॥ उठिं० ॥ १ ॥
घरोघरीं दीप अखंड त्यांच्या सरसावुनि वाती ।
गीत गाति सप्रेमें गोपी सदना येति जाती ॥
प्रवर्तोनि गृहकामीं रंगावळी घालूं पाहती ।
आनंदकंदा प्रभात झाली, उठ सरली राती ॥
काढीं धार क्षीरपात्र घेउनी धेनू हंबरती ।
दारिं उभे गोपाळ तुजला हाक मारुनि बाहती ॥
हे सुमनहार कंठीं घालिं या गुंजमाळा ।
हातीं वेत्रकाष्ठ बरवें कांबळा घेइं काळा ॥
ममात्मजा मधुसूदना हृषिकेशि जगत्पाळा ।
हंबरताति वांसुरें धेनु—स्तन—पान्हा आला ॥ २ ॥
प्रातःस्नानें करुनि गोपिका अलंकार नटती ।
कुंकुमादि चर्चुनी मंथनालागिं आरंभीती ॥
प्रेमभरित अंतरांत वदनीं नामावळि गाती ।
अर्घ्यदान देउनियां द्विजजन देवार्चन करिती ॥
नेमनिष्ठ वैष्णव ते विष्णु—पूजा समर्पिती ।
स्मार्त शिवार्चनसक्त शक्तितें शाक्त आराधिती ॥
ऋषिगण आश्रमवासी जे कां निरंजनीं धाले ।
अरुणोदय होतांचि आपुले ध्यानिं मग्न झाले ॥
पंचपंच उषःकालीं रविचक्र निघों आलें ।
येवढा वेळ निजलासि म्हणुनि हरि समजेल नंदाला ॥ ३ ॥

विद्यार्थी विद्याभ्यासास्तव सादर गुरुपायीं ।
अध्यापन गुरु करिति शिष्यही अध्ययना उदयीं ॥
याज्ञिकजन कुंडांत आहुती टाकितात पाहीं ।
रविप्रभा पडुनियां उजळल्या शुद्ध दिशा दाही ॥
हे माझे सांवळे पाडसे उठिं कृष्णाबाई ।
सिद्ध सर्वें बाळेराम घेउनि गोधनें वना जाईं ॥
मुनिजनमानसहंसा गोपी मनःकमलभृंगा ।
मुरहरपंकजपाणी पद्मनाभ श्रीरंगा ॥
शकटांतक सर्वेशा हे हरि प्रतापतुंगा ।
कोटिरवींहुनि तेज आगळें तुझिया वदनाला ।
**होनाजीबाळा** नित्य ध्यातसे हृदयिं नाममाळा ॥ ४ ॥

ह्या भूपाळीची तारीफ करावी तेवढी थोडीच आहे. तिच्या शब्दरचनेकडे पाहिलें, तर एखाद्या व्युत्पन्न ब्राह्मणकवीनें ती रचल्या सारखी दिसते व ह्यावरून होनाजीबाळांचें भाषाज्ञान, धर्मज्ञान व सूक्ष्मावलोकन हे गुण स्पष्टपणें दृग्गोचर होतात. कवित्वाच्या दृष्टीनें पाहिल्यास मराठी भाषेंतील कोणतीही भूपाळी ह्या भूपाळीची बरोबरी करील असें वाटत नाहीं. प्रभातवर्णनाच्या दृष्टीनें पाहिल्यास मुक्तेश्वरी प्रभातवर्णनाच्या बरोबरीस ही भूपाळी खात्रीनें उतरली पाहिजे. एखाद्या कादंबरीकारास आपल्या कादंबरींत प्रभात कालाच्या देखाव्याचें वर्णन करणें असेल, तर त्यांनीं ह्या भूपाळींतील कांहीं शब्द बदलून तिला गद्यरूप द्यावें म्हणजे झालें; व असा प्रकार मंजुघोषा व विश्वासराव या जुन्या कादंबऱ्यांत केलेला स्पष्ट दिसतो. मुक्तेश्वर, मोरोपंत, वामन आणि रामजोशी यांनींही ही भूपाळी ऐकून आनंदानें माना डोलविल्या असत्या व होनाजीबाळाची प्रशंसा केली असती. ही भूपाळी सगळ्या महाराष्ट्रांत इतकी लोकप्रिय झाली आहे, ह्यावरून खऱ्या कवित्वाची पारख महाराष्ट्रास चांगली आहे, हें सिद्ध होत नाहीं काय? 'हृदयीं नित्य नाममाळा गाणाऱ्या' होनाजीबाळांस प्रेमळ भक्त म्हणावयास काय हरकत आहे?

पुढील लावणी पहा:—

राधे हा मुकुंद कडिये उचलोनि घेई घेई ॥ ध्रु० ॥
करूं देइना हा मज दहीं दुभत्यास कांहीं ।
मथितांचि धरितो दोरी रवी करीं ठायीं ठायीं ।
हट्टी हा कदापि नुमजे समजाविल्यास बाई ।
...र समजाऊनि यासी तुझे गृहीं नेई नेई ॥ राधे० १ ॥
हरीसि आनंदें राधा मृदुमृदु बोलविते ।
माझे घरीं चाल कृष्णा दुधभात कालवितें ।
पाळण्यात घालुन तुजला निजवून हालवितें ।
यशोदेसि सोडीं कान्हा माझे गृहीं येई येई ॥ राधे० २ ॥
गोविंदा गोपाळा कृष्णा मुकुंदा क्षीराब्धिवासा ।
जगज्जीवन व्रजभूषणा गोपीमानस राजहंसा ॥
उगा नको रडूं श्रीरंगा यशोदेसि सोडीं कैसा ।
तुझी धरितें हनुवटी मी ... दूध पेई पेई ॥ राधे० ॥ ३ ॥
मला येथें मोठें राधे छळियलें सांवळ्यानें ।
असाच हा रोज राधे हरी घरीं नेत जाणें ॥
उगा हा निश्चिंत कैसा तुझे समजाविल्यानें ।
**होनाजीबाळा**च्या कवनीं सदां हरी राहीं राहीं ॥ राधे० ॥ ४ ॥

होनाजींच्या शिष्यांपैकीं **'धोंडी सदाशिव'** व **'काशीराम'** यांच्या कांहीं लावण्या आढळतात, त्याही फार सरस आहेत. काशीरामाची पुढील लावणी पहा:—

कोणी घ्या गे मुरली करींची । शुद्ध मी विसरलें घरची ॥ ध्रु० ॥
ऐकुनियां श्रवणीं मुरली । भ्रांति नाहिं मज उरली ॥
नादें चित्तवृत्ति हरली । वाजवी माधव परोपरींची ॥ १ ॥
दुसरि म्हणे श्रीहरि तो । येऊन आह्मांला धरितो ।
नानापरि छळणा करितो । वाईट ही खोड हरीची ॥ २ ॥
तिसरी म्हणे पुरे ही वस्ती । सोसावी किती बदमस्ती ॥
धरी करी हा धिंगामस्ती । फाडिली कंचुकी जरिची ॥ ३ ॥

चौथी म्हणे यशोदाबाई । कृष्णास शिकीव कांहीं ॥
**होनाजीबाळा** गुणग्राही । करि **काशिराम** भक्ति हरीची ॥ ४ ॥

होनाजीबाळांनीं पंढरपुरवर्णनावर एक मोठी लावणी केली आहे, तिचे पहिले दोन चरण येथें देतों:—

'अन्य क्षेत्र द्वारकादि करुनी दक्षिण भीमातिरीं ।
दृष्टि पाहिली पवित्र भूवैकुंठपीठ पंढरी ॥ ध्रु० ॥
समपद कटिं कर ठेउन सांवळा विटेवर अक्षयि उभा ।
निशिदिनिं तिष्ठत भक्तांचा सखा वैकुंठींचा सुभा ॥
मकराकृति कुंडलें सुशोभित श्रवणि फांकती प्रभा ।
इंद्रनीळापरि कांती ज्याची तो रंग चढला नभा ॥
ब्रह्मवेत्ते स्वानंदभरित भाविक संतांची सभा ।
नामस्मरणें करुनि आळविति त्या रुक्मिणिवल्लभा ॥
चाल । मृदु मृदु मृदंगमंजिरे । वाजती विणें सुस्वरें । नाचति प्रेमाच्या भरें ।
सद्गदित अंतरें आलिंगन कवळुन देती करीं ॥ १ ॥
हरिनामाचा गजर पताका वाळवंटिं फडकती ।
ठाइं ठाइं कीर्तनीं संत आपणचि नटला श्रीपती ॥
कोठें ब्रम्हज्ञान कोठें सांगे राजनीती ।
कोठें सांगे प्रपंचव्युत्पत्ती ॥
कोठें सांगे गोकुळांतिल स्वयें बाळपणींच्या स्थिती ।
कोठें सांगे गोपींचे विषय प्रेमयुक्त बहुधा रीतीं ॥
चाल । कोठें उद्धव बोलावुनि । धाडी गोकुळालागुनी । म्हणे ये गोपिकांस बोधुनी ।
श्रोतावक्ता आपण होउनि रंग कीर्तनीं भरी ॥ २ ॥

या लावणीच्या पहिल्याच चरणावरून होनाजीबाळांनीं पुष्कळ तीर्थयात्रा केल्या होत्या, हें स्पष्ट दिसतें. 'पंढरपुरांतील संतांचीं रूपें देवानेंच धारण केलीं' व 'श्रोतावक्ता आपण होउनि रंग कीर्तनीं भरी' हे कवीचे उद्गार, त्याची परमार्थविषयांत बरीच गति होती, हें उघड दाखवीत आहेत. ह्या लावणीचा दुसरा चरण रचीत असतां,

'होऊनियां श्रोता वक्ता । करी आपुली आपण कथा ।' हा रमावल्लभदासांचा अभंग होनाजींच्या मनांत घोळत असावा असें वाटतें. होनाजीबाळांनीं जुन्या मराठी कवींची–विशेषतः मुक्तेश्वरांची–कविता किती लक्ष्यपूर्वक वाचली होती हें त्यांच्या द्रौपदीवस्त्रहरणावरील लावणीवरून सिद्ध होत आहे. ही सबंध लावणी कवीनें मुक्तेश्वरांचा द्रौपदीवस्त्रहरणावरील अध्याय पुढें ठेवून लिहिलेली दिसते; शब्दही बहुतेक मुक्तेश्वरांचेच वापरले आहेत.

पुढील चरण पहाः—

'दुर्योधन जानु उघडि करून दावी ।
द्रौपदी बैस अंकीं दुजी गोष्ट न वदावी ।
मजसंगतियोगें त्वां संपति भोगावी ।'
द्रौपदी म्हणे 'नष्टा बसेल दुष्टा तुजअंकीं गदा नवरी ।
रक्त तोचि हरिद्रा लावून निद्रा कर रणमंचकसमरीं'

आतां ह्याच प्रसंगींच्या मुक्तेश्वरी ओंव्या पहाः—

'पापशब्द पडतां कानीं । हृदयीं धडकला क्रोधाग्नी ।
म्हणे ' दुरात्मिया ही वाणी । जळो तुझी पापिष्ठा ॥ १ ॥
भीमाकरीं जे केळवली । गदा नोवरी सुगुणाथिली ।
वाङ्निश्चयें तुज नेमिली । गोत्रघटित निर्धारें ॥ २ ॥
रक्तहरिद्रा तनुलेपनीं । माथां अक्षता पायपिटणी ।
स्त्रियाप्रलाप वाद्यध्वनी । सुखसोहळा भोगिसी ॥ ३ ॥
ते गदा घेऊनि मांडीवरी । रणमंचकीं निद्रा करीं ।'

मुक्तेश्वरांचें हें रूपक फारच चांगलें आहे; त्यांतील कांहीं कल्पना व शब्द होनाजीबाळांनीं जशाचे तसे घेतले आहेत. मुक्तेश्वरांनंतर होऊन गेलेल्या पुष्कळ मराठी कवींनीं मुक्तेश्वरी काव्यरचनेचें अनुकरण करण्याचा प्रयत्न केलेला आढळतो, असें जें विधान मी केलें आहे, त्यास ह्या उदाहरणामुळें बळकटीच येत आहे.

होनाजीबाळांनीं महाराष्ट्रांतील साधुसंतांच्या नामावळीवर एक मोठी लावणी रचली आहे, तींत महिपतींनीं वर्णिलेल्या बहुतेक संतांचीं नांवें दिलीं आहेत. या लावणींत महिपतींचाही उल्लेख असून, नानासाहेब पेशव्यांचे गुरु त्रिपुटीकर गोपाळनाथ होते असें म्हटलें आहे. ' त्रिपुटीकर गोपाळनाथ नानासाहेब गुरु ' या पदाचा दुसरा अर्थ होत असेल तर तो घ्यावा. कदाचित् ' नानासाहेब गुरु ' या नांवाचे कोणी सत्पुरुष होऊन गेले असतील तर कोण जाणे. होनाजींस हिंदी व गुजराथी या भाषांचेंही ज्ञान होतें म्हणून पूर्वीं सांगितलेंच आहे व ह्या भाषांत त्यांच्या कांहीं लावण्याही आहेत.

## श्रीकृष्णावर लावणी.

मुकुंद यमुने थडी थडी । खेळतसे मिळवून गडी ॥ ध्रु० ॥
विटीदांडु आणि चेंडु लगोऱ्या लपंडावि कावडी ।
साखरपाव्या भोंवरें चक्रें गोट्याच्या परवडी ॥ १ ॥
हुतुतु हमामा हुंबर घालुन मुलें वदति बोबडीं ।
पहावया तें सौख्य मला हें गोविंदाची आवडी ॥ २ ॥
चला सर्व यमुनेजळिं जाऊं पाहुं मूर्त फांकडी ।
वनमाळा आपाद जयाच्या स्कंधिं काळि घोंगडी ॥
स्वप्न जागृतिंत मूर्ति, कदापी मज न दिसे नावडी ।
स्मरण हरीचें होनाजिबाळा म्हणे हें अमृत घाडि घडी ॥ ४ ॥

## विठ्ठलवर्णन.

समचरण विटेवरी कटीकर हरि तव मुद्रा । भक्तिसुधे क्षीरसमुद्रा ॥ ध्रु० ॥
हे पंढरिच्या पावना अनाथ दीनाच्या । तारका तूं संतजनाच्या ॥
अरे ! भक्तवत्सला गुणावर गुणाच्या । हृद्गता उमारमणाच्या ॥
भाविक भक्तांप्रति संकटीं विकळ मनाच्या । जाणतया क्षणाच्या ॥
कां आली न कळे मजविषयीं प्रभु तुज निद्रा ॥ १ ॥

शामसुंदरा इंदिरावरा हे मुकुंदा । अति प्रियकर सज्जनवृंदा ॥
आनंदघना नंदनंदना हे गोविंदा । विकलों तव नामछंदा ॥
ममभन मिलिंद लक्षित तवपदारविंदा । श्रीहरि जगदंकुरकंदा ॥
करिं कृपा जाणसी प्राणिमात्र हरि हरिद्रा ॥ २ ॥
मधुकैटभारि मधुसूदन मुरसंहारा । मनमोहन धीर उदारा ॥
गोविंदा गोकुळवासा गोपकुमारा । गोपी कुचधारि विहारा ॥
पद्मनाभा पंकजनेत्रा दधि पयहरा । पदिं परात्मया दे थारा ॥
मुक्तिदायका मुनिमानसचकोरचंद्रा ॥ ३ ॥
शरणागतासि तारीं तारीं पंढरिराया । येईं येईं सनाथ कराया ॥
रुक्मिणीप्राणवल्लभा लागतों पाया । या, निशिदिनिं तवगुण गाया ॥
बुडतों भवसागरिं पैलपार उतराया । करिं अतां कृपेची छाया ॥
**होनाजीबाळा** म्हणे इंद्राच्या इंद्रा ! ॥ ४ ॥

होनाजींची सुलोचनाख्यानावरील लावणी फारच बहारीची आहे, परंतु विस्तारभयास्तव ती येथें उतरून घेतां येत नाहीं.

एक पतिव्रता स्त्री आपल्या पतीस म्हणते:——

‘ गुणिजन गुणमंडिता पंडिता अहो सद्गुणराशी ।
सर्वोपरि प्रत्यक्ष लक्ष्य तुमचे पायांपाशीं ॥ ध्रु० ॥
सेवार्चनीं ध्यानस्थ अस्तमानापासुन पाहीं ।
अरुणोदय पर्यंत ध्यान मजला दुसरें नाहीं ॥
चारि प्रहर बत्तिस घटिका तरि या प्रपंचठायीं ।
शरीर मात्र वर्ततें परी मन निमग्न तवपायीं ॥
स्नेहवियोग हा रोग करीतसे या देहालाही ।
चैन पडुं नये कोठें वाटति ओस दिशा दाही ॥
चाल । ममप्रियकर प्रियपात्रा ! मी कुडी तुम्हि आत्माराम ।
मंगळसूत्र गळींचें तुह्मी माझें मंगळधाम ।
मी तों तीर्थयात्रा तुम्हीं केवळ पुण्यग्राम ।
मन पावत विश्राम अशा तुमच्या प्रीतिसरशीं ॥ १ ॥

धन्य धन्य सौभाग्य शुद्ध कुंकुम विशाळ निढळीं ।
कंठीं मंगळसूत्र धन्य मी जगीं भाग्य आगळी ।
अलंकार भूषणें वस्त्रप्रावर्णयुक्त सगळीं ।
काय न्यून मज स्वामी पुण्यें तुमच्या पदरीं सकळी ।
अनुकूल पदार्थ मात्र असतां लक्ष्य तुम्हाजवळी ।
निष्ठा अंतिं प्रतिष्ठा हें जिव जाणे हृत्कमळीं ॥
चाल । तुम्हि केलें पवित्र मला म्हणवुन पदरीं पडलें ।
फळलें तप पूर्वींचें तवअर्धांगीं जडलें ॥
अनायासें रत्न मला अंधारीं सांपडलें ।
भागीरथींत घडलें स्नान मग कारण काय इतर जलाशीं ॥ २ ॥

प्रयत्नेंविण अनायासें लाधलें निजसुख प्राप्तीचें ।
मग कासया करावें साधन क्षुद्र दैवतांचें ।
सुधा प्राशिल्यावर काय पळावें भयें जीवित्वाचे ? ।
संजीवनी साधल्या यत्न काय अनेक मंत्राचे ? ।
घरीं आलिया आदित्य मग कारण काय दीपाचें ? ।
एक सद्भावावरुन जोडिले पाय असे तुमचे ॥
चाल । तुम्हि स्वामिराज मी तंव तुमची जाया ।
तुम्हि कल्पवृक्ष मी तळिंची अतिशीतळ छाया ।
तवपदावरुन आपली कुरवंडि करिन काया ।
अक्षयि तुमच्या ठाया पावुन झालें सुखवासी ॥ ३ ॥

पूर्वसंबंधावरुन मातृपितृ उदरासी आलें ।
नंतर कायावाचामनें वनिता तुमची झालें ।
भाग्योदय सौख्यांत अष्ट अंगीं मी निवालें ।
विरक्त मात्र स्वतः सिद्ध नाभिकमळापासून धालें ।
साध्यसाधनीं देहगेह समुळीं अवघेंच विरालें ।
ब्रह्मानंद डोहांत एक सद्भावें मी बुडालें ॥
चाल । यांतील सारांश असा मुळीं एक शुद्ध सद्भाव ।
तरि प्राप्तीचा अनायासें स्वामी पदकमळीं ठाव ।

**सत्वार्थीं असावी हो सन्मार्गी मनाची धांव ।**
तरीच जडदेह नाव पार होइल पैल तिरासी ।
**होनाजीबाळा** म्हणे मी ... पवित्र पवित्रासी ॥ ४ ॥

सनातनधर्मीय पतिव्रता स्त्रीचा आनंद या पद्यांत वर्णिला आहे. होनाजीबाळांच्या शृंगारिक लावण्यांतही अनीतिमत्तेस कोठेंही उत्तेजन दिलेलें नाहीं.

---

# नागेश महादेव मटंगे.

हा कवि फारसा प्रसिद्ध नाहीं, तरी त्याची कांहीं थोडीशी कविता प्रसिद्ध आहे. मोरोपंतांनीं मराठी भाषेंत जी आर्यावृत्तात्मक कविता केली, ती फार लोकमान्य झालेली पाहून पंतांचें अनुकरण करण्याचा तदनंतरच्या पुष्कळ कवींनीं प्रयत्न केलेला दिसतो. केरीकर विठ्ठल, चिंतामणी, परशुराम ढवळे, दाजीबा जोशीराव, चिंतामणी जोशीराव, नागेश मटंगे, जनार्दन, कृष्णानंदनिमग्न, नरहरी, धुंडिराज, महेश्वर इत्यादि कवींनीं मोरोपंती काव्यरचनेचें अनुकरण करण्याचा प्रयत्न केला असून, त्यांपैकीं ज्यांचा प्रयत्न बऱ्याच अंशांनीं सिद्धिस गेला आहे, अशांपैकीं नागेश महादेव हे हे एक होत. ह्यांचा जन्म पंतांच्या मृत्यूनंतर सात वर्षांनीं, म्हणजे शके १७२३ त सातारा येथें झाला. ह्यांनीं आपल्या अल्प वयांत बुद्धिवैभवानें उत्तम विद्या संपादन केली. ह्यांची वंशपरंपरेची वृत्ति कीर्तनाची होती व ह्यांच्या विद्वत्तेमुळें यांचें कीर्तन आबालवृद्धांस अतिशय प्रिय असे. नागेश महादेव यांनीं पुराणादि ग्रंथांच्या आधारानें पुष्कळ मराठी आख्यानें रचिलीं आहेत व जेथें जेथें कारण पडलें तेथें तेथें आख्यानाच्या जमावाकरितां अभंग, साक्या, पदें,

गीती वगैरे वृत्तांत फार सुरस कविता करून उत्तम प्रकारचीं कीर्तनो-पयोगी आख्यानें तयार करून ठेवलीं आहेत. प्रस्तुत कवीचें 'नंदिकेश्वरजननाख्यान' नामक एक सुंदर काव्य काव्यसंग्रहांत प्रसिद्ध झालें आहे. नंदिकेश्वराख्यानावर मराठींत चांगली कविता नव्हती, म्हणून कवीनें त्या आख्यानावर आर्या केल्या आणि त्या तयार झाल्यानंतर एके दिवशीं, पुणें येथें कीर्तनास जमलेल्या मोठमोठ्या विद्वानांसमोर म्हणून दाखविल्या. तेव्हां कवीची उत्कृष्ट कवित्वशक्ति पाहून पुण्यपत्तनस्थ विद्वज्जनांनीं त्यास मोठा मान दिला. कवीची प्रकृति अशक्त होती, म्हणून, पहिलें कुटुंब त्याच्या अल्पवयांतच निवर्तलें असतांही, त्यानें दुसरें लग्न केलें नाहीं. कवीचें बहुतेक सगळें आयुष्य वेदांताभ्यासांत गेलें, व त्यामुळें त्याचें वैराग्यही वाढलें. शेवटीं कवि नरसोबाच्या वाडीस जाऊन राहिले आणि आपल्या वयाच्या ३२ व्या वर्षी, शके १७५५ सालीं, चतुर्थाश्रम घेऊन समाधिस्थ झाले. ह्या कवीचे वंशज साताऱ्याचे बाजूस अद्याप आहेत, त्यांच्या संग्रहीं कवीचा सगळा काव्यसंग्रह असून, तो त्यांनीं प्रसिद्ध केल्यास बरें होईल.

नंदिकेश्वरजननाख्यानाचे अध्याय ४ व आर्या १८९ आहेत. मराठी भाषेंत जीं फार सरस अशीं कांहीं काव्यें आहेत, त्यांपैकीं हें एक काव्य होय. काव्याची भाषा प्रायः शुद्ध असून, उपमा, अलंकार, दृष्टांत इत्यादि काव्यालंकार व प्रास, अनुप्रास, यमक इत्यादि शब्दालंकार त्यांत पुष्कळ आहेत. काव्यांत संस्कृत शब्दांचा भरणा फार आहे; कांहीं आर्या व आर्यार्धे केवळ संस्कृत आहेत. पहिल्याच आर्येवरून कवीच्या गुरूचें नांव 'परशुराम' असें होतें, असें समजतें.

'शिखि' नामक रुद्राक्षभस्मधारी एक मुनि होते, ते एके दिवशीं इंद्रसभेस गेले असतां, इंद्रानें त्यांचा सन्मान केला नाहीं, तेव्हां:—

## आर्या.

' अवमान तो न साहुनि कोपें पेटे मुनी जसा वणवा ।
मग तत्काल करी तो इंद्राच्या परिभवा असा पण बा ॥ १ ॥
' करिन दुजा इंद्र, पदच्युत या इंद्रासि हेंचि मागेन ।
विधितें तप करिन असें देइल विधि सारुनीच मागें न ' ॥ २ ॥
करुनि असा निश्चय मग दारुण तप तो महातपा तपला ।
जें ब्रह्मचर्य त्यातें साहुनि वर्षाहिमातपा जपला ॥ ३ ॥
केलें सहस्र वर्षे अनशन पंचाग्निताप साहून ।
शक्र म्हणे ' हा झाला तेजस्वी सर्व तापसांहून ' ॥ ४ ॥
झाला गोचर भगवान् परमेष्ठी जो दयानदीन मनें ।
सुख वरिलें मुनिच्या मग केलीं साष्टांग तत्पदीं नमनें ॥ ५ ॥
आत्मभव म्हणे ' तुझिया पाहूनि तपाचिया सुनेमातें ।
झालों प्रसन्न मागें जो चित्ताभीष्ट वर मुने मातें ' ॥ ६ ॥
' करुनि पदच्युत इंद्रा, व्हावा आपणचि इंद्र वरदाला ।
ऐसा द्या पुत्र मला, ' मागे मुनि नमुनि हेंचि वरदा त्या ॥ ७ ॥
प्रथम ' तथास्तु ' मग म्हणे, ' म्यां ईश्वरनियम केवि टाळावा ? ।
परि तव तप विफळ न हो, न कृतघ्नत्वेंहि हा विटाळावा ॥ ८ ॥
त्वत्पुत्र इंद्र नचि, परि होईल गवेंद्रवर महातेजा ।
हा तेजा रविच्या न्ही देतो म्हणतिल असें पहाते जा ॥ ९ ॥
तो विष्णुजिष्णुभवपरिभव करिल तुझ्या मनासि सुखवील ।
सुकवील अरिमुखें रणरंगीं, परि साधुमन न दुखवील ' ॥ १० ॥
वरुणानिलानलाचे विधिनें अर्धार्ध अंश घेऊन ।
तत्तन्मंत्रें मंत्री शिखा शिखिशिरीं स्वहस्त ठेवून ॥ ११ ॥
झाडी शिखा शिखी तों दिव्यतनयरत्न भूमिला पडलें ।
आनंदविलें मुनितें, जेंवि दरिद्रा निधान सांपडलें ॥ १२ ॥
वृषरूपें श्रितसुरतरु वरुणाग्नि श्वसनदेव अवतरले ।
सुखवाया शिखिहृदया, यद्यशगानेंचि सुजन भव तरले ॥ १३ ॥
अरुणनलिननयनानन निर्जित शुभ्रांशुमंडल स्वच्छ ।
पीतांबरावृतशिरा जो अतसीकुसुमगुच्छसम पुच्छ ॥ १४ ॥

पुढें तो नंदिकेश्वर पित्याच्या आज्ञेवरून अमृतपानासाठीं क्षीर-समुद्राच्या तीरीं गेला असतां, विष्णुदूतांनीं त्याचा प्रतीकार केला. तेव्हां त्यानें आपल्या शृंगांनीं त्यांस कसें पिटाळून लाविलें, तें खालील आर्यांत सांगितलें आहे:—

क्षीरोदन्वत्क्षीरा दे वत्स पिउनि यथेष्ट ढेंकर तें ।
ऐकियलें हरिदूतसमूहें दुग्धाब्धिरक्षणैकरतें ॥ १ ॥
' घ्या घ्या हाणा ' म्हणवुनि धांवति ते विष्णुदूत शतकोटी ।
केंवि पराविभजे तो, अद्रिकुळें हस्तविधृत शतकोटी ? ॥ २ ॥
ते बहु शस्त्रें वर्षति, परि मुनिसुत अचल तो धृति न सांडी ॥
शृंगें पादाघातें जर्जर करि त्यांसि देउनि मुसांडी ॥ ३ ॥
वृष सिंहसाचि मागें लागे ते हरिणसे अहो पळती ।
वळती तिळहि न मागें आजि अजितचमूहि होय हो पळती ॥ ४ ॥
केलें विघ्न बहु तिहीं वृषभवरें तदपि टाळिलें; एणें ।
केंवि हरिस जिंकावें ? ते हरिपार्षद पिटाळिले एणें ॥ ५ ॥
ते वदति पुन्हा ' वत्सा करुनि अशा साहसास मरशील ।
हें स्थान विष्णुचें तो मधुकैटभजित् महासमरशील ' ॥ ६ ॥
हें ऐकुनि दूतातें शृंगें उडवुनि बळांकर विहाय ।
दावुनि दूर झुगारुन म्हणवी उरल्या बळांकरवि ' हाय ' ॥ ७ ॥
धडधड पडती येउनि एकामागोनि एक हरिभवनीं ।
ते विष्णुदूत मूर्च्छित, वात्याहत जेंवि तुच्छ शलभ वनीं ॥ ८ ॥
ते कथिती ' एक वृषभ क्षीरनिधिक्षीर पी न भी मन गा ।
त्याचें किमपिहि दारिल तो शृंगाग्रेंचि पीन भीमनगा ॥ ९ ॥
ते हांकिलेचि वेगें गेले हांकावयासि जे त्यानें ।
शृंगें फेंकुनि येथें पोंचविलें रत्नसानुजेत्यानें ॥ १० ॥
आम्हां त्याचीं शृंगें जालीं शुष्कां दलांसि वात्यासीं ।
न दिसे ऐसा तो रण करिल करुनि धृतिबळासि जो त्यासी ॥ ११ ॥

पुढें तो नंदिकेश्वर इंद्राच्या नंदनवनांत गेला असतां, तेथें जो प्रकार घडला तो फारच मनोरंजक आहे:—

'कल्पतरूद्यानाची तो शृंगें प्रथम पोळवी पाळी ।
कल्पलतातति तोडी रदनें शृंगेंहि कल्पतरु मोडी ॥ १ ॥
कल्पतरुकल्पवीरुत्फलप्रवाल प्रकाम तो भक्षी ।
उपवनरक्षक मालाकारनिकर दूरुनी तया लक्षी ॥ २ ॥
ते अन्योन्य वदति ' सुरवनांत ओढाळ बैल शिरला हो ।
धांवा हाणा मारा याचें शतचूर्णतेसि शिर लाहो.' ॥ ३ ॥
ते वृषभें किति शृंगें पादाघातें क्षणांत लोळविले ।
किति निःश्वासें सुरपतिनिकट कथायासि वृत्त बोळविले ॥ ४ ॥
' नंदनवनांत शिरला शृंगें प्राकारभित्ति उडवून ।
भक्षुनि सुरवल्ली करि चूर्ण पदें कल्पवृक्ष तुडवून ॥ ५ ॥
वृंदारक हो चुरिले मत्तवृषें कल्पवल्लि मंदार ।
धावा बैल वधावा पढवा तत्पालका सुमंदार ॥ ६ ॥
होतां पुरंदराज्ञा मरुद्गणादित्यसाध्यवसुसिद्ध ।
गंधर्व यक्ष राक्षस जाले युद्धार्थ सर्वहि सुसिद्ध ॥ ७ ॥
सहदानवारिशारदनीरदसमकरिवरावरि रिघोनी ।
सहदानवारि वारिदवाहन गेला वृषावरि निघोनी ॥ ८ ॥

एकंदरींत हें सगळेंच काव्य फार हृदयंगम आहे. हें काव्य पहाण्यास मोरोपंत हयात असते, तर आपल्या काव्यरचनेचें इतकें बेमालून अनुकरण केलेलें पाहून त्यांनींही मान डोलविली असती. वाचकांनीं हें काव्य* अवश्य वाचावें अशी शिफारस करून हा संक्षिप्त लेख येथें पूर्ण करितों.

---

* काव्यसंग्रह, लघुकाव्यमाला, भाग चौथा.

# नगाजी महाराज.

मध्यप्रांतांत वरोरा या गांवापासून सुमारें आठ नऊ कोसांवर पारडी या नांवाचें एक खेडें आहे. ह्या खेड्याच्या भोंवतीं एक नदी व ओढा यांचा वेढा पडला आहे. ह्या ठिकाणीं सुमारें १०० वर्षांपूर्वी नगाजीमहाराज या नांवाचे एक प्रसिद्ध साधु होऊन गेले. या साधूंच्या कन्येचे वंशज हल्लीं पारडी येथें, नगाजीमहाराजांनीं बांधलेल्या श्रीगोपालकृष्णाच्या मंदिरांत राहतात; पण त्यांस महाराजांसंबंधानें म्हणण्यासारखी माहिती नाहीं. नगाजींनीं आपल्या आई-बापांची सेवा सतत बारा वर्षें एकनिष्ठपणें केली व तेवढ्यानेंच ते उद्धार पावले. बाळपणापासूनच महाराजांचा कल ईश्वरभजनाकडे होता. नगाजींच्या पत्नीचें नांव येनाबाई. नगाजींस चित्रकलेचा नाद होता; ते एकदां शेगांवास गणपतिउत्सवांत ताटी बांधण्यास गेले होते, त्यावेळीं पुढील चमत्कार घडला. ते घोड्यावर बसून शेगांवाहून पारडीकडे येत असतां, रस्त्यावर जंगलांत एक ९० वर्षांचा म्हातारा ब्राह्मण त्यांजसमोर येऊन उभा राहिला; व त्यानें महाराजांचें नांव गांव वगैरे माहिती विचारून घेतली. नंतर तो ब्राह्मण नगाजींस म्हणाला, ‘ पोटास परमेश्वर घरींच देतो, मग परगांवीं जाण्याचें कारण काय ? घरीं आई-बापांची अंतःकरणपूर्वक सेवा करीत जा व पारडीच्या सीमेच्या बाहेर आजपासून पाऊल टाकूं नकोस. ’ इतकें बोलून ब्राह्मण गुप्त झाला ! महाराजांनीं त्याचा पुष्कळ शोध केला, पण पत्ता लागला नाहीं. घरीं आल्यावर नगाजींनीं आपल्या पांचही बंधूंस सांगितलें कीं, आजपासून मी वेगळा राहणार. बंधूंनीं कारण विचारलें, तेव्हां ते म्हणाले ‘ आजपासून घरांतून बाहेर न पडतां, आईबापांची अह-

निश सेवा करण्याचा मीं निश्चय केला आहे. हा माझा निश्चय तुम्हांस पुढेंमागें त्रासदायक होईल, यासाठीं आतांच वेगळें व्हावें हें बरें!' नंतर बंधु म्हणाले कीं, 'तुम्हांस वेगळें राहण्याचें कांहीं एक कारण नाहीं. तुम्हीं घरांत राहून आपल्या मनास वाटेल तसें वर्तन करावें. आमच्यापासून तुम्हांस काडीमात्र उपसर्ग पोहोंचणार नाहीं.' नगाजींनीं ही गोष्ट पसंत केली व त्या दिवसापासून पुढें बारा वर्षें सतत आपल्या आई-बापांची सेवा त्यांनीं एकनिष्ठपणें केली. प्रपंचासंबंधाचीं सगळीं कामें त्यांनीं सोडून दिलीं होतीं, तथापि एक क्रम मात्र चालू ठेवला होता. पारडी येथें रामाजी पाटील बारहाते या नांवाचे एक गृहस्थ राहत असत, त्यांची दर बुधवारीं हजामत करण्याचा नगाजींचा नियम होता. एका बुधवारीं असा प्रकार झाला कीं आई-बापांच्या सान्निध्यांत असल्यामुळें, त्या दिवशीं रामजी पाटलांच्या हजामतीस जाण्याचें स्मरण नगाजींस झालें नाहीं. पण, इकडे नित्याप्रमाणें, ठरलेल्या वेळीं, रामजींची हजामत नगाजींनींच केली होती; पण तो प्रकार त्यांचा त्यांनाच ठाऊक नव्हता. शेवटीं, पाटलांकडून नगाजींस जेवणाचें आमंत्रण आलें, त्यावेळीं, आज आपण हजामतीस गेलों नाहीं, ही गोष्ट त्यांच्या लक्ष्यांत आली. लागलीच धोकटी घेऊन ते पाटलांच्या घरीं गेले; पाहतात तों पाटलांची हजामत झालेली. भगवंतानें नगाजींच्या रूपानें पाटलांची हजामत केली होती. हजामतीच्या वेळीं देवानें पाटलाच्या हातीं जो आरसा दिला होता, त्यांत भगवंताचें श्यामसुंदर चतुर्भुज स्वरूप पाहून पाटील अगदीं वेडावल्यासारखे झाले होते. नगाजींस पाहतांच, त्यांनीं पहिल्यानें त्यांजकडून आरसा मागून घेतला व त्यांत ते पाहूं लागले. पण त्यांच्याच प्रतिबिंबाशिवाय त्यांत दुसरें काय दिसणार? पाटलास शंका आली कीं, हा कांहीं

सकाळचा आरसा नव्हे. मग ते नगाजींपाशीं ‘ सकाळचा आरसा ’ मागूं लागले. ही विलक्षण मागणी ऐकून नगाजी मोठ्या बुचकळ्यांत पडले. ते म्हणाले ‘ तुम्हीं सकाळचा आरसा म्हणतां तो कोणता ? आज सकाळीं मी तुमच्या घरीं मुळींच आलों नाहीं ! ’ हें भाषण ऐकून पाटलांस व इतर मंडळीस मोठें आश्चर्य वाटलें. कारण प्रत्यक्ष नगाजीच सकाळीं हजामत करून गेले, हें सर्वांनीं पाहिलें होतें. क्षणभर सगळी मंडळी विचारमग्न झाल्यासारखी दिसली. खरा प्रकार काय आहे, हें तत्काळ नगाजींच्या लक्ष्यांत आलें. आपल्यासाठीं भगवंतास तसदी घ्यावी लागली, याबद्दल त्यांस अतिशय वाईट वाटलें. त्यांनीं प्रेमळ अंतःकरणानें देवाची स्तुति केली. पाटलानींही नगाजींचे पाय धरून विनंति केली कीं, ‘ मला उपदेश द्यावा. ’ नगाजी म्हणाले ‘ मी यःकश्चित न्हावी; उपदेश वगैरे मला कांहीं समजत नाहीं. ’ पण पुढें पाटलांनीं अतिशय आग्रह केल्यामुळें महाराजांनीं त्यांस उपदेश दिला व सन्मार्गास लाविलें.

पारडी येथें श्रीगोपालकृष्णमूर्तीची स्थापना नगाजी महाराजांनीं केली. त्यासंबंधानें एक आख्यायिका प्रसिद्ध आहे, ती येणेंप्रमाणें:— वरोऱ्यापासून सहा कोसांवर वणी नामक नांव आहे, तेथें ‘ कृष्णा ’ या नांवाचा घडशी राहात असे. त्यास ‘ गोपालकृष्णाची मूर्ति घडवून ती पारडी येथें नगाजी महाराजांस नेऊन दे. ’ असा स्वप्नांत दृष्टांत झाला. ह्या स्वप्नांतल्या गोष्टींत कांहीं अर्थ नाहीं, अशा समजुतीनें कृष्णानें तिकडे दुर्लक्ष्य केलें. पुढें महिनाभर प्रत्येक रात्रीं त्यास तें स्वप्न पडण्याचा क्रम चालू होता, व तिकडे दुर्लक्ष्य करण्याचा त्याचाही क्रम चालू होता. पुढें त्यास चौथरा ताप येऊं लागला. पुष्कळ उपाय केले तरी ताप कमी होईना. मग त्याला सहजच शंका आली कीं, आपणास मागें स्वप्न पडत होतें

त्याप्रमाणें आपण वागलों नाहीं, म्हणून तर हा ताप आपल्यामागें लागला नसेलना? ही शंका उत्पन्न होतांच, नगाजी महाराजांस भेटण्यासाठीं तो पारडीस जाण्यास निघाला. पारडी येथें महाराजांस भेटून घडलेला इत्थंभूत वृत्तांत त्यानें त्यांस निवेदन केला. महाराज म्हणाले 'तुला देण्यास मजपाशीं पैसा मुळींच नाहीं; फक्त एक पैसा आहे तेवढा पाहिजे तर देतों.' कृष्णानें तो पैसा घेतला व आपल्या गांवीं येऊन मूर्ति घडविण्यास प्रारंभ केला. त्याच दिवसापासून, औषधाशिवाय त्याचा ताप गेला. असें सांगतात कीं, मूर्ति कशी घडवावयाची, नाक कसें असावें, डोळे कसे असावेत, बोटें कशीं असावींत, कोणचा भाग किती उंच व कोणता किती सखल असावा वगैरे सर्व माहिती स्वतः गोपालकृष्णानें त्या मूर्तिकारास देऊन, आपल्या मनाप्रमाणें मूर्ति त्याजकडून तयार करविली. ही मूर्ति इतकी सफाईदार व मनोहर आहे कीं, ती पाहतांच 'घडविणाऱ्याच्या कौशल्याची कमाल आहे' असे उद्गार प्रेक्षकांच्या तोंडांतून बाहेर पडल्याशिवाय राहात नाहींत.

अशा रीतीनें, गोपालकृष्णाची स्थापना पारडी येथें झाल्यापासून, जन्माष्टमीचा कडाक्याचा उत्सवही तेथें सुरू झाला; त्यावेळेपासून आज सुमारें १०० वर्षें हा उत्सव सारखा थाटानें चालू आहे. भर पावसाळ्यांत हजारों मनुष्यें उत्सवाप्रीत्यर्थ पारडीस जात असतात; शेंकडों भजनी मेळे आपल्या भक्तिपूर्ण नामसंकीर्तनानें सगळा पारडी गांव गर्जून टाकतात व जिकडे तिकडे आनंदी आनंद दिसून येतो; हें सगळें त्या थोर सत्पुरुषाच्या पुण्यसंचयाचें अत्यंत स्वादिष्ट फल होय. ह्या उत्सवाच्या वेळीं, अद्यापहि एक चमत्कार होत असतो, तो पाहण्यासारखा आहे. देवळाच्या सभामंडपांत जेव्हां लोकांची एकच गर्दी उसळून जाते व भजनाचा एकच कल्लोळ होतो तेव्हां, श्रीगोपालकृष्ण मूर्तीच्या अंगावर घर्म-

बिंदु येऊन ते मोत्यांसारखे चमकत असलेले दिसतात; ह्याची साक्ष आज हजारों लोक देत आहेत. ' पूर्वी होऊन गेलेल्या संतांच्या चमत्कारांवर ज्या अश्रद्ध लोकांचा विश्वास बसत नाहीं, त्यांनीं हा चमत्कार* जरूर पहावा म्हणजे त्यांचे डोळे खात्रीनें उघडतील. '

नगाजी महाराज एकदां चांदा येथें असतां, तेथें कांहीं पंडितांची एक सभा भरली होती. सभेंत ज्या विषयाची चर्चा चालली होती, त्याचें यथार्थ ज्ञान करून देण्यास एकही पंडित समर्थ झाला नाहीं. तेव्हां कोणी असें सांगितलें कीं, पारडीच्या नगाजी न्हाव्यास बोलवा, म्हणजे तो तुमचें समाधान करील. त्याप्रमाणें नगाजी महाराजांस बोलावून आणलें, तेव्हां ते ह्मणाले " मी यःकश्चित् न्हावी, मला काय येतें? **लोकांस आरसा दाखवावा व डोळ्याचा मळ काढावा इतकेंच माझें काम!** " वाचकहो, ह्या शब्दांत किती खोल अर्थ भरला आहे!

नगाजी महाराज आपल्या वयाच्या ९० व्या वर्षी समाधिस्थ झाले. ह्या महापुरुषानें आपल्या मातृपितृपरायणतेनें भगवंतास आपलासा करून पारडी गांवासभोंवतालच्या १०० कोसांतील लोकांस परमार्थास लाविलें व हाच त्याचा अवतारहेतु होय. नगाजी महाराजांनीं कांहीं अभंग रचिले आहेत, ते त्या प्रांतांतील लोकांच्या तोंडीं आहेत. महाराजांच्या प्रासादिक वाणीसंबंधानें अभिप्राय व्यक्त करण्याचा आह्मांस अधिकार नाहीं. महाराजांनीं एकंदर कविता किती केली व ती कोठें आहे, यासंबंधानें कांहींच माहिती मिळत नाहीं. महाराज व त्यांची पत्नी यांच्या समाधी श्रीगोपालकृष्णाच्या देवळा-

---

* प्रस्तुत कवीची माहिती, वरोरा येथील सद्गृहस्थ रा. रा. श्रीहरि देवराव देशपांडे यांनीं दिली. त्यांचे हे उद्गार आहेत. सदर चमत्कार त्यांनीं प्रत्यक्ष पाहिला आहे.

जवळच आहेत. देवळाचा सभामंडप हल्लीं नवीन केला आहे. महाराजांच्या वेळीं, उत्सवास एके दिवशीं पुष्कळच लोक आले होते; कोठींतली शिधासामग्री लवकरच संपून गेली. बाहेरगांवांहून सामग्री आणवावी, तर पुरानें गांवाभोंवतालच्या नद्या तुडुंब भरून वाहात होत्या. शेवटीं महाराजांनीं देवळांत जाऊन रात्रभर भजन सुरू ठेविलें. सकाळीं मंडळी कोठीचें दार उघडून पाहतात तों कोठी सर्व प्रकारच्या सामानानें भरून गेली आहे, असें त्यांच्या दृष्टीस पडलें. कोणत्याही प्रकारची न्यूनता राहिली नाहीं.

महाराजांचें शिष्यमंडळ मोठें आहे, त्यांपैकीं श्रीआबाजी* महाराज सोनगांवकर, हे त्यांचे पट्टशिष्य होत. ह्यांजवर महाराजांची पूर्ण कृपा होती. आबाजीमहाराजांनीं पुष्कळ चमत्कार केले. ते व नगाजीमहाराजांवर त्यांनीं केलेली कविता हीं त्यांच्या चरित्रांत विस्तारानें दिलीं आहेत; तीं जिज्ञासूंनीं तेथें पहावीं. आबाजीमहाराज मोठे गुरुभक्त व अधिकारी पुरुष होते.

'मुरहरसुत' नामक एक ब्राह्मण नगाजीमहाराजांचा शिष्य होता; त्याचीं कांहीं पदें आढळतात. त्यांत त्यानें नगाजींचाही उल्लेख सर्वत्र केला आहे.

## नगाजीकृत अभंग.

क्षर हेचि काया अक्षर तें ब्रह्म । शोधीं याचें वर्म गुरुमुखें ॥ १ ॥
क्षमा दया शांती निवृत्तीचें अंग । विवेक स्वयंभ वसे जेथें ॥ २ ॥
अनुभव टेंकण सुखाचें हें अंग । बोध तो स्वयंभ प्रकाशिला ॥ ३ ॥
**नगा** म्हणे ज्यासी गुरुकृपा घडे । ब्रह्म डोळां उघडें नित्य ज्याला ॥४॥

२

**नगा** म्हणे आम्हीं जातीचे नापिक । शेत केलें देख पिकावया ॥ १ ॥
भक्ति **वरवरानें** पेरिलयें रान । द्वैत अरण्य तोडियलें ॥ २ ॥

---

* ह्यांचें विस्तृत चरित्र प्रसिद्ध झालें आहे, तें वाचकांनी अवश्य वाचावें.

अमर अवकाश वर्षील बादल । सत्रावींत जळ ओलविलें ॥ ३ ॥
त्रिकुट **तिफन** गोल्हाट **कोथळे** । परात्पर जोडे **कर्णनळया** ॥ ४ ॥
वाची या दोरानें बांधिले चाडे । सोहं तें रोकडें बीज पेरूं ॥ ५ ॥
शेत लवलाहीं आलें हो पिकासी । दाणा कणसासी घनदाट ॥ ६ ॥
सद्गुरूकृपेनें केलें हो चुरणें । आनंद उन्मनें रास केली ॥ ७ ॥
**नगा** म्हणे आम्हां अन्ना काय उणें? । फेडियलें दैन्य सद्गुरूनें ॥ ८ ॥

या अभंगांतील मोठ्या अक्षरांचे शब्द शेतकीच्या कित्येक अवजारांचीं नांवें होत.

काया छत्रकाशी लिंग वाराणशी । कारण जाणशी सरस्वती ॥ १ ॥
महाकारण यमुना त्रिवेणीसंगम । सत्रावी जीवन वाहे तेथें ॥ २ ॥
मनकार्णिका घाट आत्मा विश्वनाथ । परात्पर तेथें विराजित ॥ ३ ॥
**नगा** म्हणे गया पहातां विष्णुज्योती । लक्ष्यस्वरूप तेथें अनिर्वाच्य ॥४॥

४

आंधळ्याची काठी देव नारायण । चालवी मज कोण स्वामीराया ॥ १ ॥
अपंग अनाथ म्हणवितों तुझा । ब्रिदाचिया लाजा पुरीं मज ॥ २ ॥
चिडी मुंगी पक्षी अवघ्यांचा तूं दाता । **नगा**चीहि चिंता असूं द्यावी॥३॥

५

प्रल्हादबालक गांजी तीर्थरूप । त्यालागीं स्वरूप प्रगटलें ॥ १ ॥
अढळपदीं थारा दिधला ध्रुवासी । बाळ उपयन्युसि क्षीरसिंधू ॥ २ ॥
देवा ! तुझें नांव भक्ताची हे नौका । **नगा**चा प्राणसखा नारायण ॥ ३ ॥

पुढील पदांत 'नगनाथ' 'व मुरहरसुत' अशीं दोन नांवें आढळतात, यामुळें तीं पदें कोणाचीं आहेत, याचा निर्णय होत नाहीं.

१

माझें मागणें मागणें नसे कांहीं ।
निरंतर मम हृदयीं राहीं ॥ ध्रु० ॥
गुंतलों मायीं मायीं भवपाशीं ।
जिव दुःखित अनाथ परदेशी ॥

कोण गत करूं करूं गा हृषिकेशी !
कठोरता नको धरूं मजशीं ॥
अंतरीं दया दया येउं द्यावी ॥ निरंतर० ॥ १ ॥

भरवंसा तुझिया तुझिया नामाचा ।
अशी गर्जली वेदवाचा ॥
शीण दूर केला केला संतांचा ॥
पाढेवार झाला पंताचा ॥
ब्रिदावळी साजे साजे ऐसि पाहीं ॥ निरंतर० ॥ २ ॥

कृपासागर सागरा श्रीअनंता ।
कशी तोडिली माझी ममता ।
काय हें झालें झालें ममसंचिता ।
सांग श्रीहरी रमाकांता ।
येईं बा त्वरें त्वरें शेषशायी ॥ निरंतर० ॥ ३ ॥

नगनाथ म्हणे म्हणे बा गोपिरमणा ।
शरण मी आलों जगज्जीवना ॥
भक्तवत्सला वत्सला दीनोद्धरणा ।
मुरहरसुत विनवी चरणा ॥
पदीं आपुल्या आपुल्या ठाव देईं ॥ निरंतर० ॥ ४ ॥

'नगनाथ' ह्या शब्दावरून नगाजी महाराज नाथसंप्रदायी होते असें वाटतें.

२

बाई मूल तुझा हा आम्हांस छळितो कसा ।
वाटे गोकुळ त्यागुन जावें दुरल्या देशा ॥ ध्रु० ॥

एक गोपी येऊन म्हणे यशोदेप्रती ।
तुम्ही सुज्ञ असुनि कां भ्रमली तुमची मती ॥
तुम्हीं कसें शिकविलें आपुले मुलाप्रती ।
वाटे घाटे येऊन म्हणतो 'तुमचा पती' ॥

चाल । जरि लहान म्हणावा तरि कैसा मातला ।
काल एकटि पाहुन यमुनेतिरिं पातला ।
म्हणे कंदुक आमुचा कां चोळिंत घातला ।
कोठवरी सांगूं अवगुण फंदी हा भलतिसा ॥ १ ॥
दुसरी ह्मणे आतां करावें कसें ।
नित्य येतो माझ्या मंदिरिं भलत्या मिसें ॥
रतिसुख करावें कसें शिकवि म्हणतसे ।
लाडका हरी हा तुमचा तुम्हांला असे ॥
चाल । हे गोष्ट कोठें नये आम्हां सांगतां ।
काल एकट पाहून रतला अम्हां, देखतां– ।
लाज वाटे आम्हाला कोठें नये सांगतां ।
सांगतों तुम्हाला स्पष्ट नष्ट भलतीसा ॥ २ ॥
तिसरी म्हणे तुम्ही उग्याच कां बैसतां ।
येथें राहुन अवघ्या निलाजऱ्या दीसतां ॥
उठा मथुरेला जाऊं सर्वांदेखतां ।
भय नाहिं आम्हाला याचे गुण सांगतां ॥
चाल । अशि रीत गांवाची कोठें दिसेना बरी ।
कोणि याला शिक्षा लावित नाहीं वरी ।
विधि लिहिलां चुकला याचे भाळावरी ॥
बहु जार चोर हा नष्ट फंदी भलतीसा ॥ ३ ॥
चार सहा अठरा आणि बाराजणी ।
पांच पंचवीस मिळाल्या गौळिणी ॥
सोळा चवदा धरूं म्हणती धावुनी ।
अशा बहुत भागल्या पाहतां दिनरजनीं ॥
चाल । अभिमानीं भुलल्या कधींच ना सांपडे ।
विधि इंद्रादिक श्रमले कीं बापुडे ।
नगनाथ म्हणे गुरुकृपे सहज सांपडे ।
मुरहरसुत होई शरण धरुनि भरंवसा ॥ ४ ॥

३

रविकुलभूषण हो रामा, तूंचि ये बा ॥ ध्रु० ॥
दशरथनंदन स्वामि दयाघन सीतापते रघुराया ।
मार्गी चालतां चरणरजानें उद्धरि गौतमजाया ॥ १ ॥
उलट्या अक्षरीं वाल्मिक तरला पुराण देती ग्वाही ।
विरंचिलागीं महिमा नकळे शिणले वेद त्या ठायीं ॥ २ ॥
बिभीषणाला राज्य देउनी मारुनि रावण बळी ।
कपिकुळानें लंका जाळुनि क्षणांत केली होळी ॥ ३ ॥
**नगा** म्हणे हें नांव जपोनी शुद्ध करावी काया ।
मुरहरसुता मनन असूं दे कधीं न जासी वाया ॥ ४ ॥

४ ( हिंदुस्थानी )

गाफल मत रहना भाई । देखो सब घटमों साई ॥ ध्रु० ॥
लगी है चारों तरफसे अगन । बिचमों जलता है सब जगन् ।
होगई माया बिचमों मगन । नाहक उमर खोई ॥ १ ॥
जोरू लडके संपत माया । हत्ती महेल मुलुख मिलाया ।
मेरा करके जान खोया । सात कवडी ना आयी ॥ २ ॥
ऐसी सारी जाहनकी रीत । करके धनकामिनसें मीत ।
तूं तो करले अपना हीत । ऐसी करणी कर भाई ॥ ३ ॥
जाके पीर मुरशतकूं मिलना । बंदे हुशार होके चलना ।
हमेष रामभजनमें झुलना । ये तो तेरी असलाई ॥ ४ ॥
मुरहरसुत कदमसें जडा । बजाता रामनाम चौघडा ।
साईं **नगा** हमारा बडा । उने किल्लि बतलाई ॥ ५ ॥

५

करले रामसों प्रीत । अरे मना रे ॥ ध्रु० ॥
सबही सारा झूट पसारा । कर कछु आपना हीत ॥ १ ॥
भवसागरमों क्यौंकर डुबता । तिरनेकि नहि तुझे रीत ॥ २ ॥
पीर मुरशतकूं जाके मिलना । कदमसें लगाना चित्त ॥ ३ ॥
मुरहरसुत तोरे लागत पैय्या । नामको गाता गीत ॥ ४ ॥

खालील पद मल्हारी नामक नगाजीमहाराजांच्या एका शिष्यानें केलें आहे:—

६

आवड लागली पायांची । जागा नगाजिरायाची ॥ ध्रु० ॥
तोची नगाजी अवतार । जागती ज्योत चमत्कार ॥
नापिकवंशीं जन्म ज्याचा । *कास्त विचार वंशाचा ॥
तोचि नगाजी जगिं मान्य । पहा कुळवंशीं धन्य धन्य ॥
देऊळ बांधिलें अपूर्व । सोहंमूर्ति चमत्कार ॥
गोकुळ अष्टमिचा गजर । यात्रा भरली चौफेर ॥
तेथें झाली संतांची दाटी । झालर मृदंग वाजती ॥
बोले **मल्हारि** किंकर । लोळे सद्गुरु चरणावर ॥

---

## भैरव अवधूत ज्ञानसागर.

भैरव अवधूताभिध प्रसिद्ध म्हणती अपाजीबावा हो ।
उपनाम ज्ञानसागर, वास विटें ग्रामिं साधु ते गा हो ॥ १ ॥

**दिगंबर चैतन्य.**

सातारा जिल्ह्यांत खानापूर तालुक्यांत विटें हा कसब्याचा गांव प्रसिद्ध आहे, तेथें सुमारें १०० वर्षांपूर्वी हे सत्पुरुष कवि होऊन गेले. कवींचे विद्यमान वंशज ह० भ० प० गजाननबोवा ज्ञानसागर यांनीं कृपा करून कवींचे ग्रंथ मजकडे पाठविले, त्यांच्या आधारानें व कवींचे चिरंजीव दिगंबरचैतन्य यांनीं कवींचें आर्यात्मक चरित्र लिहिलें आहे, त्यावरून प्रस्तुत चरित्रलेख मी लिहीत आहें.

सुमारें २५० वर्षांपूर्वी उद्धवचिद्धन नामक प्रसिद्ध सत्पुरुष महाराष्ट्रांत होऊन गेले, त्यांचे गुरु जे चिद्धनस्वामी त्यांच्या भगिनीच्या

---

* ह्या शब्दाचा अर्थ बरोबर लागत नाहीं.

वंशांत भैरव अवधूत हे जन्म पावले. भैरवांस अप्पाजीबुवा असेंही म्हणत असत. त्यांच्या वडिलांचें नांव ज्योतिपंत व आईचें यमुना. ह्यांस गोविंद व गोपाळ असे दोन बंधु होते. भैरवबुवांच्या आज्याचें नांव मुकुंदपंत व आजीचें नांव निराबाई. ही निराबाई अद्वैतचैतन्य नामक सत्पुरुषाची कन्या होती व चिद्घनस्वामी हे तिचे बंधु होत. भैरवस्वामीचे पूर्वज विटें येथील वतनदार जोशी व कुळकर्णी होते; पतकेपणाचें वतनही त्यांच्याकडे होतें. भैरवबुवांचे पितामह मुकुंदपंत व चुलते शिवाजीपंत हे विरक्त सत्पुरुष होते. शिवाजीपंतांस मुलगा नव्हता, म्हणून त्यांनीं भैरवबुवांस पित्याचे आज्ञेवरून दत्तक घेतलें होतें. हे भैरवबुवाही मोठे ज्ञानी होते. लक्ष्मीनाथ नामक एक सत्पुरुष भैरवबुवांचे मित्र होते, ते पैठणास राहत असत, तेथें जाऊन भैरवबुवांनीं श्रीदत्ताची सेवा केली व त्या सेवेनें प्रसन्न होऊन दत्ताची मूर्ति पैठणाहून विट्यास आली. शके १७२३ प्रजापति संवत्सर, आषाढ शुद्ध सप्तमी, शुक्रवारीं, उत्तरानक्षत्रीं दत्तमूर्ति विटें येथें आली, असें दिगंबरबुवांनीं लिहिलें आहे. या मूर्तीचें मंदिर बांधून प्रतिवर्षी तेथें दत्तजयंतीचा उत्सव करण्याचा क्रम भैरवबुवांनीं शके १७४९ पासून सुरू केला, तो अद्याप चालू आहे. भैरवबुवा पैठण येथें असतां, तेथें सदाशिव शंकर यांशीं त्यांची गांठ पडली; हे सदाशिव शंकर पुढें हरिहरेंद्रस्वामी या नांवानें प्रसिद्धीस आले.

भैरवबुवांनीं आपले तीर्थरूप शिवाजीचैतन्य यांजकडून गुरूपदेश घेतला होता. भैरवबुवा आळंदी येथें कांहीं दिवस राहिले होते, असें त्यांच्या खालील उक्तीवरून दिसतें.

" शुक्रवार ध्रुव योग कर्ण ... उडगण येकविंश ।
शालिवाहन शके सत्राशांवरि वर्षे द्वात्रिंश ।

प्रमोदवत्सर इंद्रायणितिर दैवत सिद्धेश ।
शिवगुरु अवधुत होउनि केला अलकावतिवास ॥ "

आपल्या वृद्धपणीं भैरवबुवा काशीयात्रेस गेले होते. भैरवबोवांचें आडनांव ज्ञानसागर; व ह्या उपनांवाप्रमाणें ते खरोखरच ज्ञानसागर होते. त्यांचे चिरंजीव दिगंबर यांनीं त्यांस 'वेदांतवक्ते' व 'परमब्रह्मनिष्ठ' असें म्हटलें आहे व त्यांची कविता पाहिली म्हणजे हीं विशेषणें त्यांच्याठायीं अगदीं अन्वर्थक होतीं, असें वाटल्यावांचून राहत नाहीं. भैरवबुवांनीं, शके १७६२, प्लव संवत्सर, कार्तिक शुद्ध एकादशी या दिवशीं संन्यास घेतला, त्यावेळीं ते फार तेजस्वी दिसूं लागले व चिमण्या वगैरे पक्षी त्यांच्या अंगावर निर्भयपणें येऊन बसले! 'सर्वं खल्विदं ब्रह्म' या महावाक्याचा उपदेश भैरवस्वामी करीत असत, तो उपदेश स्वतःच्या ठायीं कितपत ठसला आहे, हें सामान्य जनांस दाखविण्यासाठीं स्वामींनीं हा चमत्कार करून दाखविला. त्या चिमण्या भैरवस्वामींच्या अंगावर किती निर्भयपणें बसल्या होत्या हें पुढील आर्येवरून समजेल.

' द्विज उडवितां न उडती, अद्वय प्रत्यय जनांसि दाखविला ।
स्वामि महाराजांनीं ब्रह्मपणें ब्रह्मरसाचि चाखविला ॥ '

भैरवस्वामींनीं संन्यासदीक्षा ग्रहण केल्यावर, श्रीवासुदेव स्वामी यांनीं त्यांचें नांव 'श्रीज्ञानसागरेंद्र स्वामी' असें ठेविलें. पुढें दोन वर्षांनीं, म्हणजे शके १७६९, मार्गशीर्ष कृष्ण त्रयोदशी, अनुराधा नक्षत्र, या दिवशीं भैरवबुवा समाधिस्थ झाले. आपण अमुक वेळीं समाधिस्थ होणार हें स्वामींनीं पूर्वींच आपल्या शिष्यवर्गास सांगून ठेविलें होतें. स्वामीच्या पुण्यतिथीचा उत्सव विटें येथें त्यांच्या

वंशजांकडून प्रतिवर्षीं साजरा केला जातो. भैरवबुवांची गुरुपरंपरा येणेंप्रमाणें:—



भैरवबुवांनीं त्रिटें येथें दत्तमंदिर बांधून मठस्थापना केली. ह्या मठास शिंदे सरकारांतून १२०० रुपयांचें वर्षासन चालू होतें, असें इतिहाससंग्रह मासिक पुस्तकाच्या चौथ्या अंकांत लिहिलें आहे पण तें बरोबर नाहीं. शिंदे सरकारांतून या मठाकडे कधींही उत्पन्न चालू नव्हतें. फक्त गायकवाड सरकारांतून प्रतिवर्षी ९९० बाबाशाई रुपये मिळत असत, पण सन १८८८ पासून ते बंद झाले आहेत. देवास येथील श्री० पोवार यांजकडून मठाच्या खर्चासाठीं दरसाल १९० रुपये मिळतात. याशिवाय कांहीं इनाम जमिनी आहेत. त्यांच्या उत्पन्नांतून मठाचा व उत्सवाचा खर्च चालतो.

ज्ञानसागर हे आश्वलायन शाखेचे देशस्थ ब्राह्मण; ह्यांचें गोत्र विश्वामित्र. भैरव अवधूत यांस दिगंबर नामक एक पुत्र होता, तो रूपानें फार सुंदर असून, अप्रतिम वक्ता, उत्कृष्ट कीर्तनकार व संगीतकलेंत केवळ प्रतिगंधर्व होता. ह्या गुणांच्या जोरावर त्यानें द्रव्यही पुष्कळ मिळविलें. दिगंबराची थोडीशी कविताही उपलब्ध आहे. भैरव अवधूत यांची जी कविता रा० गजाननबोवा यांनीं मजकडे पाठविली त्यांतील बहुतेक कविता ह्या दिगंबरबुवांच्या हातची आहे. ह्यांस पाहिलेले बरेच लोक सातारा जिल्ह्यांत अद्याप हयात आहेत, असें समजतें.

भैरवअवधूत यांची एकंदर कविता हजाराच्या आंत आहे. त्यांचा ज्ञानसागर या नांवाचा एक अध्यात्मपर ग्रंथ आहे, त्याच्या १४ रेषा असून, ओवीसंख्या ३१९ आहे. याशिवाय त्यांचीं पदें व अभंग मिळून सुमारें ३०० कविता आहे.

भैरवअवधूत यांची वाणी प्रायः शुद्ध, गंभीर, सुसंस्कृत, स्वानुभवयुक्त, अधिकारवती व प्रासादिक अशी आहे. त्यांचीं बहुतेक पदें पैठण येथील शिवदिनकेसरींच्या पदांच्या चालींवर असून, त्यांची रचनाही थेट त्याच पदांच्या रचनेसारखी आहे. भैरवअवधूत

यांनीं हिंदुस्थानी भाषेंतही कांहीं पद्यें रचिलीं आहेत. ह्यांची बहुतेक कविता वेदांतपर, भक्तीपर, उपदेशपर व आध्यात्मपर असल्यामुळें, खऱ्या कवित्वास त्यांत फारसा वाव सांपडला नाहीं; तथापि क्वचित् स्थलीं हें कवित्व अत्यंत उज्ज्वलतेनें चमकत असल्याचें दृष्टोत्पत्तीस आल्याशिवाय राहत नाहीं. भैरवबुवांनीं आपल्या कवितेंत 'ज्ञानसागर शिवगुरु अवधूत' या शब्दांनीं आपला व आपल्या गुरूंचा उल्लेख सर्वत्र केला आहे. आतां, भैरव अवधूत यांच्या कवितेंतले कांहीं सरस वेंचे येथें देऊन हा चरित्र-लेख पूर्ण करितों.

भैरवअवधूत यांचा ज्ञानसागर ग्रंथ फारच उत्कृष्ट आहे. ग्रंथारंभीं कवि म्हणतात:—

## ओव्या.

'नमो आदिगुरु परात्पर । स्वयंभु साकार निराकार ।
आपीं आप गणेश्वर । क्रीडा करी स्वानंदें ॥ १ ॥

परमार्थ प्रपंच विचार । पूर्ण कळावा साचार ।
हृदयीं धरूनि आदर । जगदोदर वंदिला ॥ २ ॥

सप्रेमें गुरु माउली । महाभारति पान्हावली ।
चित्स्फूर्ति स्फुरली । सहज चालिली ग्रंथरचना ॥ ३ ॥

ब्रह्मीं आस्तिक्य शुद्ध स्थिति । तो परमार्थ श्रुतिसंमति ।
ब्रह्मविलास प्रपंचव्याक्ति । जाण निगुति सुविचारें ॥ ४ ॥

परमार्थ ब्रह्म परात्पर । कैसें जाणावें अगोचर ।
या आक्षेपाचें उत्तर । हृदयविहार देतसे ॥ ५ ॥

सुज्ञा ! आपणातें जाणसी । स्वतंत्रता नाहीं कवणासी ।
वर्तवी स्वसामर्थ्यें जगासी । सुखदुःखासी भोगवी ॥ ६ ॥

सुख माने सर्व जना । दुःख कोणाही आवडेना ।
परि न सुटे भोगिल्याविना । शासन अनुमाना शास्त्याचें ॥ ७ ॥

शास्ता अलक्ष अगोचर । कवणा न कळ तयाचा विचार ।
सत्तामात्रत्वें निर्धार । ऋषिमुनिवर जाणती ॥ ८ ॥
वसंतें वन शोभावें । त्यावरून तयातें जाणावें ।
या सामर्थ्यांतील त्यास वळखावें । न घडे आघवें अरूपत्वें ॥ ९ ॥
शुद्ध आत्मत्वें अकर्ता । तोचि निजसामर्थ्यें कर्ता ।
उत्तम पुरुष ईश्वरवार्ता । एक पदार्था विशेषणें ॥ १० ॥
सामर्थ्य आणि सामर्थ्यवान । विचारें जाणती मात्र सुज्ञ ।
रत्नकीळ आणि रत्न । तेंवि भिनाभिन्न शक्तशक्ती ॥ ११ ॥
एवं शक्तशक्तियुक्त सहजस्थिति । नित्यक्षण निजसंपत्ति ।
आपुली आपणा स्मृति । स्मृतिविस्मृतिविण असे ॥ १२ ॥
जो प्राणाचाहि प्राण । नयनाचाहि नयन ।
तो परमार्थ पुरातन । विश्वाधिष्ठान क्षमत्वें ॥ १३ ॥

### ज्ञानसागर—प्रथमरेषा.

ब्रह्मकमळणी वेलींतून । स्फूर्तिकलिका होय उत्पन्न ।
ते विकसित होय पूर्ण । अष्टधा जाण अष्टदळकमळ ॥ १ ॥
काळिका उमलतांचि पाहीं । पुष्पा पांकळ्या एकेचि समयीं ।
प्रगट होती निश्चयीं । प्रणवीं अष्टधा तशी प्रगटे ॥ २ ॥
पांकळीपासोनि पांकळी । उत्पन्न नोहे कोणे काळीं ।
तैशी ओंकारकळी मोकळी । स्फूर्ति उकलली अष्टधा ॥ ३ ॥
आकाशादि पंचभूतें । मनबुद्धि अहंकारातें ।
उदेजणें होय निगुतें । एक समयातें समानत्वें ॥ ४ ॥
तया तत्त्वाचें विस्तारणें । तेंचि विख्यात पंचीकर्णें ।
अजपाचक्रें त्रिगुणें । पिंडब्रह्मांडभुवनें शक्तिनिबंध ॥ ५ ॥
पंचभूतें कालवती । कर्दम होऊन ब्रह्मांडोत्पत्ती ।
मतांतरीं प्रतिपादिती । परी ते युक्ती अघटमान ॥ ६ ॥
आकाश वायु अरूप । तया कर्दमसंकल्प ।
न घडे; वायु आणि आप । एकरूपक हीं नव्हे ॥ ७ ॥

अग्नि आणि पाणी । उभयां एक मिळणी ।
न होय हे कडसणी । सर्वत्र प्राणी जाणती ॥ ८ ॥
जळ आणि मेदिनी । कालवती हें दिसे नयनीं ।
परी भिंती रचिली कोणी । त्यांत पाणी न देखती ॥ ९ ॥
भिंत कोरडी माती । तेथें न दिसे पाणीयाची स्थिति ॥
पंचभूतांची गती । न मिळती कधीं परस्परें ॥ १० ॥

ज्ञानसागर–रेषा ५.

कर्दम न होतां ऐक्यता । हे अघटित ईश्वरसत्ता ।
वाघ शेळी पाणी पितां । वैर चित्ता सुचों नेदी ॥ १ ॥
ईश्वरसत्ता सामर्थ्य अनिवार । तेणें होय चराचर ।
आनंदशक्तिनिबंध प्रकार । विरुद्ध विकार होऊं नेदी ॥ २ ॥
शांत उग्र भयासुर । अद्भुत कारुण्य हास्य वीर ।
भयानक मधुर शृंगार । बहु प्रकार रसशक्ती ॥ ३ ॥
अनंतशक्तीचा मेळावा । रसमैत्री रसविरुद्ध भावा ।
सत्तामात्रें व्यवहार आघवा । चालवी जीवा स्वात्मत्वें ॥ ४ ॥
येकेक अनंतशक्ति । तये शक्तीच्या अनंत व्यक्ति ।
व्यक्तीमाजी रूपाकृति । अपार गती जाणवेना ॥ ५ ॥
एक शहाणें एक वेडें । एक मुग्ध धड घोंगडें ।
एक अशक्तें बहु रोडें । एक गाढें बुद्धिवंत ॥ ६ ॥
चार खाणी चार वाणी । नानाविधि जीवश्रेणी ।
बद्धमुक्त भक्त ज्ञानी । अघटित करणी करीतसे ॥ ७ ॥
सर्व सोंगें घेऊनी अंगीं । आपणचि नटलासे सोंगी ।
स्वविलास भोग भोगी । नानारंगीं रंगोनी ॥ ८ ॥
एकांतीं गायक गाय गाणें । तेथें श्रोता वक्ता आपण ।
रिझवणें रिझोनी प्रसन्न होणें । येक आपण आपणासी ॥ ९ ॥
तेवीं अद्वैतीं द्वैत दावी । बहुरंगी अति लाघवी ।
हे किंचित् चिच्छक्ति मिरवी । येकांशीं आघवी जगत्स्थिति ॥ १० ॥

एकपदीं विश्वरचना । तोहि सविकल्पज्ञानविलास भावना ।
शेष त्रिपाद जाणा । निर्विकल्प खुणा शुद्धस्थिति ॥ ११ ॥

एवं सगुण निर्गुण । एकरूप आपण ।
जैसें गोमक्षिका अंगस्फुरण । चमत्कार करणें क्षमत्वीं ॥ १२ ॥

गायत्री स्वस्थितियोगें । केव्हां स्फुरवी सर्वांग ।
केव्हां किंचित् एकांग । स्फुरवी अव्यंग स्वलीलया ॥ १३ ॥

तैसें ब्रह्म जेवढें । केव्हां विश्वही तेवढें ।
लीलापरत्वें वाडें कोडें । होय थोडें किंचित्फुरण ॥ १४ ॥

स्वयं संपूर्ण निर्गुण । तोंचि आघवें सगुण ।
सगुणनिर्गुणासहित जाण । दोहीं विलक्षण सहजस्थिति ॥ १५ ॥

**आवसेचे दिवशीं । निर्गुण होय शशि ।**
**तो सगुण पौणमसा । होय अष्टमीसी सगुण निर्गुण ॥१६॥**

**पहा चंद्र अष्टमीला । अर्ध रिक्त अर्ध भरला ।**
**या विलासातीत संपला । कळाविकळांविण चंद्र ॥ १७ ॥**

तैसा उपाधीवांचून । आत्मा विलसे चिद्घन ।
पूर्ण वैराग्यज्ञान । भक्ति अनन्य स्वात्मत्वें ॥ १८ ॥

येथें अध्यास अपवादाचे । बोल न मानती साचे ।
दृष्टांत रज्जु-सर्पाचे । शुक्ति-रजताचे अघटमान ॥ १९ ॥

सत्य रज्जु सत्य व्याळा । तिसरा पाहणार निराळा ।
तेणें पाहिला पाहिजे डोळां । तिमिरवेळा भासेल त्यासी ॥ २० ॥

ब्रह्म रज्जु सत्य होय । तेंवी सत्य सर्प विश्व कोठें आहे ? ।
पाहतां उभयां होउनी वेगळा राहे । विचारूनि पाहें कैंवि घडे ? ॥ २१ ॥

ब्रह्मावेगळें जन । पाहिलें नसतां नयन ।
विवर्त अध्यान ध्यान । जाणेल मन कैसेनी ? ॥ २२ ॥

विवर्त वादमत्तां । दोष दिसती बोलतां ।
तो सांडुनी तत्वतां । चिद्विलास मता अनुसरलों ॥ २३

**ज्ञानसागर-रेषा ६**

इतक्या ओंव्यांवरून ज्ञानसागर ग्रंथाच्या एकंदर रचनेविषयींची साधारण कल्पना वाचकांस होईल, असें वाटतें. वरील उताऱ्यांतील मोठ्या टाइपांत दिलेल्या ओंव्यांतील चंद्राची उपमा सगुण–निर्गुण–वर्णनासंबंधानें किती समर्पक आहे. हें अध्यात्मविषयाची ज्यांस थोडी तरी माहिती असेल, त्यांस सांगावयास नकोच. निरनिराळ्या तिथींस चंद्र निरनिराळ्या आकारांत दिसतो, पण त्या गोष्टीशीं त्याचा स्वतःचा कांहीं संबंध नाहीं; कारण हे सगळे चमत्कार पृथ्वी आणि सूर्य यांजकडून होतात, हा ज्योतिःशास्त्रांतला सिद्धांत कवीस उत्तमप्रकारें अवगत होता, हें यावरून उघड सिद्ध होत आहे. ज्ञानसागर ग्रंथाचा विषय गहन असल्यामुळें, गुरुमुखाशिवाय तदंतर्गत ज्ञानाचें आकलन करणें सामान्यजनांस बरेंच कठिण जाईल असें वाटतें. ग्रंथारंभींच कवीनें सांगितल्याप्रमाणें ही सगळी 'सहज चाललेली ग्रंथरचना' आहे. वरील वेंचे ज्या पोथींतून घेतले आहेत, ती पोथी कवीच्या हातची असून, तींत फारशी खोडाखोड दिसत नाहीं, यावरूनही, ही ग्रंथरचना अगदीं सहज झाली असली पाहिजे, असें वाटल्याशिवाय राहत नाहीं. ग्रंथाच्या शेवटच्या रेषेंत कवीनें आपलें चारित्र व गुरुपरंपरा दिली आहे; ही सबंध रेषा वाचनीय असल्यामुळें, वाचकांच्या परवानगीनें मी तिचा येथें मुद्दाम संग्रह करितों:—

'वाम–कौलिकादि मतें । सर्वथैच सांडोनि सुनिश्चितें ।
ब्रह्मनिष्ठ सदाचारातें । अनुसरोन गुरुतें भजावें ॥ १ ॥

वेदाज्ञा नुलंघावी । शास्त्रगुरुप्रतीति जीवीं धरावी ।
आत्मप्रतीति जाणावी । खुण बाणावी परात्पर ॥ २॥

गुरुपरंपरा वंदन नामावळी । करितां स्तोत्रपाठ त्रिकाळीं ।
तेणें महापातकाची होळी । होय तात्काळीं ब्रह्मानंदें ॥ ३॥

त्या गुरुमूर्तींचीं नांवें । सांगतों ऐका प्रेमभावें ।
गुरुरूपनाम ध्यावें गावें । लीन व्हावें गुरुचरणीं ॥ ४ ॥
सर्वांसी आदिगुरु साचार । परब्रह्मोत्तम पुरुष परात्पर ।
सच्चिदानंद सकलोद्धार । पूर्ण ज्ञानसागर चैतन्य ॥ ५ ॥
तो उत्तम पुरुष निर्गुण । सांब दक्षिणामूर्ति सगुण ।
करावया जगदोद्धारण । अवतरला आपण स्वानंदें ॥ ६ ॥
दक्षिणांग शिव पूर्ण । म्हणोनि दक्षिणामूर्ति अभिधान ।
वामांगीं पार्वती अनन्य । चैतन्यघन आदिपुरुष ॥ ७ ॥
तेणें दत्तात्रय उपदेशिला । चैतन्य संप्रदाय चालविला ।
आचार्यत्व दत्तात्रयाला । देवोनि केला जगद्गुरु ॥ ८ ॥
दत्त चैतन्यावधूतासी । कायावाचा मनेंसी ।
शिवचैतन्यावधूत वेगेंसी । शरण अहर्निशीं सर्वस्वें ॥ ९ ॥
दत्तात्रयाचा उपदेश । प्राप्त झाला शिवचैतन्यास ।
तेणें गोपाळचैतन्यास । केला उपदेश स्वानंदें ॥ १० ॥
गोपाळचैतन्यस्फूर्ति । स्फुरली आत्मारामचैतन्यासी पुर्ती ।
तेणें कृष्णचैतन्य चक्रवर्ती । उपदेशोनि कीर्ति वाढविली ॥ ११ ॥
कृष्णचरणीं साजिरी । तुळसीचैतन्य मंजरी ।
शिष्यत्वें शोभली बरी । तयासी अंगिकारी श्रीकृष्ण ॥ १२ ॥
तुळसीचरणछायेसी । अद्वयचैतन्य अनन्यभावेंसी ।
शरण होवोनि अनुग्रहासी । लाहोनि समाधीसी बैसला ॥ १३ ॥
तेणें समाधिसुखानंदें । स्वपुत्र चिद्घन निजछंदें ।
उपदेशोनि ब्रह्मवृंदें । तोषवोनि मंदें तारिलीं ॥ १४ ॥
कृपेनें वोळला चिद्घन । वर्षला स्वानुभवामृतजीवन ।
स्वसुत नागेशचैतन्य । केला पावन चक्षुश्रवा ॥ १५ ॥
नागेशगुरुचरणासी । शिवचैतन्य गुणराशी ।
शरण होवोनि स्वात्मसुखासी । भोगी अहर्निशीं अनन्य ॥ १६ ॥
शिवचैतन्य ज्ञानसागर । जगद्गुरु पार्वतीवर ।
तेणें माझा अंगीकार । करोनी दीनोद्धार पैं केला ॥ १७ ॥

धन्य तयाचा उपकार । काय वर्णू मी पामर ।
मस्तकीं ठेवोनि अभय कर । वरद वर दीधला ॥ १८ ॥
जोतलिंगपंत पिता । यमुनाई माझी माता ।
शिवचैतन्य वडील चुलता । ज्ञानदाता मम गुरु ॥ १९ ॥
चिद्घनकन्या निराबाई । ते शिवचैतन्याची आई ।
प्रत्यक्ष माझी पितामही । योग्यता काई वर्णू तिची ॥ २० ॥
मुकुंदपंत माझा आजा । तो पवित्र भोळा राजा ।
तयासी सेवाबळें सहजा । प्रसन्न वोजा क्षेत्रपाळ ॥ २१ ॥
वृद्धि होईल वंशाला । ऐसा क्षेत्रपालाचा वर जाला ।
म्हणोनि नामाभिधान मजला । व्यवहारसंकेताला भैरव ॥ २२ ॥
जोतिलिंगासीं मुकुंद म्हणे । भैरव शिवचैतन्यासी देणें ।
पितर–आज्ञा मानून तेणें । केलें अर्पण मजलागीं ॥ २३ ॥
शिवें अंगीकार केला । गायत्रीमंत्र उपदेशिला ।
प्रेमभावें उचंबळला । कानीं सांगितला गुरुमंत्र ॥ २४ ॥
नंतर सदाशिवशंकरें । नयनीं अलक्ष्य केलें गोचर ।
चिद्विलास हरिहरें । स्वानुभवामृतसार पाजिलें ॥ २५ ॥
लक्ष्मीनाथजीचा संग घडला । घेवोनि गेले पैठणाला ।
गंगातीरीं लाभ जाहला । पूर्ण भेटला हरिहरेंद्र ॥ २६ ॥
लक्ष्मीनाथजीचा उपकार । जाहला मजवर अपार ।
साक्षात् भेटविला हरिहर । स्वानुभवामृतसार जेवविलें ॥ २७ ॥
हरिहरेंद्रस्वामिची वाणी । महाअद्वैत चिद्रत्नखाणी ।
तया श्रवणाची शिराणी । नेणें कोणी वर्णावया ॥ २८ ॥
त्या श्रवणामृताचे तुषार । स्फुरले ते बोलिलों प्रकार ।
तत्रापि ग्रंथ ज्ञानसागर । करितां विचार अपार हा ॥ २९ ॥
येऱ्हवीं पाहतां मी दुबळा । परि हा स्वानुभवाचा गळाळा ।
सेविति ते कळिकाळा । मारोनि मोकळा मार्ग करिती ॥ ३० ॥
मिरजप्रांत कृष्णातीरीं । कसबें ईटें नाम नगरी ।
रेवणसिद्धेश्वर डोंगरीं । वसतो घरीं दत्तात्रय ॥ ३१ ॥

कुळकर्णी पतके जोशी । वतनें आमचीं मिरासी ।
कृष्णातीर पंचक्रोशीं । विश्वामित्र ऋषि गोत्रींचा ॥ ३२ ॥
शाखा शुद्ध आश्वलायन । कनिष्ठ बंधु दोघेजण ।
गोविंद गोपाळचैतन्य । करिती अनन्य गुरुभक्ति ॥ ३३ ॥
कुळीं उपनाम ज्ञानसागर । संप्रदाय चैतन्य परात्पर ।
भैरव अभिधान व्यवहार । पंथ गोचर अवधूत ॥ ३४ ॥
प्रेमें जन म्हणती आपा । शिवदेव नाम माझिया बापा ।
मजला आणिलें नामरूपा । हे कृपा संतांची ॥ ३५ ॥
धरोनि माझें नामरूप । विलसलें चैतन्य आपोआप ।
तोचि होवोनियां सक्रप । ग्रंथरूप विस्तारलें ॥ ३६ ॥
नाहीं अभिमानाची ख्याती । केली सलगीची विनंती ।
कृपा करोनियां संतीं । ग्रंथप्रतीति वर दीजे ॥ ३७ ॥
कृपाळु तोषले गुरुसंत । म्हणती राहें बा निवांत ।
कथिला चिद्विलास अद्वैत । सत्य ज्ञानानंत साजिरा ॥ ३८ ॥
अभिमानी या ग्रंथाचा । स्वयें दत्तात्रय साचा ।
तेणें वदविली हे वाचा । कारण जगाच्या कल्याणा ॥ ३९ ॥
हे मंगळ वाणी मंगळकारक । भावें वाचिती जे निःशंक ।
तयांसी साम्राज्यकौतुक । अलौकिक प्राप्त होय ॥ ४० ॥
गोविंदचैतन्य सुखावला । तेणें दिगंबरचैतन्याला ।
गुरुसंप्रदाय बोधिला । सुखी केला अखंडित ॥ ४१ ॥
ग्रंथ वाढेल बहुत । म्हणोनी कथन संकोळित ।
जेणें केलें तो हृदयांत । नित्य नांदत जगदात्मा ॥ ४२ ॥
आतां वारंवार विनंती । कृपावृद्धि करावी संतीं ।
श्रोते वक्ते सावधचित्तीं । प्रेमसंपत्ती अवधूत ॥ ४३ ॥

भैरव अवधूतस्वामीचे मित्र प्रतिष्ठानस्थ लक्ष्मीनाथ यांच्याठायीं किती निष्ठा होती, हें खालील आरतीवरून वाच-

'सगुण निर्गुण होउनि विलससि निजरूपीं ।
रूपें रूपीं दाविसि अनाम अरूपीं ॥
शैली पुंगी कंथा घालुनियां टोपी ।
कीर्तनरंगीं बोधी गुरुकिल्ली सोपी ॥ १ ॥
जयदेव जयदेव लक्ष्मीनाथेंद्रा ।
उत्तम पुरुषा स्वामी अनादि योगींद्रा ॥ ध्रु० ॥
परमार्थाचा लाहो करी नाम टाहो ।
सद्गद हृदयीं प्रेमळ अद्भुत पहा हो ।
नामीरूपीं त्याच्या अक्षयिं मन राहो ।
**ज्ञानसागर** अद्भुत चरणीं मिनला हो ॥ २ ॥

आतां भैरवबुवांचे पांच निवडक अभंग व पदें येथें देऊन हें चरित्र पूर्ण करितों:—

## अभंग.

निर्मळासी शुद्धि । नाहीं मुळींच उपाधी ॥ १ ॥
पारा खाउनियां सोनें । राहे आपुल्या वजनें ॥ २ ॥
तैसा देव तेजोराशी । नाहीं मळमूत्र त्यासी ॥ ३ ॥
प्रेमभक्तीचा भुकेला । निराकार आकारला ॥ ४ ॥
**ज्ञानसागर**निवासी । शिवगुरु अवधूत अविनाशी ॥ ५ ॥

२

पायीं ठेवितां कपाळ । नयनीं वाहे प्रेमजळ ॥ १ ॥
तेणें चरण प्रक्षाळिले । आंगीं रोमांच उठिले ॥ २ ॥
मनीं मनचि विरालें । चंद्रामृत तें चांगलें ॥ ३ ॥
तेंचि घेऊनियां करीं । मुखप्रक्षालन करीं ॥ ४ ॥
धूप संशय जाळिला । ज्ञानदीप उजळीला ॥ ५ ॥
दुध नैवेद्य साखर । भक्षी नवनीतसार ॥ ६ ॥
भक्त प्रसाद सेविती । गाती आनंदें नाचती ॥ ७ ॥
शिवगुरु ज्ञानाचा सागर । बोले अवधुत जयजयकार ॥ ८ ॥

३

दत्त परब्रह्म केवळ । नित्य पवित्र निर्मळ ॥ १ ॥
अरूप रूप हें चांगलें । ध्यानीं मानस रंगलें ॥ २ ॥
भव्य प्रसन्न वदन । पाहतां निवाले लोचन ॥ ३ ॥
जटा मुगुट मणि गंगा । भस्म लावियेलें अंगा ॥ ४ ॥
अनुहात निगमध्वनी । श्रुति कुंडलें श्रवणीं ॥ ५ ॥
रुळे वैजयंती कंठीं । केशर कस्तुरी लल्लाटीं ॥ ६ ॥
कासे पीतांबर पिंवळा । उभा षड्भुज सांवळा ॥ ७ ॥
चरणीं पादुका शोभती । सुरनर त्रिकाळीं वंदिती ॥ ८ ॥
**ज्ञानसागर** शिवगुरुस्मरणीं । अवधुत प्रगटे अंतःकरणीं ॥ ९ ॥

४

पंचामृत शुद्धस्नान । केशरमिश्रित चंदन ॥ १ ॥
केला पूर्ण अभिषेक । वाद्यें वाजती अनेक ॥ २ ॥
पंचगंगा सरस्वती । कृष्णा गंडकी गोमती ॥ ४ ॥
स्नाना जल घेउनि आल्या । ज्ञानसागरीं मिळाल्या ॥ ४ ॥
गंगा यमुना भागीरथी । चंद्रभागा भीमरथी ॥ ५ ॥
तुंगभद्रा ताम्रपर्णी । शरयु कावेरी पुष्करणी ॥ ६ ॥
तीर्थ सेविती सकळ । शिवगुरु अवधूत प्रेमळ ॥ ७ ॥

५

विश्वपट परिधान । करी अनसूयानंदन ॥ १ ॥
दिगंबराचें अंबर । बरवें शोभे चराचर ॥ २ ॥
नाना रत्नें वसुंधरा । घेउनि आली अलंकारा ॥ ३ ॥
लेवविले अंगोअंगीं । रंग रंगले निजरंगीं ॥ ४ ॥
ज्ञानसागराची शोभा । शिवगुरु अवधूत उभा ॥ ५ ॥

## पद १ ( हिंदुस्थानी. )

मंगलमूरत नाचत आवे ॥ ध्रु० ॥
कोटि सुरजसम तेज विकासित । जोतसें जोत मिलावे ॥ १ ॥
अनुहात बाजत सबही बाजे । सोहं तान सुनावे ॥ २ ॥

ग्यान शिवगुरु सागर **अवधूत** । आतमभाव बतावे ॥ ३ ॥

२

श्रीगुरुची करणी । अघटित वरदायक वाणी ॥ ध्रु० ॥
येकांतीं मज निजगुज आपुलें । सांगितलें श्रवणीं ॥ १ ॥
नयनीं नयना दाखविली खुण । तेजोद्भुतखाणी ॥ २ ॥
**ज्ञानसागरीं** शिवगुरु **अवधूत** । प्रेमाचें पाणी ॥ ३ ॥

३

नयनीं देखियली । वृत्ति स्वरूपीं मुरली ॥ ध्रु० ॥
करविरवासिनि देवी । अंबा लक्ष्मी महा वैष्णवी ॥ १ ॥
ज्योतीची निजज्योती । मुनिजन मनमोहन विश्रांती ॥ २ ॥
शिवगुरु **ज्ञानसागर** । **अवधूत** परमार्थाचें आगर ॥ ३॥

**४ ( हिंदुस्थानी )**

खेले होरी दत्त निरंजनशाम ॥ ध्रु०॥
ब्रह्म परात्पर आपहि आपमो । प्रकृतिपुरुष अभिराम ॥ १ ॥
अनुहत बाजत नाचत गावत । सप्तसूर तिन ग्राम ॥ २॥
रोमरोम सब उडत फवारे । नयन भरे जलप्रेम ॥ ३ ॥
**ज्ञानसागर** शिवगुरु **अवधूत** । नामहि निजसुखधाम ॥ ५ ।

५

प्रसन्न सिद्धेश्वर झाला । पूर्ण परात्पर वर दिधला ॥ ध्रु०॥
मस्तकिं हस्तक ठेवुनियां । धरिलें हृदयीं कवळुनियां ॥ १ ॥
निजगुज कानीं सांगितलें । ब्रह्मसनातन दाखविलें ॥ २ ॥
**ज्ञानसागरीं** निवांत । जाहला शिवगुरु **अवधूत** ॥ ३ ॥

**भैरवस्वामीचे चिरंजीव दिगंबरबुवा यांनीं केलेली भैरवबुवांची आरती:—**

ज्ञानसागर स्वामी जयजय गुरुमूर्ति ।
अनन्यभावें तुजला ओंवाळूं आरति ॥ ध्रु० ॥
ब्रह्मानंदें डोले हरिकीर्तनरंगीं ।

शांतिदांति विरक्ति शोभे सर्वांगीं ॥
चिन्मय व्यापकप्रकाश सच्चित्सुख भोगी ।
भाविक जनउद्धारक तो राजयोगी ॥ १ ॥
चिद्घन नीरासृत हे अपरूप काया ।
सगुण धारण करुनी करि करुणाछाया ॥
आत्मज्ञान बोधुनि पाववि निजठाया ।
सप्रेमें **दिगंबर** वंदितसे पायां ॥ २ ॥

हे दिगंबरबुवा कीर्तन करून द्रव्य मिळवीत असत, त्याबद्दल कांहीं लोकांनीं त्यांस दोष दिल्यावरून त्या लोकांच्या समजुतीसाठीं बुवांनीं तुकारामाचा पुढील अभंग उपयोगांत आणला होता, असें वाटतें. कारण हा अभंग त्यांनीं लिहिलेल्या वहीच्या शेवटीं मुद्दाम उतरून घेतलेला दिसतोः—

घेऊनियां धन । सुख करावें कीर्तन ॥ १ ॥
लावूं नये व्याजीं । विनय संताचे समाजीं ॥ २ ॥
संतर्पणें पुण्यतिथी । ...... आलिया अतिथी ॥ ३ ॥
तुका म्हणे ...... । ...... नारायणीं ॥ ४ ॥

तुकारामबुवांच्या साडेचार हजार अभंगांच्या गाथ्यांत हा अभंग सांपडत नाहीं; उलट कीर्तन करून द्रव्य मिळविणारांचा निषेध करणारा पुढील अभंग आढळतोः—

जेथें कीर्तन करावें । तेथें अन्न न सेवावें ॥ १ ॥
तट्टावृषभासी दाणा । तृण मागूं नये कोणा ॥ २ ॥
बुका लावूं नये भाळा । माळ घालूं नये गळां ॥ ३ ॥
तुका म्हणे द्रव्य घेती । देती तेही नरका जाती ॥ ४ ॥

---

# जीवन्मुक्तशिष्य काशीनाथस्वामि.

ह्या कवीसंबंधानें जी माहिती उपलब्ध आहे, ती इतकी थोडी आहे कीं, तिचा समावेश प्रकृत ग्रंथांत करावा कीं नाहीं, याच विचारांत मी होतों. परंतु कवीसंबंधानें विशेष विस्तृत माहिती मिळण्याचा संभव प्रस्तुत फार कमी आहे, अशी खात्री झाल्यामुळें, तूर्त उपलब्ध झालेल्या माहितीवरच ह्या कवीच्या ऋणांतून मुक्त होण्याचें मीं योजिलें आहे.

सुमारें ८५ वर्षांपूर्वी कारवार जिल्ह्यांत जीवन्मुक्त या नांवाचे एक मोठे साक्षात्कारी पुरुष होऊन गेले, त्यांचे शिष्य हे काशीनाथस्वामी होत. हे जातीनें ब्राह्मण होते. हे मोठे भगवद्भक्त असून वेदांतशास्त्रांत फार निष्णात होते, अशी त्यांची प्रख्याति आहे. कारवार जिल्ह्यांतील लोक ह्यांस फार भजत असत. काशीनाथस्वामीचा एकच ग्रंथ प्रसिद्ध असून तो इ. स. १८८७ सालीं छापून निघाला. हा ग्रंथ म्हटला म्हणजे ' जीवन्मुक्ती भगवद्गीता ' हा होय. काशीनाथस्वामींनीं हा ग्रंथ आपले गुरु जीवन्मुक्त यांच्या नांवानें रचिला असून, त्यांत त्यांची उत्कट गुरुभक्ति व निरभिमानीपणा हे दोन गुण स्पष्टपणें व्यक्त होतात.

ही ' जीवन्मुक्ती गीता ' म्हणजे श्रीमद्भगवद्गीतेवरील प्राकृत टीका असून, तिची एकंदर पद्यसंख्या १६२२ आहे. ही टीका लिहितांना ग्रंथकारानें ज्ञानेश्वरीचा पुष्कळ ठिकाणीं उपयोग केलेला आढळतो. गीतेंतील प्रत्येक श्लोकाचा मराठी भावार्थ एका श्लोकांत सांगून, नंतर तो भावार्थ अभंग, पद किंवा दिंडी या वृत्तांत विशेष विशद करून दाखविला आहे. तेराव्या व पंधराव्या अध्यायांत थोडा ज्यास्त विस्तार केला आहे. काशीनाथस्वामीची

वाणी फारच गोड, अगदीं सुलभ आणि भक्तिपूर्ण अशी असून, तींत विद्वत्तेपेक्षां प्रेमाचा ओलावा अधिक दिसतो. हा ग्रंथ प्रसिद्ध झाल्यास आज सुमारें २२ वर्षें झालीं, पण इतक्या वेळांत त्याचा म्हणण्यासारखा प्रसार झाला नाहीं, ही खेदाची गोष्ट होय. भगवद्गीतेंतील विशेष प्रसिद्ध अशा कांहीं श्लोकांवरील काशीनाथस्वामीची मराठी टीका पुढें दिली आहे, ती वाचून, काशीनाथस्वामीच्या कवित्वसंबंधानें वर जें विधान केलें आहे, त्याची सत्यता वाचकांच्या अनुभवास येईल, असें वाटतें.

### गीतास्तवन श्लोक.

श्रुतिसरोजदळीं मकरंदू। देवकीतनय कृष्णप्रबंधू ॥
संत जे भ्रमर सेविति बुद्धि। पूर्ण कृष्ण नर तेचि त्रिशुद्धी ॥ १ ॥
मोहार्णवीं जीव बुडोनि गेले। शोकानळें भस्म जळोनि झाले ॥
त्यांलागुनी अमृतरूप गीता। वंदीन मी तारक दिव्य माता ॥ २ ॥

### अध्याय २, मंगलाचरण श्लोक.

रमेश जो सर्व भुतांसि पाळिता। जो योगियांचा भवशोक जाळिता ॥
कृपावलोकें जडभेद गाळिता। तो सद्गुरू वंदिन कृष्ण तत्वता ॥ १ ॥
शोकाग्नि हा पार्थगिरीस लागला। करील हा शीतल मेघ सांवळा ॥
वर्तोनियां सांख्य सुयोगजीवनें। सांगेल चिह्नें मुनिचीं विचक्षणें ॥ २ ॥

### श्लोक (संस्कृत.)

क्लैब्यं मास्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते।
क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ॥

### टीका (श्लोक)

पावूं नको षंढपणासि पार्था। हें योग्य नोहे तुज बुद्धिवंता ॥
हे क्षुद्र गा दुर्बलता मनाची। परंतपा ऊठ त्यजूनि साची ॥

### पद (अर्जुना तूं जाण रे० या चा०)

अर्जुना तूं पाहीं रे। करणें करिसी काय रे।

संग्रामीं टाकणें शस्त्र । उचित तुज नोहे रे ॥ ध्रु० ॥
वीरांमाजी श्रेष्ठ रे । परम बळिष्ठ रे ।
उभय सेनेमाजी रडसी । हांसती वरिष्ठ रे ॥ १ ॥
क्षत्रियांसी जाण रे । युद्ध हें निर्वाण रे ।
सर्व सौख्यदायक म्हणुनी । बोलती सज्ञान रे ॥ २ ॥
होवोनियां धीर रे । स्वधर्मीं तत्पर रे ।
वर्ततां पावसी जीवन्मुक्तत्व साचार रे ॥ ३ ॥

## श्लोक ( संस्कृत. )

अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ।
गतासूनगतासूंश्च नानुशोचंति पंडिताः ॥

## टीका ( श्लोक )

अशोच्य भीष्मादिक यांसि शोचिसी ।
तूं ज्ञानियांचे परि बोल बोलसी ॥
गतस्थित प्राण जिवांसि देखुनी ।
न शोचिती पंडित जाण या जनीं ॥

## पद ( दिंडीची चाल. )

भीष्मादीक नित्यात्मरूप सर्व । यांचा शोक करितोसि हें अपूर्व ॥ १ ॥
आत्मवेत्ते जे संत बुद्धिवंत । झाल्या मेल्यांचा शोक न वाहात ॥ ध्रु० ॥
प्रज्ञावादातें बहु बोलतोसी । क्रिया पाहतां तूं मूर्ख दीसतोसी ॥ २ ॥
देहसाक्षी तो ब्रह्म पूर्ण आहे । मायामय साकार मृषा पाहे ॥ ३ ॥
जीवन्मुक्त ते पूर्ण सुखी झाले । द्वैतभावासी विसरोनि ठेले ॥ ४ ॥

## संस्कृत ( श्लोक )

न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः ।
अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ॥

## टीका ( श्लोक )

आत्मा न जन्मे न मरे असे सदा । पूर्वीं न झाला नुपजे पुन्हा कदा ॥
पुराण हा नित्य अनादि अव्यय । अनित्य देहीं वसतां नसे क्षय ॥

## अभंग.

आत्मा मुळीं पार्था जन्मलाचा नाहीं । मरण कैंचें कांहीं तयालागीं ॥ १ ॥
नित्य हा सविकार नाशवंत देहीं । सर्वथैव पाहीं न पवे नाश ॥ २ ॥
पूर्वी हा न झाला पुढें होणें नाहीं । संचलासे पाहीं जैसा तैसा ॥ ३ ॥
वृद्धिक्षयातीत सत्य सनातन । कोणे काळीं जाण पालटेना ॥ ४ ॥
षड्भाव विकारविहीन अनंत । **जीवन्मुक्त** संत ओळखती ॥ ५ ॥

## संस्कृत ( श्लोक )

यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके ।
तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ॥

## टीका ( श्लोक )

पृथ्वीवरी हें जल पूर्ण व्यापिलें । तें घेइजे काय असेल तेतुलें ॥
तैसेंचि वेदीं बहु जाण बोलिलें । विवेकिये सेविति सार चांगलें ॥

## अभंग.

उदकमय झालें जरी महीतळ । घेईजे तें जळ अर्तीजोगें ॥ १ ॥
तैसा वेद सर्व उपाय बोलिला । अधिकार मानला तोचि कीजे ॥ ध्रु० ॥
सूर्याचेनी उदयें बहु मार्ग दीसती । परि कार्यपंथीं चालिजे गा ॥ २ ॥
लाधलिया ज्ञान, वेदोक्तसाधनें । केलीं सर्व तेणें निश्चयेंसी ॥ ३ ॥
**जीवन्मुक्त** ज्ञानी निजबोध सेवुनी । कृतकृत्य होउनी सुखी ठेले ॥ ४ ॥

## श्लोक ( संस्कृत )

नच मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम् ।
भूतभृन्नच भूतस्थो ममात्मा भूतभावनः ॥

## टीका ( श्लोक )

ही भूतसृष्टि मजमाजि कधींच नाहीं ।
ऐश्वर्ययोग अमुचा दृढ हाचि पाहीं ॥
भूतीं कदापि न वसे परि भूतधर्ता ।
मी सर्व भूतस्वरुपीं परि भूतकर्ता ॥

## पद ( दिंडी )

मजमाजि निश्चयें जग नाहीं । एक मीची अद्वयब्रह्म पाहीं ॥ १ ॥
अर्जुना हा ऐश्वर्य योग माझा । घेईं याचा अनुभव भक्तराजा ॥ ध्रु० ॥
भुतांमाजी राहतां भूतधर्ता । स्वप्नतुल्य हे समूळ जाण वार्ता ॥ २ ॥
वंध्यापुत्राचे परी विश्व सर्व । कर्ता-हर्ता मी नव्हें सर्वथैव ॥ ३ ॥
व्याप्यव्यापक भाव शून्य जेथें । जीवन्मुक्तपण हें वाव तेथें ॥ ४ ॥

## संस्कृत ( श्लोक )

अनन्याश्चितयंतो मां ये जनः पर्युपासते ।
तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥

## टीका ( श्लोक )

अनन्यभावें मज चिंतिताती । जे अर्जुना लोक उपासिताती ॥
त्या नित्ययुक्तां दृढ योगियांचा । मी रक्षितों योग, बुझें त्रिवाचा ॥

## पद ( दिंडी )

सांडुनियां वासना विषयांची । टाकुनियां संगती मीपणाची ॥ १ ॥
सर्वभावें चिंतिती मज पाहीं । नेणती ते मजवीण अन्य कांहीं ॥ ध्रु० ॥
माझ्या ठायीं सर्वदा विनटले । देशकाळासी विसरोनि गेले ॥ २ ॥
देऊनियां निजबोध पूर्ण त्यांसी । रक्षितों मी अर्जुना अहर्निशीं ॥ ३ ॥
जीवन्मुक्तपदींच दृढ ठेवीं । पडों नेदीं तयांसि भवगोवी ॥ ४ ॥

## शेवटचा श्लोक.

श्रीकृष्ण योगेश्वर जेथ आहे । धनुर्धरू अर्जुन जेथ पाहे ॥
तेथोंचि लक्ष्मी विजयाभिवृद्धी । मद्‌बुद्धिचा निश्चय हा त्रिशुद्धी ॥

एकंदरींत ही टीका ज्ञानेश्वरीचीच अर्थवाहिनी आहे, तरी कीर्तनांत व गायनांत श्रीमद्भगवद्गीतेंतील ज्ञानोपदेशाचा प्रसार करण्याच्या कामीं ती अत्यंत उपयुक्त आहे, यांत संशय नाहीं.

---

# पांडुरंग केशव दाढी.

हा कवि सुमारें १०० वर्षांपूर्वी नागपुर येथें होऊन गेला. या कवीचें जन्म नागपुर येथेंच झालें व त्याचे वंशजही हल्लीं तेथेंच राहतात. विठ्ठल दाढींचे चिरंजीव केशव दाढी व त्यांचे पुत्र हे पांडुरंग दाढी होत. ह्यांचें गोत्र भारद्वाज; कुलदेव जेजुरीचा खंडोबा. पांडुरंग दाढी यांनीं लिहिलेला एकच ग्रंथ हल्लीं उपलब्ध झाला आहे, तो ओंवीबद्ध अद्भुतरामायण हा होय. हा ग्रंथ अमरावती ऊर्फ उमरेड गांवीं, शके १७४७ श्रावण मास, भृगुवारीं एकादशीस समाप्त झाला. संस्कृतांतील अद्भुतरामायणाची कथा ह्या ग्रंथांत संक्षेपानें सांगितली आहे. ग्रंथांचे अध्याय १४ व ओंव्या २११६ आहेत; मधून मधून कांहीं दिंड्याही आढळतात. प्रस्तुत ग्रंथाची मला मिळालेली प्रत ‘ मल्हारराव नारायण ’ नामक कोणी मराठा गृहस्थानें लिहिलेली असून ती अगदीं अशुद्ध आहे. ह्या प्रतींत ‘ ण ’ च्या जागीं सर्वत्र ‘ न ’ वापरला आहे व त्यामुळें कित्येक ओंव्या सरळपणें वाचतां येत नाहींत. अद्भुत रामायणाशिवाय दुसरे कांहीं ग्रंथ कवीनें लिहिले आहेत कीं काय, यासंबंधाची माहिती मिळाली नाहीं. कवीचा जन्ममृत्युकाळ, चरित्र, गुरुपरंपरा इत्यादि हकीकत नागपुराकडील शोधकांनीं शोध केल्यास मिळण्यासारखी आहे.

पांडुरंग कवीची विद्वत्ता मोठी होती असें दिसत नाहीं; तरी त्यास संस्कृत भाषेचें साधारण ज्ञान असावें असें वाटतें. त्याची कविता साधी, गोड आणि भक्तिपूर्ण आहे. पांडुरंग दाढी यांची काव्यरचनेकडे प्रवृत्ति होण्यास काय कारण झालें, हें त्यांच्याच पुढील ओंव्यावरून लक्ष्यांत येईल:—

मी तों केवळ अनाथ दीन । कृपण आळशी सदा मळिन ।
स्थिर नव्हेचि अंतःकरण । बोध कदापि हृदयीं न वसे ॥ ४७ ॥
ममहृदयीं सदैव कामाग्नी । विचार तेणें जाय जळोनी ।
मग भक्तिरहस्य ये कोठोनी । सहजचि आचार नष्ट जाला ॥ ४८॥
कारण जें मन नाहीं स्थिर । विश्वास नसे मजला तिळभर ।
वायूपेक्षां वेग फार । दाही दिशा मन धुंडाळी ॥ ४९॥
पढतमूर्ख यासी म्हणती । तोचि मी जाणावा निश्चितीं ।
कळोनि सर्वही पडे भ्रांती । हेचि खंती माझिया जिवा ॥ ५०॥
तरि आतां एक ऐन । यांतोन घेतलें निवडोन ।
देहप्रारब्धीं असेल जाण । तैसेंच कारण येवो घडोनी ॥ ५१ ॥
यांतील मुख्यार्थ माझे हृदयीं । सुक्त असूक्त घडो या देहीं ।
तितुकें कृष्णार्पण सर्वही । अहंकर्ता कोण म्हणतो ? ॥ ५२ ॥

ह्या ओंव्यांवरून कवीची ग्रंथरचनाकालीन मनःस्थिति व त्याची शालीनता हीं स्पष्टपणें दिसून येतात. चंचल व संशयी मनास विषयसुखापासून परावृत्त करण्यास रामगुणवर्णनासारखें रामबाण औषध दुसरें नाहीं, ह्या निश्चयानेंच पांडुरंग दाढी यांनीं अद्भुतरामायण लिहिलें. ग्रंथारंभीं कांहीं मराठी कवींस पांडुरंग दाढी यांनीं वंदन केलें आहे. त्या ओंव्या येणेंप्रमाणें:—

आतां जे कलींत झाले संत । त्यांसी मी शरणागत ।
ज्ञानदेव निवृत्तिनाथ । एकनाथ जो कां सद्गुरु ॥ ३० ॥
वामनकवि महापंडित । श्लोकपदरचना अत्यद्भुत ।
वेदांत उपनिषदादि यथार्थ । गीतार्थ ज्यांनीं मुखें कथिला ॥ ३१ ॥
त्या ग्रंथाचें नांव आइका । म्हणती जन यथार्थदीपिका ।
अष्टादश गीतेची टीका । ज्या महाराजें वर्णियेली ॥ ३२ ॥
असो; तुका तो राम जाणा । धन्य तयाची अभंगरचना ।
तोषवूनि वैकुंठराणा । आपलासा केला जेणें ॥ ३३ ॥
रामदास तो सदा उदास । मारुती अवतार तो निर्दोष ।

चोखामेळा सावंता दास । अति उल्हास हरिभजनीं ॥ ३४ ॥

× × × ×

हरिविजय पांडवप्रताप । हे वर्णिले जयांनीं एकरूप ।
तो श्रीधर वंदूनि श्रीधररूप । भिन्नभाव तेथें नसे ॥ ३७ ॥
मुक्तेश्वर नित्योत्तम । ज्यांनीं भारत वर्णिलें उत्तम ।
महिपति तो वास्तव्यधाम । अवतारखंडीं राहतसे ॥ ३८ ॥
पंतांमाजी मयोरपंत । ज्याचे आर्येचा नकळे अर्थ ।
भागवत भारतावरी यथार्थ । पदरचना ते न वर्णवे ॥ ३९ ॥

ह्या ओंव्यांवरून, वामनपंडित, श्रीधर, मोरोपंत इत्यादिकांची थोडीबहुत कविता पांडुरंग दाढी यांनीं वाचली होती, असें दिसतें. हा अद्भुतरामायण ग्रंथ शके १७४७ त लिहून झाला; त्यावेळीं महिपति व मोरोपंत यांचा काल होऊन अनुक्रमें ३५ व ३९ वर्षें झालीं होतीं; तरी इतक्या थोड्या मुदतींत त्यांचे ग्रंथ ताहराबाद आणि बारामती येथून वऱ्हाड आणि मध्यप्रांतापर्यंत जाऊन पोंचले होते ! मोरोपंतांची आर्या समजण्यास कठीण, हा समज हल्लींप्रमाणें तेंव्हांही अस्तित्वांत होता, हें पांडुरंग दाढींच्या 'ज्याचे आर्येचा न कळे अर्थ' या वाक्यावरून उघड होतें. महीपति तो वास्तव्यधाम । अवतारखंडीं राहतसे' असें कवि म्हणतात; पण हें 'अवतारखंड' कोणतें? ताहराबाद गांवाचें मूळचें नांव 'अवतारखंड' असेल तर कोण जाणे ! मुक्तेश्वरांनीं 'उत्तम भारत' वर्णिल्याचा उल्लेख कवीनें केला आहे. कवीस हिंदी भाषेचाही बराच परिचय असावा, असें पुढील ओंव्यांवरून वाटतें:—

तुळसीदास कवीची वाणी । दोहरा गोड अमृताहुनी ।
रसिकप्रिया ग्रंथ ऐकतां श्रवणीं । केसोदास कवीनें कथिला ॥
आणिक उत्तरादि भाषागत । गिरिधर कवि महाविख्यात ।
कुंडरिया दोहा पाहतां अर्थ । गति न चाले हो इतरांची ॥

उत्तरादि भाषा सुंदर । सत्सया ग्रंथ म्हणती चतुर ।
करिता ब्याहारीलाल कवीश्वर । प्रीतिभावें नमियेला जी ॥

कवीनें आपलें कुलदैवत जेजुरीचा खंडोबा याची व तुळजापुरच्या भवानीची ग्रंथारंभीं स्तुति केली आहे. सकल संतांस अनुलक्षून कवि म्हणतात:—

सकळ संतांस माझी विनवणी । तुमचें मन मृदु नवनीताहुनी ।
तरी अभय मस्तकीं ठेवोनि पाणी । द्यावी कवनीं स्फूर्ति मातें ॥
तुम्हीं संत कीं अति उदार । कृपा करा मज रंकावर ।
तुमचे पदाब्जीं होवोनि भ्रमर । वासना निरंतर मम पुरावी ॥
× × × × ×
जैसें बाळ मातेसि छळित । तरी शीण नयेचि तिचे मनांत ।
तैसीच माउली आमुची संत । आळ पुरवावी माझी तुम्ही ॥
सुचला मनांत एक विचार । कीं अद्भुत रामायणाचें सार ।
तें वर्णावें यथामति परिकर । अभय कर ठेवा शिरीं ॥

आपल्यापूर्वी होऊन गेलेल्या कवींचे ग्रंथ वाचून, त्यांच्यासंबंधानें पूज्यबुद्धि धारण करून व आरंभीं स्फूर्तीसाठीं त्यांची करुणा भाकून मग ग्रंथरचनेस प्रारंभ करण्याची आमच्या जुन्या मराठी कवींची ही पद्धत अत्यंत प्रशंसनीय होय; व यामुळेंच त्यांची कविता वाचण्याकडे मनाची सहज प्रवृत्ति होते. स्वतःसंबंधानें अत्यंत शालीनता व इतरांसंबंधानें अत्यंत पूज्यबुद्धि ग्रंथारंभींच प्रकट केलेली पाहून, वाचकांच्या मनांत कवीसंबंधानें जो सहजच पूज्यभाव उत्पन्न होतो, तो स्वतःसंबंधाचे गर्वोद्गार व प्राक्कालीन कविजनासंबंधानें तुच्छता हीं प्रगट झालेलीं पाहून कधींही उत्पन्न होणार नाहीं. असो.

कवीस वेदांतशास्त्राचा परिचय असून, त्यांतील गूढ तत्वें बरोबर न समजल्यामुळें त्याच्या मनांत जें विचारांचें काहूर उठलें होतें, त्याचें प्रदर्शन पुढील ओंव्यांत झालें आहे. कवी देवास म्हणतो:—

कर्ता करविता तूंचि एक । भोक्ता भोगविता नसे आणिक ।
नांव ठेविलें पांडुरंग देख । हेंही आणिलें त्वांचि रूपा ॥ ५६ ॥
मीपण म्हणतां या सोडून । तरी शब्द हा आणिला कोठून ।
शब्दस्पर्शरूपगंध जाण । घटीं मठीं व्यापुनी तूंचि भरला ॥ ५७ ॥
जिकडे पाहतां अवघा तूंचि तूं । तेथें असे काय जी मीं तूं ।
अभिमान सोडी यथार्थ हातु । मिथ्या अमिथ्या सर्व मृगजळ ॥ ५८ ॥
मीपण शब्द म्हणतां कोण । मीपण शब्द हा होय कोण ।
सोडिलें ज्ञानें तो पुरुष कोण । ऐसें निवडोन दावा स्वामी ॥ ५९ ॥
ममहृदयीं नयें विश्वास । हें तों बोलणें सर्व आभास ।
जैसें नांव अनेक पक्षार्थास । परि मुख्यार्थ नांव एकाचि असे ॥ ६० ॥
तंतू एक पट अनेक । तैसा तूंचि तूं जगव्यापक ।
तुम्ही म्हणतां भोगिजे नरक । तरी नरकरूप कोण असे ॥ ६१ ॥
तुम्ही सर्वव्यापक असोनीही । ऐसी श्रुति बोलती पाहीं ।
तरी नरकीं जाणार नरकरूपी ही । कोणता देवा असे तो जी ॥ ६२ ॥

अध्याय १ ला.

अद्भुतरामायणाची कथा वाल्मीकांनीं भारद्वाज ऋषींस सांगितली आहे. ती संक्षेपानें १४ अध्यायांत पांडुरंग दादी यांनीं वर्णिली आहे. ह्या ग्रंथांतील कांहीं उतारे पुढें दिले आहेत.

अंबरीष राजाच्या राज्याचें वर्णन:—

नगररचना इंद्रभुवन । टाकावें वरी ओवाळून ।
घरोघरीं हरिकीर्तन । पुराणश्रवण नित्यशा ॥ १२ ॥
अग्निहोत्रादि स्मार्त पाहीं । वेद-उपनिषद सर्वदाही ।
संतचर्चा हो नित्यशाही । ऐशी नवाई त्या ग्रामीं ॥ १३ ॥
यथाकाळीं वर्षे घन । त्रिकाळ धेनु दुभती जाण ।
करभार देती रामालागुन । परराष्ट्राचे अधिकारी ॥ १४ ॥
दैन्य नसेचि तया ग्रामीं । सदा शुचिर्भूत अंतर्यामीं ।
जरा मृत्यु नाहीं आश्रमीं । तया अयोध्या नगरांत ॥ १५ ॥

घरोघरीं कल्पतरुवर । आणिक कामधेनूचे खिल्लार ।
चिंतामणीचीं गोपुरें सुंदर । लखलखीत सर्वदाही ॥ १६ ॥

आपली आर्ष वाणी श्रीरामकथावर्णनानें श्रोत्यांच्या आदरास पात्र झाली, त्यासंबंधानें कवि म्हणतात:—

अयोध्याधीशा ताटिकांतका । मखरक्षका विश्वव्यापका ।
जयजय मायाचक्रचाळका । बोलवीं कथा रसाळ पैं ॥ ४७ ॥
कागदाचें मोल किंचित् । परी राजमुद्रा वरी विराजित ।
तो कागद वंद्य सर्व राष्ट्रांत । सहजाचि मानव वंदिती ॥ ४८ ॥
तैसा तवनामशिक्का जया शिरीं । तो वंद्य त्रिभुवनामाझारीं ।
तवनामकथा उदधि भरी । तेथें टिटवीचंचू घे नीर ॥ ४९ ॥
तैसी माझी बोबडी वाणी । प्रीतीं वंदिला कोदंडपाणी ।
**पांडुरंग** विनवी कर जोडोनी । माझी विनवणी परिसा तुम्हीं ॥ ५० ॥
अभंगीं नांव घातलें तुवां । पूर्णकर्ता तूं सीताधवा ।
उत्तरकांड आरंभिलें देवा । सिद्धी नेईं निजांगें ॥ ५१ ॥

अंबरीष राजाची कन्या श्रीमती हिला मागणी घालतांना पर्वत ऋषि म्हणतात :—

पर्वत म्हणे ' गा पृथ्वीपती । श्रीमती द्यावी आम्हांप्रती ।
गृहस्थाश्रमाचें सौख्य जगतीं । भोगावें मनांत हे इच्छा ॥ ९ ॥
तूं तरी उदारांचा राणा । मजला वोपीं कन्यानिधाना ।
व्यर्थ जीवित्व गेलें जाणा । तप आचरितां चिरकाळ हो ॥ १० ॥
शरीर काष्ठवत् झालें पाहीं । ब्रह्मचर्यांत सौख्य नाहीं ।
वृथा जन्म आमुचा सर्वही । तरी तूं पावन करीं मजला ॥ ११ ॥

त्याच कन्येस वरण्याचा नारदमुनीचाही विचार असल्यामुळें, त्यांनींही तिला मागणी घातली होती, पण पर्वत ऋषींची अडचण मध्यें आली, ती दूर करण्यासाठीं नारद विष्णूकडे जाऊन त्यांस म्हणतात :—

अयोध्यापतीचें कन्यारत्न । उमाचि अवतरली चिद्रत्न ।
रती जीचे अंगुष्ठावरून । वोवाळोनि टाकावी ॥ १७॥
तरी मनांत वाटतें गृहस्थाश्रम । सर्वांत श्रेष्ठ आहे उत्तम ।
तो संपादावा हाचि नेम । माझा असे दीनवत्सला ॥ १८॥
परी विघ्न करितो मुनि पर्वत । मी तों केवळ तवअंकित ।
लग्न व्हावें हा हेतु मनांत । पूर्ण करितां तूंचि एक ॥ १९॥
पर्वत वैरी झाला मज । त्यानें मांडिलें विंदान सहज ।
तरी तूं महाराज अधोक्षज । तयाचें तोंड काळें करी ॥ २०॥
उदयिक राजगृहीं स्वयंवर । मांडिलें रायानें अतिसत्वर ।
तरी मी सांगतों एक विचार । तैसें करीं गा जगदात्मया ॥ २१॥
नीळवर्ण असती मर्कट । तोंड काळें अति दुर्घट ।
नासिक चपटें नेत्र पिंगट । पर्वतमुख ऐसें करीं ॥ २२ ॥
आम्हीं उदईक दोघेजण । राजसदनीं जाऊं मिळून ।
तरी श्रीमतीलागीं कृष्णवर्ण । मुख दिसावें पर्वतांचें ॥ २३॥
श्रीमतीवांचून आणिक कोणा । मुख न दिसावें इतरां जनां ।
हेचि माझी असे जी प्रार्थना । वारंवार विनवीतसें ॥ २४॥

ही नारदमुनीची विनंति भगवंतांनीं मान्य केल्यावर नारद निघून गेले, तोंच पर्वतऋषि श्रीविष्णूपाशीं येऊन म्हणतातः—

'... जयजयाजी कमळावरा । वससी भक्तजनहृदयमंदिरा ।
क्षीराब्धिवासा करुणाकरा । नारदें माझी हानि केली ॥ ३०॥
अंबरिषाची कन्या श्रीमती । अतिसौंदर्य रूपवंती ।
गृहस्थाश्रमीं माझी प्रीति । विवाह तिशीं करावा ॥ ३१ ॥
नारद परम कपटी केवळ । माझे लग्नांत पाडी विस्कळ ।
संसारीं पाणी घालितो खळ । करी निर्मूळ तोचि देखा ॥ ३२ ॥
माझ्या प्रपंचाला तीन वाटा । त्यानेंच केला हा चपेटा ।
मुदलांत पाडिला काय तोटा । ऐसा गोटा टाकितो जी ॥ ३३ ॥
म्या धूम्रपानादि तीर्थाटन । आचरलों ब्रह्मचर्यतप दारुण ।
जन्मादारभ्य रतिसौख्य जाण । नाहींच पाहिलें दयार्णवा ॥ ३४ ॥

मनांत वाटे फार उल्हास । कीं श्रीमती वरावी जी निर्दोष ।
चंपककळिका राजहंस । गति चालत तयापरी ॥ ३५ ॥
तेचि अंतुरी व्हावी चित्तीं । परी नारद करितो कुमती ।
यास्तव मनांत वाटते खंती । तरी मी युक्ति सांगेन तुम्हांतें ॥ ३६ ॥
रिसाचें मुख करावें त्याचें । नेत्रांगार लंबोष्ठ साचे ।
अमंगळ भयंकर हो वाचे । बोलतां दुर्गंधी चालावी ॥ ३७ ॥
प्रत्यक्ष जैसा बसला आस्वल । घ्राणपुटींतुनि गळे सलील ।
भ्यासुर वदन खडतर गाल । श्रीमती पाहतां न वरी त्यासी ॥ ३८ ॥
नारदाचें मुख ऐशापरी । करावें दयाळा आतां लवकरी ।
श्रीमतीवांचोनियां इतर नारी । त्यांसी पूर्ववत् दिसावें हो ॥ ३९ ॥
कन्यकेसी दिसावें नयनीं । कीं रीसचि बैसला येवोनी ।
इतरां नृपवरांलागोनी । चांगलें मुख दिसावें हो ॥ ४० ॥

दुसरे दिवशीं नारद व पर्वत हे दोनेही राजसभेस गेल्यावर तेथें जो प्रकार घडला तो येणेंप्रमाणें:—

दुसरे दिवशीं अरुणोदयीं । पर्वत निघाला लवलाहीं ।
येवोनि सत्वर राजगृहीं । तंव नारद तोही तेथें आला ॥ ४४ ॥
सभा घनवटली अति सघन । मंडप घातला लंबायमान ।
जडित पाचूचे स्तंभ जाण । तुळवट वरी हिरियांचे ॥ ४५ ॥
रंग रेखिला चित्रविचित्र । रांवे साळ्या कळासूत्र ।
मयोर शब्द करिताति पवित्र । मुक्त झालरा अति शोभती ॥ ४६ ॥
कर्दळीमंडप विराजती । कारंजे सहस्रावधि उडती ।
त्या कार्यांची विचित्र गती । उणें आणिती मयसभेतें ॥ ४७ ॥
सुनीळ गाभ्यांपरी चौक । हजारे फवारे त्यांत बदक ।
मीन कांसवें दिसती अधिक । हिंडताती सैरावैरा ॥ ४८ ॥
कंदील हिरवे शामदान्या । कोंदणीं जडल्या हिरकण्या ।
चकित पाहताती नागकन्या । लाजोनि जाती एकीकडे ॥ ४९ ॥
रंभा उर्वशी मेनिकायापरी । वेश्या तैशा नृत्यकारी ।
मालकंसादि कळाकुसरी । आलाप करिती मधुरस्वरें ॥ ५० ॥

देशोदेशींचे येती नृपवर । मंडपघसणी होतसे फार ।
राजा जोडोनि दोन्ही कर । अभ्युत्थाना देतसे ॥ ६१ ॥
मुख्य त्या सभास्थानीं मुनि । बैसले आदरेंकरोनी ।
नारद-पर्वत अंतःकरणीं । वाहती चिंता सर्वकाळ ॥ ५२ ॥
मनांत म्हणती हे नोवरी । कोणास प्राप्त हें नकळे जरी ।
तंव ते शृंगारोनि सुंदरी । येतसे चमकत गतीनें ॥ ५३ ॥
सवें सख्या अति सुंदर । नक्षत्रीं वेष्टिला रोहिणीवर ।
मंद चालतो गजभार । तैशा येती नृपांपाशीं ॥ ५४ ॥
ताटकें हेममय श्रवणीं । कुरंगनयना दुजी मोहनी ।
अहीसमान कुंतळवेणी । पृष्ठभागीं देत शोभा ॥ ५५ ॥
निढळीं सौभाग्य बिजवरा । नेत्रीं अंजन सोगीय थारा । (?)
तिळ हनुवटीवरी विचारा । तीळ तो शोभे गालावरी ॥ ५६॥
गळां रुळती मुक्ताहार । पाचूचें पदक अतिसुंदर ।
कंचुकी लेइली मनोहर । गुप्त त्यांत असती द्वयमणी ॥ ५७ ॥
दिव्यांबर चिर कसोनि कटीं । मृगेंद्र पाहतां लज्जित पोटीं ।
म्हणे धन्य हा माज मावे मुष्टीं । ऐसी सृष्टि न देखों पुढें ॥ ५८ ॥
पाउलें बालार्कपरी दिसती । ठेवितां पद्मराग निपजती ।
चालतां पोल्हार झणत्कारती । घोळगुजऱ्यांचा नाद उठे ॥ ५९॥
ते आदिमाया विश्वजननी । कोण वर्णू शके तिजला मेदिनीं ।
यथामति हे आरुष वाणी । यथा किंचित् वानिलें ॥ ६०॥
ऐशापरी हो राजकुमरी । रत्नमालिका घेवोन स्वकरीं ।
राजा ऋषींचें पूजन करी । मनोभावें तेधवां ॥ ६३ ॥
पिता म्हणे वो गुणसरिते । मृगनेत्रे लावण्यभरिते ।
या दोघांतून आवडे तूतें । तयाचे गळां घालिं माळ ॥ ६५ ॥
अवलोकोनि बोले अबळा । तंव ते हासोनि बोले सुशीळा ।
रीस मर्कट दिसतो डोळां । काय नृपाळा वरूं यातें ॥ ६६॥
येकाचें मुख रिसाचें केवळ । एकाचें दिसतें गोळांगुळ ।
कृष्णवर्णापरीस अमंगळ। कोठोनि आणिले निवडोनियां ॥ ६७॥

वृद्ध वानर बहुतां दिवसाचें । तैसेंच तोंड दिसतें याचें ।
महा भयानक रीस साचें । तैसेंच दिसतें मुख दुसरियाचें ॥ ६८ ॥
बत्तीस लक्षणी आणिले वर । कां वृथा सांगतां बडिवार ।
अवलोकोनि करा विचार । आणिक एक सांगतों तुम्हां ॥ ६९॥
या दोघांमध्यें एक पुरुष । दिसतो मजला निर्दोष ।
अपेशरहित सदां असे । किरीट कुंडलें मुगुट शिरीं ॥ ७०॥
आकर्णनेत्र नीळजीमुत । वर्ण जयाचा लखलखित ।
तेजःपुंज थवथवीत । मंदस्मित हास्य करी ॥ ७१ ॥
शामसुंदर मनोहर । मृगमद भाळीं टिळक परिकर ।
केशरउटी मुक्ताहार । श्रीवत्स शोभे दक्षिणहृदयीं ॥ ७२ ॥
आजानुबाहू दोन्ही सरळ । नखें चंद्रापरी तेजाळ ।
धनुष्य हातीं घेवोनि प्रबळ । बाणभाता पृष्ठीं विलसे ॥ ७३ ॥
कोमळतनु दैदीप्यमान । उदार कीर्तिनें भरिलें त्रिभुवन ।
नेत्रसंकेत दावी दुरोन । विनोदें बोले मजसीं काय ॥ ७४ ॥
हस्तसंकेतें पालवी मजसी । भ्रुसंकेत दावी क्षणोक्षणासी ।
मंदवाणी बोलतो कैसी । मजसीं माळ घालीं म्हणतो ॥ ७५ ॥
गुज गोष्टी पडतां श्रवणीं । टकमकां पाहती उभय मुनी ।
नारद-पर्वत तेव्हां उठोनी । राजया जवळी पातले हो ॥ ७६ ॥
द्विज म्हणती तुमची कुमरी । काय बोलिली हे सुंदरी ।
राजा म्हणे श्रवणद्वारीं । तुम्हीं ऐकिलें असेल कीं हो ॥ ७७ ॥
उभयतीं पुसिलें कन्यकेसी । आम्हां दोघांत कोणती विवसी ।
तरी तूं माळ घालीं त्यासी । पाहूं दृष्टीसी कोण वरी तो ॥ ७८ ॥
अंबरीष म्हणे श्रीमती बाळे । कोण दृष्टीस दिसतें रसाळें ।
तरीं तूं माळ घालीं अबळे । कौतुक सोहळे पाहूं आम्हीं ॥ ७९ ॥
ऐकतां पित्याचें मधुरोत्तर । श्रीमती निघाली सत्वर ।
प्रीतीनें वंदिला श्रीकरधर । कंठीं सुंदर माळ घाली ॥ ८० ॥
तंव तीं गुप्त जाहलीं दोघें । मुनी फिरविती नेत्र रागें ।
सभा तटस्थ जाहली मागें । भिरभिरा पाहती चकितवत् ॥ ८१ ॥
जन म्हणताती नवल जालें । विप्र दीनवदन होवोनि बैसले ।

नृपती म्हणे हें नकळे वाहिलें । कृत्य कवणाचें हें मज समजेना ॥ ८२॥
मग ते ऊर्ध्वपंथें ब्राह्मण । नारद पर्वत दोघे मिळून ।
विष्णूलागीं भेटती जाऊन । गतकथार्थ निरोपिती ॥ ८३ ॥
कोणीं केलें हें कुभांड । आम्हीं श्रमलों उदंड ।
चोरोनि नेलें येवढें धेंड । ऐसी प्रचंड केली करणी ॥ ८४॥
आमुचे श्रमही गेले व्यर्थ । साधिला नाहीं कांहींच अर्थ ।
मुख आमुचें मर्कटवत् । रीसमुख केलें तुम्हीं ॥ ८५ ॥

असो. इतक्या ओंव्यांवरून पांडुरंग दाढीच्या कवितेचें स्वरूप वाचकांच्या लक्ष्यांत येईल असें वाटतें. एकंदरींत, पांडुरंगाची कविता सामान्य प्रतीची आहे; मुक्तेश्वर, श्रीधर किंवा कृष्णदास मुद्गल यांच्या कवितेहून ही कविता खालच्या दर्ज्याची आहे. अद्भुतरामायणावर जुन्या मराठी कवीनें लिहिलेला असा हा एवढाच ओवीबद्ध ग्रंथ असावा, असें वाटतें.

---

## रामचंद्र भोजराव देशपांडे.

हे कवि सुमारें ६० वर्षांपूर्वी दक्षिण महाराष्ट्रांत पाच्छापुर येथें होऊन गेले. बापू गोखले यांच्या लष्करांत राहून स्वराज्यरक्षणासाठीं, यांनीं मोठमोठ्या लढाया मारल्या होत्या. यांचें चरित्र त्यांचे विद्यमान वंशज रा. रा. अप्पाजी कृष्ण देशपांडे यांनीं कृपा करून मजकडे पाठविलें, त्याच्या आधारानें प्रस्तुत लेख लिहिला आहे.

रामचंद्र भोजराव यांचे मूळ पुरुष थबरस हे पूर्वी मोगलाईत बेदर येथें रहात असत. पुढें तेथें बेबंदशाही होऊन, धर्ममार्ग व चरितार्थ चालेना, म्हणून ते मिरजेजवळ म्हैसाळ नामक गांव आहे, तेथें येऊन राहिले. त्या ठिकाणीं कांहीं दिवस घालविल्यावर बेळगांवाजवळ पाच्छापुर येथें त्यांनीं कायमची वस्ती केली.

पाच्छापुर हें गांव मार्कंडेयी नदीतीरीं वसलें असून, सदर्न मराठा रेल्वेचें हल्लीं तें एक स्टेशन आहे. या गांवीं एक जुना भुईकोट किल्ला आहे, तो विजापूरच्या बादशहानें बांधविला असें म्हणतात. असो. थबरस हे पाच्छापुर येथें आल्यावर, त्यांनीं तेथील मुसलमान इनामदार देसायाचे पदरीं कारकुनी पतकरली. पुढें आपल्या अंगच्या शौर्य—धैर्यादि गुणांनीं ते तेथें इतके प्रसिद्धीस आले कीं, विजापुरच्या दरबारांतून पाच्छापुरच्या देशपांडेपणाचें वतन त्यांस मिळालें. थबरस यांजपासून त्यांच्या आठव्या पिढीचे पुरुष रुद्रोपंत यांजपर्यंतची माहिती उपलब्ध नाहीं. रुद्रोपंतांस संतती होईन म्हणून त्यांनीं वैतागानें बाळेकुंद्री येथें पत्नीसह राहून, तेथील श्रीरामेश्वराजवळ घोर तपश्चर्या मांडली. नित्य सूर्योदयीं स्नान करून व आन्हिक आटोपून, श्रीरामेश्वरापुढें एका पायावर उभें राहून, श्रीगुरुचरित्राची पोथी लिहून काढण्यास त्यांनीं प्रारंभ केला. त्यांची पत्नीही नित्य प्रातःकाळीं श्रीअश्वत्थनारायणास प्रदक्षिणा घालीत असे. याप्रमाणें कांहीं काळ गेल्यावर, एके दिवशीं, रुद्रोपंताची स्त्री नित्याप्रमाणें प्रदक्षिणा घालीत असतां, घारीनें एकदम झडप घालून तिचा कुंकवाचा करंडा उचलून नेला. हें दुश्चिन्ह पाहून त्या साध्वीस पराकाष्ठेचें वाईट वाटलें. ती खिन्न मुद्रेनें आपल्या पतिसमीप आली व झालेली गोष्ट तिनें त्यांस सांगितली. नंतर त्या दांपत्यानें तो दिवस व ती रात्र ईश्वरभजनांत घालविली व दुसऱ्या दिवशीं नित्यक्रमाप्रमाणें स्नानादि विधि सारून तीं आपापल्या अनुष्ठानास लागलीं. दोन प्रहरच्या सुमारास घारीनें नेलेला करंडा पुनः आणून रुद्रोपंतांच्या पत्नीपाशीं टाकला. तो पाहून तिला फारच आनंद झाला. ती गोष्ट तिनें तात्काळ रुद्रोपंतांस कळविली. त्याच दिवशीं रात्रीं श्रीरामेश्वरानें त्या

उभयतांच्या स्वप्नांत येऊन सांगितलें कीं 'तुम्ही आपल्या घरीं जा; तुम्हास पुष्कळ संतति व संपत्ति प्राप्त होईल.' याप्रमाणें श्रीचा दृष्टांत झाल्यावर तीं आपल्या गांवीं निघून आलीं.

नंतर कांहीं वर्षांनीं त्यांस दोन पुत्र झाले; त्यांचीं नांवें देवराव व भोजराव अशीं होतीं. दोन्ही मुलांकडून रुद्रोपंतांनीं उत्तमप्रकारें विद्याभ्यास करविला. पुढें त्यांचीं लग्नें झाल्यावर, शके १६९९ (इ. स. १७७७) त भोजराव यांस रामचंद्र नामक पुत्र झाला, तोच प्रस्तुत चरित्राचा नायक होय.

रामचंद्रराव बालपणीं फार द्वाड व खोडकर होते. प्रत्येक दिवशीं त्यांच्यासंबंधानें कांहीं तरी कागाळी त्यांच्या घरीं येत असे. पुढें त्यांचे वयाचे पांचवे वर्षीं त्यांचा उपनयनविधि झाल्यावर भोजरावांनीं त्यांस थोडेंसें व्यवहारशिक्षण व धर्मशिक्षण दिलें. नारायणशास्त्री चंद्रगडकर व गोपालाचार्य कट्टी यांजपाशीं त्यांनीं संस्कृताचा अभ्यास घरींच केला. त्यांचा संस्कृत भाषेचा अभ्यास चांगला असून, त्या भाषेंत व मराठींत कविता करण्याचा नाद त्यांना बाळपणापासूनच होता. त्यांनीं आपल्या विद्यार्थीदशेंत आपला कुलदेव श्रीविरूपाक्षेश्वर याजवर एक पद्य रचिलें, तें येणेंप्रमाणें:—

पद.

पाहिला विरूपाक्ष पाहिला । पाहिला विरूपाक्ष मारिला
खल दक्ष नाशी सुरक्ष भ्यासुर निटिलाक्ष पाहिला ॥ ध्रु० ॥

हा तेजोमय पुतळा शिवनेत्रानळीं उपजला चंद्र मुकुट जटाजूट
दिशापट नीलकंठ वक्र भ्रुकुटि विरूपाक्ष पाहिला ॥ १ ॥

क्रूर मुद्रा मुखकमला गरगर फिरवितो डोळा वदनापासुनि
निघे ज्वाला जळे ब्रह्मगोळ मेरु ढळे घोर विरूपाक्ष० ॥ २ ॥

गळां शोभली रुंडमाळा चतुर्भूषण तो ल्याला वासुकीवलय
त्रिशूल अशिर धनु करीं शूर महावीर विरूपाक्ष० ॥ ३ ॥

किंकिणी घंटा कटिला रुणझुण शब्द दाटला चरणीं
घुंगुरवाळा तालानुसारित नाचे मनोहर सुंदर विरूपाक्ष० ॥ ४ ॥
दुष्टजनांसि काळा निजभक्तजन कनवाळा मुनिजन पूजिति
कोमलदल बेल भोजकुल श्रीवरद विरूपाक्ष० ॥ ५ ॥

रामचंद्रपंत वयांत आल्यावर भोजरावांनीं त्यांचा विवाह केला. रामचंद्रपंतांच्या पत्नीचें नांव गंगाबाई. ही फार सत्त्वशील व पतिपरायण स्त्री होती. तिच्या पोटीं रामचंद्रपंतांस दोन पुत्र झाले.

रामचंद्रपंतांचा बाणा ल्हानपणापासूनच शिपाईगिरीचा असल्यामुळें, लष्करांत शिरून आपण कांहीं तरी मर्दुमकी करून दाखवावी अशी इच्छा त्यांस सहजच उत्पन्न झाली. त्याच वेळीं कर्नाटकांत कितुरकर देसाई, सावनुरकर नबाब व टिपू सुलतान हे पेशव्यांच्या मुलखास वरचेवर उपद्रव देत असत, त्यांचें पारिपत्य करण्यासाठीं पेशव्यांनीं बापू गोखल्यांचे चुलते धोंडोपंत यांस फौजेसह पाठविलें होतें. ते पाच्छापुराजवळून कर्नाटकांत जात असतां, लष्करांत शिरण्यास ही संधी चांगली आहे, असें जाणून रामचंद्रपंत गोखले यांचे फौजेंत नोकरीस राहिले. कर्नाटकांतील लढायांत रामचंद्रपंतांनीं दाखविलेलें शौर्य व चातुर्य पाहून फडके व गोखले हे सेनापति फार संतुष्ट झाले व त्यांनीं एका पथकाचें आधिपत्य रामचंद्रपंतांस दिलें. कर्नाटकांतील कामगिरी संपल्यावर, कोंकणांतील काळेगोंगरी किल्ल्यावरील गडकरी लोकांनीं केलेलें बंड मोडण्याच्या कामावर गोखल्यांनीं रामचंद्रपंत व यमाजीपंत यांची योजना केली. तेथें त्यांनीं मोठी मर्दुमकी करून बंडवाल्यांचा मोड केला. पुढें पेशवे दुसरे बाजीराव व इंग्रज यांची लढाई सुरू झाली, त्या प्रत्येक लढाईंत बापू गोखल्यांचे बरोबर रामचंद्रपंत प्रमुखत्वानें हजर असत. शेवटीं, हिंदुपदपादशाहीच्या रक्षणासाठीं निकराची लढाई करून रणधुरंधर बापू गोखले धारातीर्थीं पतन पावल्यावर, रामचंद्रपंत हे

बाजीरावसाहेबांपाशीं सरदार या नात्यानें राहिले. बापूंसारखा मोहरा अस्तंगत झाल्यामुळें पेशव्यांचा धीर सुटून ते आपला जीव वांचविण्यासाठीं खानदेशांत जात असतां त्यांची व इंग्रजी फौजेची एका घांटांत गांठ पडली. त्यावेळीं पेशव्यांबरोबर फक्त त्यांच्या कुटुंबांतील माणसें, बापु गोखले यांची पत्नी व स्वार सरदार मिळून सुमारें २५ मनुष्यें होतीं, त्यांतच रामचंद्रपंतही होते. त्यांनीं मोठ्या चातुर्यानें व हुशारीनें बाजीरावसाहेबांस खानदेशांत पाठविलें व स्वतः बापू गोखले यांच्या कुटुंबास घोड्यावर पाठीशीं बांधून पुण्यास घेऊन आले. नंतर त्यांनीं बापूंच्या पत्नीस मालकमसाहेबांस नेऊन भेटविलें व तिच्या इच्छेप्रमाणें तिच्या योगक्षेमाची व्यवस्था करून व तिचा निरोप घेऊन ते आपल्या गांवीं आले.

वर दिलेला ऐसिहासिक कथाभाग स्वतः रामचंद्रपंत यांनीं फसली सन १२३९ मध्यें, एल्फिन्स्टनसाहेबांस आपल्या हातानें लिहून दिला असून, त्याची नक्कल त्यांच्या वंशजांपाशीं आहे. असो.

रामचंद्रपंत घरीं आल्यावर, कांहीं दिवस विश्रांति घेऊन ते आपल्या कुटुंबासह श्रीक्षेत्र यड्डूर येथें विरूपाक्षेश्वराच्या दर्शनास गेले. तेथें त्यांनीं विरूपाक्षेश्वरास रुद्राभिषेक व महापूजा करून व यथोचित दानदक्षिणा देऊन मुक्तद्वार ब्राह्मणभोजन घातलें. यड्डूर येथें असतां, रामचंद्रपंतांनीं 'श्रीवीरभद्रक्षेत्रवर्णन' नामक ८६ ओंव्यांचें एक प्रकरण लिहिलें, त्यांतील कांहीं ओंव्या याच लेखांत पुढें दिल्या आहेत. यडुराहून स्वग्रामीं आल्यावर, कोठें तरी निवांत स्थळीं राहून परमार्थसाधन करावें, अशी इच्छा त्यांस उत्पन्न झाली. पाच्छापुराहून एक मैलावर शीगेहोळी या नांवाचें एक खेडें आहे, तें तपश्चर्या व अनुष्ठान करणाऱ्या लोकांस फार सोयीचें आहे. तेथें एक मोठा वाडा बांधून, त्यांत आपल्या

परिवारासह रामचंद्रपंत जाऊन राहिले. तेथें त्यांनीं स्मार्ताग्नि ठेवला होता. रोज त्रिकाळ संध्यास्नान, होमहवन व ईश्वरभजन इत्यादि सत्कर्मांत ते आपला कालक्षेप करीत असत. फुरसतीच्या वेळीं कविता लिहिण्याचा क्रमही त्यांनीं चालू ठेवला होता. पाच्छापुर येथें रामदीक्षित नामक एक सत्पात्र ब्राह्मण होते, त्यांची वेदशास्त्र-पारंगतता, सत्वशीलता, धर्मनिष्ठा, इत्यादि गुण पाहून, त्यांच्या संबंधानें रामचंद्रपंतांस मोठी पूज्यबुद्धि वाटत असे. ह्या दीक्षितांवर त्यांनीं एक संस्कृत स्तोत्र केलें आहे, तें येणेंप्रमाणें:—

'पाच्छापूरनिवासिनं द्विजवरं विद्वत्सु चूडामणिं ।
ज्योतिष्टोममखादिषु प्रतरणिं ज्योतिर्विदं मंत्रदं ॥
श्रीमत्कश्यपगोत्रजं कविवरं दिग्ग्रंथपारंगतं ।
शिष्याणां हृदि चिंतितं च ददतं रामाभिधानं भजेत् ॥ १ ॥
श्रीगुरुं परमानंदं मुनिमात्मरतं प्रियं ।
शांतं दांतं वरेण्यं च वंदेहं रामदीक्षितं ॥ २ ॥
राजद्विभूतिपुड्रांकं भाले रुद्राक्षभूषितं ।
शरण्यमार्तिभीतानां वंदेहं रामदीक्षितं ॥ ३ ॥
मल्हारिसूनुविप्रेंद्रजापितं सर्वदा शुचिं ।
परोपतापकर्षितं वंदेहं रामदीक्षितं ॥ ४ ॥
दीर्घबाहुं विशालाक्षमग्निहोत्रपरायणं ।
षट्कर्मनिरतं देवं वंदेहं रामदीक्षितं ॥ ५ ॥
क्षितिदेवसुतं श्रीमद्वंदितं भवभेषजं ।
ब्रह्मोपदेशिकवरं वंदेहं रामदीक्षितं ॥ ६ ॥
तारकापतिलावण्यं स्मितवक्त्रक्षमान्वितं ।
गंभीरवाग्विलासं च वंदेहं रामदीक्षितं ॥ ७ ॥
यज्वानं चयनादीनि सवनानि बहूनि च ।
वाङ्मिनं सत्यसंधं च वंदेहं रामदीक्षितं ॥ ८ ॥
नमन्नृपतिसंघं तं ज्योतिःशास्त्रविशारदं ।

मांत्रिकं यांत्रिकं धीरं वंदेहं रामदीक्षितं ॥ ९ ॥
अस्तीत्यक्षरवेद्यं च पुत्रपौत्रैः सुसेवितं ।
कृपानिधिं तपोराशिं वंदेहं रामदीक्षितं ॥ १० ॥
बीजाढ्यश्लोकनवकं स्तोत्रं यः पठते नरः ।
स भुक्त्वा भोगमखिलमंते मोक्षमवाप्नुयात् ॥ ११ ॥

हें स्तोत्र ऐकून रामदीक्षितांनीं रामचंद्रांस सांगितलें कीं, तुम्ही आतां विद्यादान करा. ही आज्ञा शिरसा वंद्य मानून रामचंद्रपंतांनीं एक वेदशाळा स्थापन केली. तेथें दहा बारा विद्यार्थी विद्याभ्यास करूं लागले. नित्य सकाळीं स्नान करून अनुष्ठान संपवून नंतर रामचंद्रपंत विद्यार्थ्यांकडून अध्ययन करवीत असत व माध्यान्हहोम आटोपल्यावर भोजन करीत असत. याप्रमाणें त्यांचा नित्यक्रम असे.

बेळगांव जिल्ह्यांत परसगड तालुक्यांत मुरगोड नामक गांव आहे, तेथें श्रीचिदंबर दीक्षित नामक एक साक्षात्कारी पुरुष होऊन गेले, त्यांची कीर्ति रामचंद्रपंतांनीं कर्नाटकांतील स्वारीच्या वेळीं ऐकली होती व तेव्हांपासून त्यांचें दर्शन घेण्याची इच्छा त्यांस झाली होती. त्याप्रमाणें त्यांनीं मुरगोडास जाऊन चिदंबर दीक्षितांचें दर्शन घेतलें व तेथें बरेच दिवस राहिल्यावर त्यांचा आशीर्वाद घेऊन ते घरीं आले. मुरगोडास असतांना, चिदंबर दीक्षितांवर एक संस्कृत आरति व एक स्तोत्र त्यांनीं रचिलें. ही मुरगोड येथील यात्रा, रामचंद्रपंत पेशव्यांच्या नोकरींत होते, त्यावेळीं घडली.

रामचंद्रपंतांचे वडील भोजोपंत हे ज्येष्ठ वद्य १ शके १७९८ या दिवशीं स्वर्गस्थ झाले. त्या वेळीं रामचंद्रपंतांस फार दुःख झालें. तेव्हां त्यांचे गुरु रामदीक्षित यांनीं व इतर आप्तेष्टांनीं त्यांचें शांतवन केलें. या प्रसंगीं, भोजोपंतांचा और्ध्वदेहिक विधि आटोपल्यावर, रामचंद्रपंतांनीं एक पद रचून त्यांत आपल्या संसाराचा सर्व भार देवावर टाकला आहे. हें पद बरेंच मोठें असल्यामुळें तें येथें साग्र उतरून न घेतां, फक्त त्याचा शेवटचा चरण खालीं देतों:—

" आत्मयोनि निरालंबानंत सर्वाधारा स्वप्रकाश स्वयंभूते सिद्ध भक्तोद्धारा श्रीविनायकजनक सुखकर सारा निर्विकल्प ज्ञान हर जो शर्व विश्वाकारा..............भोजकार्य समस्त भार वहा विकार पुरंदरेशा ॥ "

रामचंद्रपंत यांनीं लिहिलेले ग्रंथ येणेंप्रमाणें:—

| संस्कृत | मराठी. |
|---|---|
| १ सिद्धेश्वराष्टक. | १ गंगास्तव आर्या (अपूर्ण) |
| २ रामदीक्षित स्तोत्र | २ वीरभद्रक्षेत्रवर्णन, ओंव्या ८६ |
| ३ आरत्या व पदें ५० | ३ श्रीगणेशचरित्र. |
| ४ चिदंबरगीति. | अध्याय १९, ओंव्या १९३१ |

यांशिवाय मार्कंडेयीमाहात्म्य ( संस्कृत ) अ० २७, हा ग्रंथ रामचंद्रपंतांचा म्हणून, त्यांचा वंशजांनीं मजकडे पाठविला आहे, पण तो त्यांचा नसून, इतर क्षेत्रमाहात्म्यांप्रमाणें पुराणोक्त ग्रंथ असावा असें मला वाटतें; "पुरा वै नैमिषारण्ये शौनकाद्या महर्षयः । मार्कंडेयीकथा रम्यां श्रोतुकामा समासतः ॥ " असा सदर ग्रंथाच्या आरंभींच श्लोक असून, त्यांत रामचंद्रपंतांचें नांव कोठेंही आढळत नाहीं, यावरूनही हेंच सिद्ध होतें. त्याचप्रमाणें श्रीगणपतिस्तुतीचे २२ अभंग रामचंद्रपंतांनीं रचिलेले म्हणून, मजकडे पाठविण्यांत आले आहेत; पण त्यांपैकीं प्रत्येक अभंगाचे शेवटीं 'भोज' हें नांव आढळतें. या अभंगांची भाषा थोडीशी अशुद्ध आहे. रामचंद्रपंतांची भाषा क्वचित् स्थळीं अशुद्ध आहे, परंतु ते पुण्यांत बरींच वर्षें राहिले होते, यामुळें त्यांच्या ग्रंथांतल्या मराठी कवितेवर त्यांची जन्मभाषा जी कानडी, तिची झांक तितकी कमी मारते. काव्य या दृष्टीनें रामचंद्रपंतांची कविता ह्मणण्यासारखी रसवती नाहीं, तथापि एका शिपाईबाण्याच्या भाविक गृहस्थानें लिहिलेली कविता, या नात्यानें तिचें महत्त्व बरेंच आहे, यांत संशय नाहीं.

रामचंद्रपंतांची प्रकृति वृद्धपणामुळें दिवसेंदिवस क्षीण होत चालली, त्यामुळें त्यांजकडून नित्यनैमित्तिक कर्म घडेना व शिष्यगणांस शिक्षण देण्याची शक्तिही त्यांस राहिली नाहीं. तेव्हां त्यांनीं मोठ्या कष्टानें आपली वेदशाळा बंद करून, आपल्या प्रकृतीस स्वास्थ्य मिळावें ह्मणून श्रीदत्तात्रयाची ओवीबद्ध प्रार्थना केली, त्यांतील कांहीं ओंव्या येथें देतों:—

'तुम्ही त्रैमूर्तींचा अवतार। घेऊनि केला जनाचा उद्धार।
अपरिमित असे चरित्र। मी मूढ काय वर्णूं॥ १॥
तुमचेंच चरित्र निरंतर। पठन करावें हें माझें अंतर।
परी प्रकृति नीट नसे अहोरात्र। यास्तव तवचरणास आलों शरण॥२॥
आपुली दया होतांचि त्वरें। जाती सर्वारिष्टें सत्वरें।
म्हणोनि मी वारंवार। हेंचि मागतों सद्गुरु॥ ३॥
ब्रह्मचारी मरण पावला। तो पुनः सजीव केला।
सावित्रीचा पति पंचत्व पावला। त्यासही पूर्ववत् रक्षिलें॥ ४॥

ह्या दत्तस्तोत्राच्या १३ ओंव्या रामचंद्रपंतांच्या वंशजांनीं मजकडे पाठविल्या असून, तेराव्या ओवीच्या शेवटीं 'इतिश्री भोजसुतकृत श्रीदत्तस्तवनसंपूर्ण' असें ह्मटलें आहे व लागलीच पुढें 'याप्रमाणें आणखी पुष्कळ ओंव्या आहेत, परंतु स्थलसंकोचास्तव देतां येत नाहींत' असें वाक्य लिहिलें आहे. या स्तोत्राची मराठी भाषा, "बहुतेपरी पीडा मला होतो। तेही सर्व परिहार होतो।" याप्रमाणें बरीच अशुद्ध आहे. असो.

रामचंद्रपंतांची प्रकृति क्षीण झालीच होती, ती दिवसें दिवस अधिकाधिक बिघडत जाऊन त्यांच्या वयाच्या ७९ व्या वर्षी, शके १७७८ नल नाम संवत्सरीं आश्विन मासीं त्यांस देवाज्ञा झाली. पंतांचें बहुतेक आयुष्य नोकरी, परमार्थसाधन, अध्ययन, अध्यापन आणि ग्रंथलेखन यांत गेलें. शिपाईगिरी, अध्यापकता आणि कवि-

त्वप्रवृत्ति हे तीन गुण एकाच व्यक्तीच्या ठायीं क्वचित् आढळतात, यामुळें रामचंद्रपंतांचें हें अल्प व साधें चरित्र महाराष्ट्र वाङ्मयांत अपूर्व आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं मरणापूर्वी रामचंद्रपंतांनीं आपल्या दोन्ही मुलांस जवळ बोलावून पुष्कळ बोध केला व आपण आतां हें जग सोडून जाणार असें त्यांस सांगितलें, तेव्हां ते प्रेमळ पुत्र फार शोक करूं लागले. मग रामचंद्रपंतांनीं त्यांस वेदांताचा उपदेश करून त्यांचें शांतवन केलें व आपण समाधिस्थ झाले. नंतर त्यांचे पुत्र दिनकरराव व सुब्राव यांनीं त्यांचा अंत्येष्टिसंस्कार यथाशास्त्र करून मुक्तद्वार ब्राह्मणभोजन घातलें. रामचंद्रपंतांच्या पुढील दोन पिढ्यांत ह्मणण्यासारखी महत्वाची गोष्ट मुळींच घडली नाहीं. पंतांची वंशावळ येणेंप्रमाणें:—

थव्वरस मूळपुरुष यांजपासून आठवे पुरुष—



आतां रामचंद्रपंतांच्या कवितेंतले कांहीं वेंचे येथें देऊन हा लेख पूर्ण करतों.

गणेशचरित्राच्या आरंभींच कवि म्हणतात:—

ओव्या.

'कुमारशिवसंवाद स्कंदपुराण । सकल पुराणोत्तम अति विस्तीर्ण ।
परम रहस्य तें देवराणा । सांगता झाला विस्तारें ॥ १ ॥
त्याच चरित्र व्यासोक्ति । तदनुसार भावार्थयुक्ति ।
वर्णावया अल्पमति । परंतु स्वशक्ति कथीन ॥ २ ॥
मधुमक्षिका पैं स्वसामर्थ्यें । अमृतालागीं धरूनि धैर्य ।
सिंधुमथनीं केविं शौर्य । अलभ्य तरी अभ्यासावें ॥ ३ ॥
विश्वामित्र गोत्रसमुद्र । विश्वनाथात्मज रुद्रचंद्र ।
देखोनि उठती तरंग सांद्र । परम प्रेमळ भाविक जनां ॥ ४ ॥
श्री अन्नपूर्णाउदरगगनीं । उदय पावला भोज दिनमणि ।
रुद्रात्मज सत्य निदानीं । पादशापुर देशकर्णी ॥ ५ ॥
त्याचा तनय रामचंद्र । गणेशचरित्र कथिल निस्तंद्र ।
गुण ग्रहण करोत कवींद्र । बालभाषण केविं जनकें ॥ ६ ॥
स्कंद प्रश्न परोपकार । केला तो श्रीपार्वतीवर ।
शिवशंभो महेश्वर । सुखद सर्वज्ञ महादेवा ॥ ७ ॥
शाक्त शैव सौर वैष्णव । चरित्र अति पवित्र अभिनव ।
ज्याच्या श्रवणमात्रें सदैव । पळोनि जाती महा आपदा ॥ ८ ॥

ज्या हस्तलिखित पोथींतून वरील उतारा घेतला आहे, तिची भाषा इतकी अशुद्ध आहे कीं, तींतून आणखी कांहीं उतारे देण्याचें काम फार कठीण आहे, तथापि एक दोन उतारे देण्याचा प्रयत्न करून पाहतों.

गणासुर नामक दैत्यानें शंकराकडून वरप्रदान मिळविलें होतें. पुढें त्याचें आणि इंद्राचें युद्ध झालें. त्या प्रसंगाचें वर्णन:—

सकल सेनेसि आज्ञा करिती । कवच खड्ग खट तोमर भातीं ।
धनुर्बाण पट्टीशसहितीं । महा शूर पातले ॥ १ ॥

हस्ती रथ पदाति सज्ज करूनी । गण चालिला शत योजनीं ।
महितळ रजें आच्छादुनी । सेनाणीव उचंबळे ॥ २ ॥
महाशूर घोडे उडविती । महात मदोन्मत्त गज पळविती ।
स्यंदन अति वायुवेगें धांवती । तयें मही हालतसे ॥ ३ ॥
दळीं शोभती राजकुमर । गण पार्श्वभागीं अति दुर्धर ।
गण दिसे जैसा कलावर । नक्षत्रमेळ नभीं तो ॥ ४ ॥
जेथें जेथें वीर असती । तेथें जावोनि रणीं जिंकिती ।
शरणागतासि पाळिती । निर्वैर जालें भूतळ ॥ ५ ॥
प्रधानसुताची रणकंडु । नाहीं शांत जाली युद्धआवडु ।
न राहे सुरेश इतर पाडु । काय असे या पुढारां ॥ ६ ॥
यापरी भूलोक जिंकोनी । स्वर्ग साधाया उद्योग मनीं ।
प्रधानासाहित विचारोनी । अमरपुरा पातला ॥ ७ ॥
आसिबाण धनुर्धर । गण पवे शीघ्र अंबर ।
तंव नंदनवनीं उच्चैश्रवा थोर । पाहूनि स्वार जाहला ॥ ८ ॥
हें देखोनि मातली गण । शचिपतिलागीं धांवून ।
दैत्यकर्म सविस्तर कथन । करिते जाले तेधवां ॥ ९ ॥
श्रवण करुनि मातलीवचन । कोपें संतप्त पाकशासन ॥
ऐरावतारोहण करून । समरांगणीं ठाकला ॥ १० ॥
उच्चैश्रवावाहनीं गण । हस्तीं धरिले धनुर्बाण ।
भयंकर पिंग क्रूर नयन । अमरनाथें पाहिला ॥ ११ ॥
गणासी म्हणे सुरेश्वर । उच्चैश्रवा घेतला तो माघार ।
द्यावा म्हणतां गणासुर । (म्हणे) ऐरावत दे आम्हां ॥ १२ ॥
मार्गणघातभयें देव । पलायमान जाला देवराव ॥
पाहोनि बोले गण विराव । इंद्रा मजशीं योधावें ॥ १३ ॥
नीतिशास्त्र स्मरून । वज्रपाणी पाकशासन ।
गण दैत्या युद्ध दारुण । करिता जाला त्या समयीं ॥ १४ ॥
इंद्रें वज्र मारिजेला । गण दैत्य मूर्च्छा पावला ।
पुनः सावध महाबला । खड्गें वज्र पाडिलें ॥ १५ ॥

मग शस्त्र ठेवूनि बळी । बाहुयुद्ध करी सारथी मातली ।
मुष्टिप्रहारें पाडिला भूतळीं । वृत्रारि हा कळवळला ॥ १६ ॥
वासव पराजय पावला । त्याचा विभव सर्व लाधला ।
स्वर्गलोक निष्कंटक जाला । गणा आनंद न समाये ॥ १७ ॥

रामचंद्रपंतांची ही सगळी कविता अप्रकाशित आहे व ती कधीं प्रकाशित होईल, अशी फारशी आशाही नाहीं.

## विनायक महादेव नातु.

हा कवि सुमारें ६० वर्षांपूर्वीं बडोदें येथें होऊन गेला. चित्पावन ब्राह्मण जातींत जे थोडेसे जुने कवि झाले, त्यांपैकीं हा एक होय. ह्याच्या वडिलांचें नांव महादेव, आईचें नांव पार्वती. ह्यांचें वर्णन कवीनें येणेंप्रमाणें केलें आहे:--

**ओंव्या.**

जयापासून माझा जन्म । पिता महादेव त्याचें नाम ।
अति सुशील विप्र उत्तम । स्वधर्मकर्मीं रत सदां ॥ १ ॥
जो भावें भगवत्परायण । साम्य ज्याचें अंतःकरण ।
सर्वभूतीं नारायण । हेंचि देखणें चराचरीं ॥ २ ॥
धर्माऐसी ज्याची क्षमा । वसिष्ठापरी शांति उत्तमा ।
रामापरी इंद्रियनेमा । एक रामा जयातें ॥ ३ ॥
तियेचें नाम पार्वती । पतिव्रता ती महासती ।
गुणनिधान गुणवती । साध्वी जननी माझी ती ॥ ४ ॥
तिचें पवित्र हृदयकमळ । तेथें माझें जाहलें जन्म सुफळ ।
विनायक नाम ती स्नेहाळ । ठेविती झाली कौतुकें ॥ ५ ॥

कवीचे गुरु ब्रह्मानंद ऊर्फ निजानंद या नांवाचे कोणी सत्पुरुष होते. त्यांचे आज्ञेनें व वरप्रसादानें शालिवाहन शके १७७० या वर्षीं कवीनें गणेशप्रताप नामक एक ग्रंथ लिहिला. हा ग्रंथ गणेश-पुराणाच्या आधारें लिहिला असून, त्याचीं दोन खंडें, १४ अध्याय

व १६६९ ओंव्या आहेत. हा ग्रंथ छापून प्रसिद्ध झालेला आहे. कवीची आपल्या गुरूच्या ठाया फार पूज्यबुद्धि होती असें दिसतें:—

'गुरु हेंचि परब्रह्म। गुरुसेवा सकल धर्म।
गुरुस्मरणें सकल काम। भक्ति सुगम गुरुभजनें॥ २४॥
करितां सद्गुरूचें भजन। तेणें तुष्टे वारणानन।
सकल सिद्धि पुढें येऊन। प्रसन्नवदन तिष्ठती॥ २५॥
ज्याचे मुखीं सद्गुरुस्मरण। तेणें टाकिलें जन्ममरण।
त्याचे दर्शनें कल्याण। पातकी गण पावती॥ २६॥
काय वर्णूं सद्गुरुमहिमा। जयजय गुरो मंगलधामा।
न कळे तुझा अगाध महिमा। त्वां मज अधमा उद्धरिलें॥ २७॥
गुरूस उपमा नाहीं नाहीं। कल्पतरु जाहला उणा तोही।
कल्पित मात्र पुरवी पाहीं। निर्विकल्प करीना॥ २८॥
गुरूसमान ह्मणावा परीस। स्पर्शे कनकत्व दे लोहास।
परि स्वसामर्थ्य न दे त्यास। गुरु आपणासम करी॥ २९॥

गणेशप्रताप, अध्याय १ ला.

शेवटल्या ओंवींतील कल्पना, तुकारामबुवांच्या 'लोहापरीसाची न साहे उपमा। सद्गुरुमहिमा अगाधचि' या अभंगावरून घेतलेली दिसते. गणेशप्रताप ग्रंथाशिवाय प्रस्तुत कवीनें आणखी कांहीं कविता लिहिली आहे कीं काय, त्याचप्रमाणें कवि कैलासवासी कधीं झाला, इत्यादि माहिती मिळाली नाहीं. कवीस बाळपणापासूनच गणेशभक्तीचा नाद होता. कवि मोठा विद्वान् पंडित होता, असें त्याच्या कवितेवरून दिसत नाहीं; त्याला संस्कृत व मराठी या दोन भाषा अवगत होत्या, पण या दोन्ही भाषांवर त्याचें प्रभुत्व होतें असें म्हणण्यास आधार नाहीं. त्याची कवित्वशक्तीही सामान्य प्रतीचीच दिसते; तथापि त्यानें आपला ग्रंथ अत्यंत भक्तिपूर्वक लिहिला असून, सगळ्या गणेशभक्तांस तो प्रिय होईल यांत संशय नाहीं.

गणेशप्रताप ग्रंथांतले कांहीं वेंचे पुढें दिले आहेत, त्यांवरून या कवीच्या कवितेचें स्वरूप वाचकांच्या लक्ष्यांत येईल. सोमकांत-राजानें आपला पुत्र हेमकंठ यास केलेला उपदेश:--

यामावशिष्ट निशा शेष । राहतां उठे तो पुण्यपुरुष ।
मातृपितृगुरुध्यान विशेष । करितां दोष खंडती ॥ ५४ ॥
अवनी प्रार्थावी पुरुषोत्तमा । पादस्पर्श करील क्षमा ।
प्रातःस्मरणादि करोनि नेमा । शौचकर्मा वर्तावें ॥ ५५ ॥
विधि वेदाचार संपूर्ण । करूनि नित्यकर्म आचरण ।
मग पूजावा उमारमण । तेणें कल्याण होय सदां ॥ ५६ ॥
जप होम स्वाध्यायन । वैश्वदेव अतिथीपूजन ।
आप्तबांधव आणि द्विजगण । घेऊन भोजन करावें ॥ ५७ ॥
मुखें वर्जावे निंद्य शब्द । अंतरीं चिंतावें सद्गुरुपद ।
अवमानूं नयेत वेद । दुःखसंबंध सोडावा ॥ ५८ ॥
करावें नास्तिकांचें खंडन । न करावें अभक्ष्यभक्षण ।
वर्जावें परदारानिषेवण । स्वच्छाचरण असावें ॥ ५९ ॥
मातापिता गुरुस्मरण । सत्पाद धेनु शुश्रूषण ।
जे कां आपल्यासी शरण । त्यांचें रक्षण करावें ॥ ६१ ॥
दीनांध कृपण हीन । त्यांसी द्यावें वस्त्रान्नदान ।
वृद्धमर्यादाउल्लंघन । कदां मनें न करावें ॥ ६२ ॥
जरी होईल प्राणांत । तरी सत्य रक्षावें निश्चित ।
जाणावें सर्वांचें मनोगत । हिताहित शोधावें ॥ ६३ ॥
अपराधाचा करूनि विचार । घेऊनि शास्त्राचा आधार ।
पंडितानुमतें साचार । मग दंड करावा ॥ ६४ ॥
संपूर्ण जन न विश्वासावा । सर्वत्र अविश्वास न धरावा ।
प्रशस्त धर्म आचरावा । अधर्म त्यागावा मुळींहून ॥ ६५ ॥
वैरियाहातीं निजवर्म । पडूं न द्यावें पुरुषोत्तम ।
सत्क्रियेस लावावे अधम । याचककाम पुरवावे ॥ ६६ ॥
कोणाचें कैसें आचरण । चार मुखें करावें श्रवण ।
परधन न करावें हरण । तेणें कल्याण रायासी ॥ ६७ ॥

कोणता अधिकार कवणासी । आधीं विचार करोनि मानसीं ।
मग नेमावा त्या पदासी । तेणें राज्यासी होय वृद्धि ॥ ६८ ॥
दंडभयें प्रजाजन । स्वधर्मे वागती अनुदिन ।
म्हणोनियां राजयानें । अपराध क्षमा न करावा ॥ ६९ ॥
गुप्त मंत्र तो षट्कर्णी । दडतां होय कार्यहानी ।
धनेंमानें पाळावे गुणी । कार्यकारणीं चतुर जे ॥ ७० ॥
पूर्वी होता वैरभावें । परी शरण आला स्वच्छ भावें ।
निःसंशय त्यासि रक्षावें । न आठवावें पूर्ववैर ॥ ७१ ॥
काम-क्रोधादि षट् सपत्न । हटें जिंकिजे करोनि यत्न ।
तोच अवनीभूषा रत्न । मोक्षबुद्धीस ब्रह्म जाणतो ॥ ७२ ॥
वृत्याराम प्रासादछेद । न कीजे कवणासी प्रमाद ।
भलताच न धरावा छंद । मनीं प्रमोद वागवावा ॥ ७३ ॥
स्त्रियांसी गुह्य गोष्टी । न सांगावी दूरदृष्टि ।
अमित्राची वचनराहटी । कदां सत्य मानूं नये ॥ ७४ ॥
अमात्य आणि सेवकगण । त्यांचें हरावें अंतःकरण ।
पदोपदीं देवाताब्राह्मण । नमस्कारोनि आर्जवावे ॥ ७५ ॥
चिखलीं गुंतली जी गाई । ऋणें गांजले ब्राह्मण पाहीं ।
यांचा उद्धार लवलाहीं । नृपतीनें करावा ॥ ७६ ॥
असत्यें वर्जावी वाणी । करावी परोपकारकरणी ।
शाठ्य ठेवावें दुर्जनगणीं । दया अंतःकरणीं असावी ॥ ७७ ॥
सर्वांभूतीं भगवद्भावो । तेणें जोडे वासुदेवो ।
ऐसा नीतिधर्म पुत्रासी रावो । गुह्य भावो अनुवादला ॥ ७८ ॥

**गणेशप्रताप, अ० २**

**युद्धवर्णनः—**

शब्दें नादविला भूगोल । दैत्य गर्जती प्रबळ ।
प्रजा जाहल्या भयविव्हळ । अवनीतळ पाहूं लागल्या ॥ ५० ॥
दोन्ही दळां जाहली भेट । शस्त्रास्त्रें वर्षती भट ।
परस्परें लोटले गजघंट । प्राणसंकट महावीरां ॥ ५१ ॥
भात्यांतील शर सरले । कित्येक कोदंड मारूं लागले ।
मल्लयुद्धासी मिसळले । वीर पडले नामांकित ॥ ५२ ॥
घायें मारिती गजांते । उपटोनी घेती दंतांतें ।
चवताळोनी ते वीरांतें । दंतघायें हाणिती ॥ ५३ ॥

गजांचीं फोडिती गंडस्थळें । तेथून उसळती मुक्ताफळें ।
वीरांचीं पडलीं शिरकमळें । किरीट कुंडलां समवेत ॥ ५४ ॥
भूषणासहित तुटले कर । कोणाचें तुटलें अर्ध शिर ।
कोणाचें फुटलें उदर । कंबर खंडली कित्येकांची ॥ ५५ ॥
कित्येक जाहले घायाळ । प्राणें करिती तळमळ ।
कोणी मूर्च्छित विकळ । अवनीतळीं पहूडले ॥ ५६ ॥
चापापासोनि सुटले शर । तेणें खोंचले महावीर ।
रणीं पडला अंधकार । घोरांदर ओढवलें ॥ ५७ ॥
रणीं उठला धुरोळा । तेणें व्यापिलें देवकुळा ।
शस्त्रवर्षें असुरमेळा । प्रळयकाळ मांडला ॥ ५८ ॥

गणेशप्रताप, अ० १३.

बडोद्याकडील शोधकांनीं, प्रस्तुत कवीचे वंशज हल्लीं तेथें आहेत कीं काय, असल्यास कवीचे आणखी कांहीं ग्रंथ त्यांचे संग्रहीं आहेत कीं काय, इत्यादि सविस्तर वृत्तांत अवश्य प्रसिद्ध करावा अशी विनंति आहे.

---

## अनंतसुत विठ्ठल.

हा कवि सुमारें ६० वर्षांपूर्वी बडोदें येथें होऊन गेला. ह्याचा 'दत्तप्रबोध' नामक दत्तचरित्रावर एक मोठा ग्रंथ आहे. त्याचे अध्याय ६१ व ओवीसंख्या १४२३६ आहे. कवीनें स्वतः-संबंधानें ग्रंथाच्या शेवटीं जी काय थोडीशी माहिती दिली आहे, ती येणेंप्रमाणें:—

वचनविश्वास जीवीं धरिला । ग्रंथ इंद्रपुरीं आरंभिला ।
तो संतकृपें सिद्धीस पावला । दत्तचि बोला बोलवी ॥ २२२ ॥
हृदयभुवनीं श्रीदत्त । प्रगटोनि वदविला ग्रंथ ।
आरंभ जाला माळव्यांत । स्थळ विख्यात परियेसा ॥ २८५ ॥
ॐकार अवंतिका मध्यस्थान । इंद्रपुर नामाभिधान ।
तेथें चाळीस अध्याय संपवोन । साधिलें प्रयाण तेथोनी ॥ २८६ ॥

याप्रमाणें माळव्यांतील इंद्रपुर शहरीं, ४० अध्याय लिहिल्यावर कवि यात्रेस निघाले, ते फिरत फिरत बडोदें येथें आले. या ठिकाणीं त्यांनीं दत्तप्रबोध ग्रंथ पूर्ण केला.

या क्षेत्रीं सुरस । अध्याय जाले एकवीस ।
पूर्वींचे असती चाळीस । एवं एकसष्टीस रचियेले ॥ २९१ ॥
शालिवाहन शके सत्राशें व्यांशीं । संवत् एकुणिशें सोळासी ।
प्रजापति नाम संवत्सरासी । परिपूर्तीसी ग्रंथ आला ॥ २९३ ॥

कवीनें आपली गुरुपरंपरा दिली आहे, त्यांतले सगळे पुरुष मोठे दत्तभक्त असून, ते साक्षात्कारी होते.

१ श्रीजनार्दन
|
२ श्रीएकनाथ
|
३ नरहरी
|
४ निंबराज
|
शिवराम — ५ नारायण — नरहरी
|
६ जयराम
|
७ नारायण
|
८ अनंत
|
९ विठ्ठल

श्रीजनार्दन हे एकनाथांचे गुरु. एकनाथ महाराज तर प्रसिद्धच आहेत. त्यांस कवीनें 'ज्ञानेश्वराचा अवतार । तो हा एकनाथ साचार' असें म्हटलें आहे. नरहरी या नांवाचे कांहीं साधु महाराष्ट्रांत होऊन गेले व त्यांच्या नांवांची कांहीं कविताही सांपडते, पण त्यांपैकीं, वरील परंपरेंतले नरहरी कोणते, हें सांगतां येत नाहीं. 'निंबराज' हे प्रसिद्ध निंबराज दैठणकर असावेत, असें वाटतें. नारायणाचें नांव फारसें प्रसिद्ध नाहीं. जयराम या नांवाच्या एका सत्पुरुषाचा जयबोध नामक एक ग्रंथ प्रसिद्ध आहे; पण वरील परंपरेंतले जयराम व हे जयराम एकच कीं काय, हें सांगतां येत नाहीं. जयरामाचे शिष्य नारायण हे जुन्नरास राहत असत. ह्यांनीं आश्विन शुद्ध ४ स, कांबरगांव येथें समाधि घेतली. त्यांच्या समाधीची सगळी तयारी त्यांचे शिष्य *महीपति यांनीं केली. नारायणाची समाधि जुन्नर येथें विठूपिठू नामक साधूंच्या समाधीशेजारीं असून, नारायणाचे समाधीनंतर उत्सवाचे वेळीं 'वृंदावन विठूपिठूचें डोललें' असें कवीनें म्हटलें आहे. हे विठूपिठू कोण होते याचा शोध करून, जुन्नराकडील लोकांनीं ती हकीकत अवश्य प्रसिद्ध करावी. नारायणाचे शिष्य व कवीचे तीर्थरूप अनंत हेही मोठे साक्षात्कारी पुरुष होते. ते हांगा नदीचे तीरीं पिंपळगांव येथें राहत असत. हें गांव मातापुरच्या ( माहूर ) जवळच आहे, असें म्हटलें आहे. अनंत यांजकडे पिंपळगांव व इतर तीन गांवें यांचें जोशीपण व कुळकर्णीपण होतें. दत्तकृपा झाल्यावर ते सहकुटुंब त्रिस्थळी यात्रेस निघाले. त्यांच्या कुटुंबाचें नांव राधाबाई. राधाबाई गया येथें स्वर्गवासिनी झाली. नंतर प्रयाग येथें अनंतांनीं संन्यासदीक्षा घेतली. प्रस्तुत कवि विठ्ठल हे या अनंतराधिकेचे पुत्र. त्यांनीं आपल्या तीर्थरूपांकडून उपदेश घेऊन दत्तकृपा संपादन

---

* संतचरित्रकार महीपतींहून हे महीपति निराळे.

केली, त्या कृपेचेंच फळ 'दत्तप्रबोध' ग्रंथ होय. कवींनीं 'अनंत-सुत' या नांवानें आपला सर्वत्र उल्लेख केला आहे. त्यांस तीर्थ-यात्रेची फार आवड असल्यामुळें ते बहुधा एके ठिकाणींच फार दिवस रहात नसतः—

"पहावें द्वारकाधीशासी । म्हणोनि निघालों वेगेंसी ।
पावलों येवोनि गुर्जर देशीं । देवतीर्थक्षेत्रांसी पाहिलें ॥ २८७ ॥
रेवाडाकुर मध्यस्थ । क्षेत्र बडोदें विख्यात ।
वसती साधुसंत योगी महंत । दैवतें अद्भुत महास्थानें ॥ २८८ ॥
होतां सर्वांचें दर्शन । चित्ता वाटलें समाधान ।
संतपदीं होतां शरण । आपंगिलें पूर्ण मज दीना ॥ २८९ ॥

या कवीचा प्राचीन मराठी कवितेशीं चांगला परिचय होता असें दिसतें. व्यंकटेशस्तोत्र व दासबोध या ग्रंथांतल्या ओंव्यांशीं सदृश अशा कांहीं ओंव्या दत्तप्रबोध ग्रंथांत आढळतात. कवीची विद्वत्ता मोठी होती असें दिसत नाहीं, तरी पण त्यास संस्कृत व मराठी या भाषांचें चांगलें ज्ञान असून, त्याची कविता बरीच रसवती—विशेषतः भक्तिरसपूर्ण—अशी आहे.

दत्तप्रबोध ग्रंथाचे पहिले १७ अध्याय, शिवपुराण, नारदपुराण व पद्मपुराण या ग्रंथांच्या आधारानें लिहिले असून, त्यांत श्रीदत्तात्रेयाच्या पौराणिक कथा वर्णिल्या आहेत. पुढील २४ अध्यायांत दत्तसांप्रदायांतील सत्पुरुषकथांचा समावेश केला आहे. जनार्दन, एकनाथ, निंबराज, इत्यादि संतांच्या कथाही बऱ्याच विस्तारानें वर्णिल्या आहेत. आपल्या संप्रदायाचें विशेष स्वरूप काय आहे, हें कवीनें पुढील ओंव्यांत सांगितलें आहेः—

'निंबराजासि रुक्मिणीरमण । सुप्रसन्नें लेववी भूषण ।
दिधलें स्ववस्त्र पीतवसन । करावें रक्षण अद्यापि ॥ १२० ॥

तैंपासोनि सर्वांसी । पिंवळा बाणा सांप्रदायासी ।
पिंवळ्या पताका निश्चयेंसी । शोभा श्रीहरीसी मानली ॥ १२१ ॥
सोंवळें करविलें परिधान । तैसेंचि करविलें कीर्तन ।
तोचि क्रम सर्वांलागोन । करिती आचरण त्या रीतीं ॥ १२२ ॥
उभें राहावें कीर्तनीं उघडें । पागुटें नसावें आंगडें ।
कांस घालोनि वाडें कोडें । गावे पवाडे श्रीहरीचे ॥ १२३ ॥
ती आज्ञा शिरीं वाहोन । सांप्रदायी करिती कीर्तन ।
सप्त पिढी वरप्रदान । निंबराजा पावन जालेंसे ॥ १२४ ॥

दत्तप्रबोध, अ० ६१.

कवीनें आपल्या तीर्थरूपासंबंधानें जी माहिती दिली आहे, तीवरून तेही मोठे अधिकारी पुरुष होते, असें दिसतें:—

'प्रपंच करी सावधान । परमार्थीं प्रेमा दारुण ।
नित्यानित्य हरिभजन । आवडी करून करीतसे ॥ ७५ ॥
पूर्ण पांडुरंगउपासक । त्यावीण नेणेंचि आणिक ।
संतार्चनीं अति हरिख । भाव चोख अंतरीं ॥ ७६ ॥
एके दिवशीं आपण । सद्गुरुउत्साह करितां जाण ।
पूर्ण दिवस लोटले दोन । काला पूर्ण षष्ठीचा ॥ ७७ ॥
तो पाहावयासी काला । अद्भुत मिळाला जनमेळा ।
तृणमंडपाच्या तळा । काला आरंभिला आंगणीं ॥ ७८ ॥
तों एकाएकीं घन । वळोनि आला चहूंकडोन ।
श्रोत्यांचें दुश्चित मन । ठायीं गजबजोन बोलती ॥ ७९ ॥
म्हणती काल्याची आनंदवेळ । पर्जन्य तों पातला सबळ ।
होऊं पाहे रंग वितळ । दुजें स्थळ असेना ॥ ८० ॥
घ्यावया काल्याचा प्रसाद । जीवीं धरोनि आलों आल्हाद ।
येथें ओढवलें हें प्रारब्ध । जीवीं खेद सकळांच्या ॥ ८१ ॥
कोण्ही म्हणती चला घरा । कोणी म्हणती धरा आसरा ।
एक म्हणती सांभाळा मखरा । बैसका आवरा त्वरेनें ॥ ८२ ॥

अनंत उभा होता कीर्तनीं । कितेक सलगी बोलती वाणी ।
कैंचा काला ? काला जनीं । राहिला होवोनी आटोपा ॥ ८३ ॥
कैसी भक्ती कैसा प्रेमा । भाव कळोनि आला आम्हां ।
व्यत्यय आला देवकामा । डौल रिकामा गेला कीं ॥ ८४ ॥
एक विनोदें बोलती । अघटित कर्म करावें संतीं ।
येथें तों असे गृहस्थी । योजितां चित्तीं चमत्कार ॥ ८५ ॥
नानापरी बोलती जन । उठूं लागले तेथून ।
तो अनंतें विरंग देखोन । करुणावचन गाय देवा ॥ ८६ ॥
सद्गद हृदयीं जाला । करुणासिंधु आठविला ।
म्हणे धांव घालीं विठ्ठला । मांडिला कालाभंग तो ॥ ८७ ॥
तुझिया कीर्तीचे पवाडे । म्यां ऐकिले निवाडे ।
अनन्यासी पडतां सांकडें । तें तूं धडफुडें वारिसी ॥ ८८ ॥
ऐसें असतां चक्रपाणी । आजी न संभाळिसी हे वाणी ।
हा पामर उभा कीर्तनीं । रंग नारायणीं राखिजे ॥ ८९ ॥
सेवा आरंभिली सिद्धी जावी । समाजमंडळी तोषवावी ।
ब्रीदें आपुलीं संभाळावीं । कीर्ती वाणावी तुझी जनीं ॥ ९० ॥
ऐसें करितां स्तवन । बाष्पें वाहती नयन ।
विगलित अवस्था देखोन । कृपाळु नारायण बोळला ॥ ९१ ॥
देखोनि अंतरींचा भाव । प्रगट करिता जाला माव ।
बालकरूपें सहज स्वभाव । बोले ठाव न सोडा ॥ ९२ ॥
येतुलीच होतां ध्वनी । कितेकीं ऐकिली श्रवणीं ।
अनंतें विश्वास धरोनि मनीं । सर्वांलागोनि विनवीत ॥ ९३ ॥
आषाढीचे वारींत । वेणुनादीं जाती भिजत ।
काला करिती पर्जन्यांत । तोचि अर्थ जाणिजे हा ॥ ९४ ॥
स्वस्थ बैसा स्वस्थानीं । काला ऐकिजे श्रवणीं ।
कृपा करी चक्रपाणी । निश्चय मनीं असावा ॥ ९५ ॥
धरोनि बैसा निर्धार । कृपा करील सर्वेश्वर ।
श्रवणीं चित्त द्यावें सादर । आनंदगजर करावा ॥ ९६ ॥

करोनि सद्गुरूतें नमन । आरंभ काल्यासि केला पूर्ण ।
आनंदें भजनघोष करोन । चालविलें निरोपण सप्रेमें ॥ ९७ ॥
ईश्वराची अद्भुत करणी । पर्जन्यवृष्टि चहूंकडोनी ।
बुंद न पडे मंडपस्थानीं । गांवांत वाहावणी होतसे ॥ ९८ ॥
जितकें अनंताचें मंदिर । तेथें नयेचि तुसार ।
इतर वर्षे शिळाधार । लोक समग्र पाहती ॥ ९९ ॥
जेंवी जगमित्राचे सदनीं । अग्नि लागला चहूंकडोनी ।
कुटुंबपरिवार निमग्न शयनीं । जगमित्र स्तवनीं स्तवी देवा ॥ २०० ॥
श्रीहरि होवोनि कृपावंत । अग्नि वरचेवरी उडवीत ।
कुटुंबपरिवारसह त्या रक्षित । त्या परी दावीत माव हे ॥ १ ॥
कीं राका बंका करितां स्तवन । आव्यांत पिलीं वांचावलीं पूर्ण ।
तेवीं सभोंवता असोनि पर्जन्य । कोरडें सदन ठेविलें ॥ २ ॥
ऐसी दोन दिवसपर्यंत । झडी पर्जन्याची अद्भुत ।
परी तेथें बुंद नसे वाड्यांत । उत्साह होत आनंदें ॥ ३ ॥
आश्रमालागीं श्रोते जाती । येतां जातां मार्गीं भिजती ।
वाड्यांत येतां वस्त्रें वाळविती । मग बैसती कीर्तनीं ॥ ४ ॥
ऐसा नवलाव देखोन । धन्यधन्य म्हणती जन ।
वंदिती अनंताचे चरण । करिती श्रवण कथारस ॥ ५ ॥
काला लळीत पूर्ण जालें । प्रसाद सकळां वांटिले ।
यात्राजन बोळविले । आटोपिलें सर्वही ॥ ६ ॥
आवराआवरी होत । तों पर्जन्य दाटला वाड्यांत ।
धन्य कृपाळु भगवंत । महिमा वाढवीत भक्ताचा ॥ ७ ॥
**अनंतराधिका** आनंदघन । म्हणती हरी कृपाळू पूर्ण ।
केलें ब्रीदाचें रक्षण । पतितपावन नाम खरें ॥ ८ ॥
अद्भुत पर्जन्य वारा । येतां रक्षी नामयाच्या घरा ।
तेवींच ये अवसरां । आम्हां पामरां सांभाळिलें ॥ ९ ॥

ावरून कवीच्या वर्णनशैलीचें स्वरूपही वाचकांच्या

---

# परशुराम ढवळे.

परशुराम ढवळे हा कऱ्हाडा ब्राह्मण कवि सुमारें ५० वर्षांपूर्वीं रत्नागिरी येथें होऊन गेला. याच्यासंबंधाची थोडीशी माहिती काव्यसंग्रहांत दिली आहे, तिच्या आधारानें हा लहानसा लेख लिहितों.

परशुरामाच्या बापाचें नांव बच्याजी व आज्याचें नांव राम. यानें सरस्वतीगंगाधरकृत श्रीगुरुचरित्र नामक जो प्रसिद्ध मराठी ग्रंथ आहे, त्यांतील सगळें कथानक आर्यावृत्तांत रचिलें आहे. याशिवाय 'गुरुचरित्रसार मनोरमा' या नांवाचें एक लहानसें प्रकरण या कवीनें लिहिलें आहे, तें कामदा वृत्तांत असून, त्याचे एकंदर श्लोक ९२ आहेत. आर्याबद्ध गुरुचरित्र रचण्याचें कारण कवीनें प्रथमोध्यायांत दिलें आहे तें असें:—

## आर्या.

"श्रीगुरु तुझ्या कृपेनें सुरगुरुसीं बोलतां मुका हरवी ।
अंध परीक्षी रत्नें पंगू स्पर्शिल उडोनि देह रवी ॥ १४ ॥
ऐसें तुझ्या कृपेचें जाणुनि सामर्थ्य सत्य मन्मनिं कीं ।
निश्चय केला वर्णिन तवकीर्ति धरूनि पादपद्म निकी ॥ १५ ॥
यास्तव कृपा करोनी वदवीं चरितासि तूं गुरुस्वामी ! ।
इच्छा पुरेल मम ती तुजवरि मग तो करीं न रुस्वा मी ॥ १६ ॥
वदविसि जें करिं ऐसें, देखुनि ते प्रीतिं संत मानवती ।
शीत जळीं प्रीति जशी धरिती येतां वसंत मानव ती ॥ १७ ॥
मत्पापें, तवचरिता वदवुनि मज उद्धरीं न पाहा तीं ।
आलें जरि तव चित्ता लेखनिसीं तरि धरीन पां हातीं ॥ १८ ॥
गुरुपदिं शिर ठेवुनियां, करितां स्तुति ऐसि येत नीज मला ।
तों स्वप्नीं गुरु शिरिं कर, ठेवी मग हर्ष मन्मनीं जमला ॥ १९ ॥

शिरिं कर ठेवुनि बोले, ' मी जें सांगन तीं न व्याकर्णी ।
तेंच लिही, तुज लागे शब्दाची पद्धती नव्या कर्णी ॥ २० ॥
नलगे व्युत्पत्ति तुला, मात्रासाधन करावयासहि तें ।
वदसी जें तें सज्जन पाहति जे जोडती तयांस हितें ॥ २१ ॥
आवड बहुत शशींतें, अर्पण करितां धरोनि भाव दशी ।
तैसें मज बहु हर्षे आवडतें मच्चरित्र जें वदशी ॥ २२ ॥
वदसी मच्चरिता जें तें ऐकति पढति त्यांस हो यम न ।
जाची; ईप्सित मनिंचें त्या पावुनि हर्षयुक्त होय मन ॥ २३ ॥
पारि गीत्यार्यावृत्तें मच्चरितासी वदेंचि हो मधुर ।
श्रवणें दीर्घायू दे, यज्ञाचा जेंवि देचि होम धुर ॥ २४ ॥
भागवतभारतादि श्रीरामायण अनेक आर्यांनीं ।
मोरेश्वर कवि वदला, पहावया योग्य सर्व आर्यांनीं ॥ २५ ॥
मच्चरितासि वदावें तों आयुर्दाय पूर्ण तो सरला ।
आर्या कवितासरितापूर पुढें मग तसाचि ओसरला ॥ २६ ॥
तारि आर्याघन वर्षुनि, भरिं तूं रे मच्चरित्र गंगाला ।
देईल वहावुनियां श्रुतिमात्रें सर्व अघतरंगाला ॥ २७ ॥

या आर्यांतला भावार्थ असा आहे:—कवि म्हणतात, ' मी श्रीदत्तात्रेयाची प्रार्थना केली कीं, ' हे सद्गुरो ! मी फार पातकी आहें. तुझें रसाळ चरित्र काव्यरूपानें वर्णन करावें, अशी इच्छा मला उत्पन्न झाली आहे; व मी जरी विद्वान् नाहीं, तरी तुझ्या कृपेचें सामर्थ्य असें आहे कीं, तेणेंकरून, मुकेही वाचाळ होतील. तर हे कृपासागरा, तूं मजकडून अशी काव्यरचना करीव, कीं जी पाहून संतांनीं प्रेमभरानें माना डोलवाव्या.' श्रीदत्तात्रेयाची अशी प्रार्थना करून मी निद्रित झालों, तोंच श्रीगुरूंनीं स्वप्नांत मला भेट देऊन माझ्या मस्तकीं आपला अभयकर ठेविला व सांगितलें कीं, ' तूं जरी व्युत्पन्न नसलास, तरी तुझा ग्रंथ वाचून सज्जन आनंद पावतील. मोरोपंत कवीनें भारत भागवतादि ग्रंथ

आर्यावृत्तांत रचिले व माझें चरित्रही त्याच वृत्तांत लिहिण्याचा त्याचा विचार होता, परंतु इतक्यांत त्याचें आयुष्य संपलें व त्यामुळ तो विचार तसाच राहिला. तरी माझें चरित्र आर्यावृत्तांत लिहिण्याचें कार्य आतां तूंच कर. तुला आर्यावृत्ताची माहिती नसेल तर, पिंगलकृत छंदःशास्त्रांतली आर्यावृत्ताची व्याख्या मी तुला सांगतों.' इतकें सांगून, श्रीदत्तात्रेयांनीं कवीला आर्यावृत्ताची जी व्याख्या सांगितली, ती कवीनें ३७ आर्यांत ग्रथित केली आहे. ह्या सगळ्या कथेवर कितपत विश्वास ठेवावयाचा, हें ठरविण्याचें काम वाचकांचें आहे, हें उघडच आहे.

श्रीगुर्वाज्ञेप्रमाणें सदर ग्रंथ कवीनें रचिला; त्याचे अध्याय ३९ असून आर्या ३७८३ आहेत. मोरोपंतांच्या भारत, भागवत व हरिवंश या ग्रंथांच्या खालोखाल, आर्यावृत्तांत लिहिलेला मोठा ग्रंथ ह्मटला ह्मणजे प्रस्तुतचें गुरुचरित्र हाच होय. हा ग्रंथ पूर्ण झाल्यावर, कवीनें तो शके १७८१ या वर्षीं नरसोबाचे वाडीचे सद्गृहस्थ रा०रा० कृष्णाजी नरहर वाडीकर यांजकडे, श्रीदत्तास अर्पण करण्यासाठीं पाठवून दिला. ह्या अस्सल प्रतीवर जो शेरा आहे, तो येणेंप्रमाणें:—"ह्या गुरुचरित्र आर्या परशुराम बच्याजी ढवळे वास्तव्य वेळवंड ऊर्फ हातखंबें तालुके रत्नागिरी यांनीं करून गुरुदेवदत्त यास अर्पणार्थ वाडी नरसोबाची येथें आपले चिरंजीव बाळकृष्ण यांजबराबर पाठविल्या, त्या पुजारी रामभट्ट बिन बापूभट्ट बड्ड यांचे विद्यमानें श्रीस अर्पण केल्या. या पुस्तकाचें संरक्षण व प्रशंसा रामभट्टजी यांनीं करावी. कोणास पाहिजे असल्यास याची प्रत करूं द्यावी. इतर पुजारी यांचा वारसा या पोथीवर नाहीं. मिती वैशाख शुद्ध पौर्णिमा शके सतराशें एक्यांशीं सिद्धार्थी नाम संवत्सर." या गोष्टीवरून परशुराम कवि हे श्रीदत्ताचे एक प्रेमळ भक्त होते व याच दृष्टीनें—म्हणजे भाविकपणानें—त्यांच्या ग्रंथाचें अवलोकन

केलें पाहिजे, हें उघड आहे. मोरोपंतांसंबंधानें परशुराम कवी यांचा पूज्यभाव होता हें वर दिलेल्या उताऱ्यांतील २५।२६ व २७ या आर्यांवरून स्पष्ट होत आहे. मोरोपंतांनीं आर्यावृत्तांत ग्रंथरचना करून जी प्रसिद्धि आणि लोकप्रियता संपादन केली, तिच्या लालसेनें त्या काळीं, बऱ्याच कविजनांनीं पंतांचें अनुकरण करण्याचा प्रयत्न केलेला आढळतो. प्रस्तुत ग्रंथाच्या पहिल्या भागांत, दाजीबा जोशीराव यांचें चरित्र दिलें आहे, त्यांनीं पंतांच्या आर्यारचनेचें कसें अनुकरण केलें आहे, तें त्या चरित्राच्या शेवटीं दाखविलेंच आहे. ह्याच दाजीबांचे घराण्यांत चिंतामणि जोशीराव या नांवाचे एक कवि होऊन गेले, त्यांनींही पुष्कळ आर्या रचिल्या आहेत. ह्या आर्या दाजीबा व परशुराम ढवळे यांच्या आर्यांपेक्षां अधिक सरस असून, त्या रचतांना शब्दांची फारशी ओढाताण झालेली दिसत नाहीं. परशुराम कवीप्रमाणें चिंतामणि जोशीराव यांनींही आर्याबद्ध गुरुचरित्र लिहिलें आहे व तें परशुरामाच्या गुरुचरित्रापेक्षां चांगलें उतरलें आहे. असो.

केवळ काव्य या दृष्टीनें पाहतां परशुराम कवीचें गुरुचरित्र फारसें वाखाणण्यासारखें आहे असें नाहीं. यमकपूर्तीसाठीं शब्दाची ओढाताण करावी लागली आहे, व्याकरणास असंमत असे समास बरेच आढळतात व भाषाप्रभुत्वही बेताचेंच दिसतें. तथापि एकंदरींत, ग्रंथ फार भाविकपणें लिहिला असून, तो भाविकपणानेंच वाचला असतां वाचकास खात्रीनें आनंददायक होईल, यांत मुळींच संशय नाहीं. 'नेम=अन्न, अश्मा=मेघ, बब्रु=कमळ, वस्त्रि=रात्र असे कोनाकोंपऱ्यांतले व वेदांतील अर्थानें घेतलेले अनेक शब्द मधून मधून आढळतात; यावरून कवीचा निरुक्तादिकाशीं कांहीं परिचय असावा, असें दिसतें.

'गुरुचरित्रसारमनोरमा' हें लहानसें प्रकरण आपल्या नांवाप्रमाणें खरोखरच मनोरम व भक्तिरसप्रधान आहे.

परशुराम ढवळे हा अगदीं अर्वाचीन कवि असल्यामुळें, त्याच्या संबंधाची माहिती शोध केल्यास त्याच्या गांवीं मिळण्यासारखी आहे. परंतु नुसत्या पत्रव्यवहारानें हल्लींच्या काळीं असलीं कामें होत नसल्यामुळें व त्या त्या ठिकाणीं स्वतः जाऊन शोध करण्यास लागणाऱ्या द्रव्याच्या अभावामुळें, मला या बाबतींत कांहीं एक प्रयत्न करितां आला नाहीं, याबद्दल फार वाईट वाटतें.

आतां परशुराम कवीच्या दोन्ही ग्रंथांतले कांहीं उतारे येथें देऊन, हा चरित्रलेख समाप्त करितों. श्रीगुरुचरित्राच्या द्वितीयोध्यायांत ब्रह्मदेव आणि कलि यांचा संवाद दिला आहे:—

'कलि बोले ब्रह्मयासी 'न भियें जिंकीन सर्व लोकां मी ।
धोका मी वाहें हीं रक्षूं *द्वय कोंवि जन्मलों कामी ॥ ४१ ॥
विधि सांगे 'जा आतां तूं स्वगुणांचा प्रकाश करिं महित ।
कलि बोले 'गुण माझे ऐसे कीं जें बुडेल धर्महित ॥ ४२ ॥
परधन जायाहतें, दांभिक, मत्सरकरी, सखे मज ते ।
वैरी तीर्थें सुकृता कर्ते जे धर्म हरिहरा भजते' ॥ ४३ ॥
विधि सांगे 'स्वल्पायू नर होतिल रे! तुझ्या युगामाजी
न करिति सुकृतेंहि जाईं आज्ञा पाळींच हे तुं गा! माजी ॥ ४४ ॥
काळ दुजा तुजसंगें देतों लावील हा तुला वाटे ।
साधू जनां न पीडीं, भूलोका जिंकिसी मला वाटे ॥ ४५ ॥
विरला नर पुण्यातें करिता पावेल शीघ्र परमार्थी ।
पीडूं नको तयांतें असती जे साधुसंत कामार्थी ॥ ४६ ॥
विधिस ह्मणे कलि मग तों, 'साधु जना मी कसें जि! समजावें ।'
द्रुहिण ह्मणे 'निर्लोभी गुरुभक्तही मानिं मजाचि सम जावें' ॥ ४७ ॥

---

* गुह्येंद्रिय आणि रसना.

ऐकति पुराण तीर्थें करिती जे भजति हरिस भीमातें ।
पुससी जरि पीडि न, भी त्यांतें, करि जेंवि हरिस भीमातें' ॥ ४८ ॥
पुनरपि कलि सांग ह्मणे 'समजावा मी कसा ह्मणोनि गुरु ? ।
द्रुहिण ह्मणे, 'गुरुसाम्य श्रेष्ठ दुजा नाहीं गुरु ह्मणोनी गुरु ॥ ४९ ॥
गुरुसम नसेचि कोणी, परंतु गुरुशब्द इतकियां समज ।
मोरेश्वर, वैश्वानर शिव हरि माता पितादि यांस मज ॥ ५० ॥
होतां प्रसन्न हरिहर सद्गुरु जो वाळखी तयाऽवश्य ।
होई प्रसन्न गुरु जरि हरिहर जे होति ते तया वश्य' ॥ ५१ ॥
'देवाहुन गुरु योग्य श्रेष्ठ कसा कलि ह्मणे 'मला कळवीं ।
'ऐक ह्मणे विधि 'सद्गुरु शिष्याचे भवभयासि तो पळवी ॥ ५२ ॥
मंत्रें देवपण द्विज आणिति दारूशिळादि धातूतें ।
गुरुसामर्थ्य अति असे सांगेन तदर्थ जो सुधा तूतें ॥ ५३ ॥
गुरुवांचुनि गुरुपदवी देणें न घडेचि सर्व देवांशीं ।
गुर्वेक सर्व दाता ऐशी वेदाचिही वदे वाशी ॥ ५४ ॥
कैचें श्रवण गुरुविणें पुराण तें शास्त्र आणि ते निगम ।
श्रवणें होतां ज्ञानी, समजे गुरुरूप तें पडोनि गम ॥ ५५ ॥
गुरुसम न कोणि ह्मणवुनि गुरुचा करिती सदैव जप संत ।
गुरुकीर्तिसी यदर्थी ऐकें सांगेन मी तुज पसंत ॥ ५६ ॥
गोदावरितटवासी अंगिरस मुनी तया गुणि सुपूत ।
संपन्न वेदशास्त्रें, नामहि ज्या वेदधर्म असुपूत ॥ ५७ ॥
त्यातें शिष्य बहुत परि त्या माजी मुख्य नाम दीपक तो ।
होउनि वेदपरायण प्रकाश करि कुळनिशीस दीपक तो ॥ ५८ ॥
एक दिनीं तो बोले सर्वांहि शिष्यांस बोलवून मुनी ।
पाळाल मद्वचन कीं बोलति मग सकळ ते पदा नमुनी ॥ ५९ ॥
ह्मणती 'श्रीगुरु ! आम्हां वचन तुझें मान्य गा ! श्रुतीपरिस ।
गुरुवाक्य जो न मानी जाई तो नर अधोगती परिस ॥ ६० ॥
मग वेदधर्म बोले 'करिं मी जन्मांतरीं बहु अघाला ।
तें भोक्तृत्व प्राप्ताचि, नातरि अंतीं पडेल यमघाला ॥ ६१ ॥

यास्तव अघनिस्तारा, दुःखें भोगीन या मनवदेहीं ।
ऐकतसां कीं वाक्यें माझीं देऊनियां मन वदें हीं ॥ ६२ ॥
होईन अंध कुष्ठी नेउनि मज विश्वनाथ शिव दावा ।
कोणेक या तुम्हांतें असेल सामर्थ्यवानपि वदावा ॥ ६३ ॥
सेवांगिकार करुनी माझा सोसोनियां कुकोप मला ।
रक्षील कोण सांगा, दवडिल ऐशाही सर्व पापमला ॥ ६४ ॥
तों मुख्य शिष्य दीपक बोले 'तवपापकष्ट भोगिन मी ।
करिं मज अघ अर्पण तें' वदुनि असें भक्तराज योगि नमी ॥ ६५ ॥
सच्छिष्यवचनें ऐकुनि पावे गुरुचें अपार तोष मन ।
मग बोले स्वतनूनें भोगियल्याविण न होय अघशमन ॥ ६६ ॥
याकारितां स्वशरीरीं भोगावें जें स्वपाप हा नियम ।
नातरी जो जनन मरण फेरीं घाली करोनि हानि यम ॥ ६७ ॥
यास्तव अघभोक्तृत्वा शिष्या भोगीन याच देहेंची ।
रक्षुनि मज तूं सेवा करिन असें पूर्ण वचन दे हेंची ॥ ६८ ॥
रोग्याहुनि कष्ट बहुत सेवाकर्त्यास होति पुष्कळ ते ।
तरि मज रक्षुनि सेवा करिं तूं माझी धरोनि कळकळ ते ॥ ६९ ॥
त्रिःसप्त वर्षं कुष्ठी होइन मी पंगु अंध बहिरा गा ! ।
येउनि दुःखें तुजवरि मारिन तुज मी धबाधब हि रागा ॥ ७० ॥
सोसाया शक्य असे इतकें जरि सर्व सत्य गा तूतें, ।
सेवांऽगिकारिं तरि मग होइल तवकीर्ति सत्य गातूतें ' ॥ ७१ ॥
मग सेवा करुनि म्हणे शिष्य गुरुसि नमन तो करुनि भावें ।
' तुझियाच कृपें करुनी सेवाकर्मासि मी गुरु ! निभावें ॥ ७२ ॥

लंकापति रावणानें श्रीशंकराची आराधना करून, त्याजकडून, पणास अमरत्व प्राप्त व्हावें, असा वर मिळविण्याचा प्रयत्न लविला. त्यावेळीं देवांस मोठें संकट पडलें व त्यांनीं नारदमुनीस विष्णूकडे पाठविलें. विष्णूनीं, रावणास शंकराकडे जाण्यास विलंब क अशी व्यवस्था करण्यास सांगून–

## आर्या.

दवडुनि नारद, हरि मग, अतित्वरें येउनी शिवाजवळ ।
बोले ' दैत्यावर तूं सदयेचा केंवि होसि आज वळ ? ॥ ४५ ॥
देसी दैत्यासी वर वर, तूं न करुनि विवेक लिंगातें ।
बससी थंड कसा ! नर जैसा सेवुनि निवे कलिंगातें ॥ ४६ ॥
वर देउनि दैत्या तूं माजविशी मामनेक सायास ।
पडती मर्यादा तरि उपाय योजूं मनें कसा यास ॥ ४७ ॥
शिव बोले ' श्रीहरि रे ! दैत्य भुलवि भक्तिनें कसा मातें ।
वीणा स्वशिराचा करि, सुस्वर गायी अनेक सामांतें ॥ ४८ ॥
ह्मणउनि लिंग दिलें म्यां घालुनि वचनासि गोंवि भुलीला ' ।
हरि मग ह्मणे 'तुझी हे विचित्र अति बहु बघों विभू लीला ॥ ४९ ॥
देशी तरि लिंग कधीं ? ' शिव बोले होति पांच सा नाडी ।
ठेवुनि भूवरि लिंगा मार्गीं दैत्यासि जा असा नाडीं ॥ ५० ॥

ह्या दोन उताऱ्यांवरून परशुराम कवीच्या आर्या कोणत्या दर्जाच्या आहेत, हें वाचकांच्या लक्ष्यांत येईल. अस्सल आणि त्याची नक्कल यांत जितकें अंतर असतें, तितकें जरी पंत व परशुराम यांच्या आर्यांत नाहीं, तरी पंतांच्या आर्यांपुढें परशुरामाच्या आर्या अगदीं नीरस वाटतात, असें ह्मणणें भाग आहे. तरीपण परशुरामाच्या कांहीं आर्या थेट अगदीं पंतांच्या आर्यांसारख्या चांगल्या उतरल्या आहेत. त्याचप्रमाणें कित्येक ठिकाणची त्याची यमकरचना पंतांच्या यमकरचनेइतकीच मनोहर आहे. एकंदरींत श्रीगुरुचरित्र ग्रंथ आर्यावृत्तांत रचण्याची पंतांची वास्तविक किंवा काल्पनिक इच्छा परिपूर्ण करावयास एका कऱ्हाडा जातीच्याच ब्राह्मणानें पुढें यावें, व तें काम त्यानें बऱ्याच समाधानकारक रीतीनें पार पाडावें, ही गोष्ट फार कौतुकास्पद आहे, यांत संशय नाहीं.

आतां गुरुचरित्रसारमनोरमेंतले दहा श्लोक येथें उतरून घेऊन या कवीची रजा घेतों:—

## कामदा वृत्त.

‘ वंदितों गुरो ! पादकल्हरा । भक्त जी ! तुम्ही हा करा धरा ।
ज्ञान वर्णना या बरें तरी । हे गुरो ! दयाब्धे नृकेसरी ॥ १ ॥
नाशिसी सदा भक्त विघ्न रे, । दर्शनें तुझ्या पापि जो तरें ।
प्रार्थितों तुला जोडिल्या करीं । हे गुरो ! दयाब्धे नृकेसरी ॥ २ ॥
तारिले बहु त्वां अघाचळ । लागलें नसे एकही पळ ।
ख्याति हे उरे हाचि कांऽतरीं । हे गुरो ! दयाब्धे नृकेसरी ॥ ३ ॥
भक्त जो तुझा नामकर्णि तो । कष्ट पावतां नाम कर्णि तो ।
ऐकुनि तुझें ध्यान अंतरीं । हें गुरो ! दयाब्धे नृकेसरी ॥ ४ ॥
दर्शना निघे ध्यात हृन्नभीं । नेत्र वाहती प्रेमिच्या नभीं ॥
चालतां पथें स्तोत्र तो करी । हे गुरो ! दयाब्धे नृकेसरी ॥ ५ ॥
भेटला पथीं त्यास सिद्ध तो । शिष्य जो तुझा कीं प्रसिद्ध तो ।
ठेवितो शिरा तत्पदावरी । हे गुरो ! दयाब्धे नृकेसरी ॥ ६ ॥
सिद्ध तो करा त्याचिया शिरीं । ठेवुनी कृपा त्यावरी करी ।
त्वत्कथा वदे त्यास वैखरी । हे गुरो ! दयाब्धे नृकेसरी ॥ ७ ॥
श्रीगुरूपदा सेवि दीपक । आदि ते कथी पापलोपक ।
अंबरीषआख्यान त्यावरी । हे गुरो ! दयाब्धे नृकेसरी ॥ ८ ॥
त्यावरीहि दत्तावतारसी । भक्त जे महा त्यांस तारिसी ।
ते कथा वदे सिद्ध त्यावरी । हे गुरो ! दयाब्धे नृकेसरी ॥ ९ ॥
तोचि दत्त तूं त्या पिठापुरीं । पूजितां तुला विप्रअंतुरीं ।
पुत्र होसि श्रीपाद तद्धरीं । हे गुरो ! दयाब्धे नृकेसरी ॥ १० ॥

या गुरुचरित्र-सार मनोरमेंत गुरुचरित्रांतल्या सगळ्या कथा संक्षेपानें दिल्या आहेत. या कवीचे हे दोन्ही ग्रंथ पाहिले म्हणजे श्रीदत्तात्रेयाचा तो एक प्रेमळ आणि श्रद्धावान् भक्त होता, याविषयीं संशय राहात नाहीं. वरील श्लोकांपैकीं तिसऱ्या श्लोकाच्या प्रारंभींची ‘ तारिले बहु त्वां अघाचळ ’ ही ओळ वाचतांच, पंतांच्या केकावलींतील ‘ अघाचळहि तारिले बहु तुवांचि ’ या वाक्याची आठवण

झाल्याशिवाय राहात नाहीं; व यावरून प्रस्तुत कवींनें पंतांची कांहीं कविता चांगली मननपूर्वक वाचली होती, असें वाटतें. परशुराम कवीची पंतांसंबंधानें केवढी पूज्यबुद्धि होती हें या लेखाच्या आरंभीं दिलेल्या आर्यावरून व्यक्त होतच आहे.

---

## हंसराजस्वामी.

हे प्रसिद्ध सत्पुरुष सुमारें ६० वर्षांपूर्वीं मोगलाईत होऊन गेले. भारतवर्षीय अर्वाचीन कोशाचे कर्ते कै. रघुनाथ भास्कर गोडबोले हे हंसराजस्वामींचे शिष्य होते, त्यांनीं सदर ग्रंथाच्या १३१ व्या पृष्ठावर स्वामींचें लहानसें चरित्र दिलें आहे, त्याच्या आधारानें प्रस्तुत लेख लिहिला आहे.

मोगलाईत परभणी नामक गांव आहे, तेथें गंगाधरपंत नामक एक देशस्थ आश्वलायन ब्राम्हण राहात असत. हे घरचे चांगले संपन्न होते. त्यांची पत्नी रेणुकाबाई हिच्या पोटीं तीन पुत्र झाले, त्यांतील मधले जे नारायणराव तेच पुढें हंसराजस्वामी या नांवानें प्रसिद्धीस आले. ह्यांनीं संन्यास घेतला होता. संन्यासाश्रमांतलें त्यांचें नांव 'नारायणतीर्थ' हें होय. नारायणराव यांचा बांधा फार उंच किंवा ठेंगणा व अतिस्थूल किंवा अतिकृश नसून मध्यम प्रतीचा होता. त्यांची अंगकांति पिंवळट गौरवर्णाची होती; नाक सरळ, डोळे मोठे, पावलें लहान आणि आवाज खणखणीत असे. यांची बुद्धि इतकी विलक्षण तीव्र होती कीं, कोणताही विषय असो, तो एकदां ह्यांच्या नजरेखालून गेला कीं त्याचें ज्ञान त्यांस झालेंच म्हणून समजावें! नारायणरावांस लवकरच नोकरी मिळाली व त्यांचें

लग्नही झालें. पण त्यांची प्रावृत्ति प्रपंचापेक्षां परमार्थाकडे विशेष होती. पुढें, लक्ष्मणराव या नांवाचे एक परमसात्विक व ब्रह्म-निष्ठ पुरुष मोगलाईंत मामलेदार होते, त्यांजकडून नारायणरावांनीं गुरूपदेश घेतला व ते त्यांचे पट्टशिष्य झाले. नारायणरावांची पत्नी लक्ष्मीबाई ही प्रथमतःच प्रसूत होऊन पुत्रासहित मरण पावली, त्या निमित्तानें नारायणरावांनीं आपली पेषकाराची नोकरी सोडून दिली व पुढें गुरुसान्निध राहून त्यांच्या सेवेंत त्यांनीं बरेच दिवस घालविले. कांहीं दिवसांनीं गुरूंच्या आज्ञेनें ते देशपर्यटनास निघाले. प्रथम माहुरास जाऊन तेथून ते धाराशिवावर उतरले; तेथें त्यांस बाळनाथ नामक शिष्य मिळाला. हा बाळनाथ कल्याण-स्वामीसारखा मोठा गुरुभक्त होता.

पुढें लवकरच नारायणराव पंढरीस गेले व तेथें त्यांनीं चतुर्थाश्रम घेतला. पंढरपुर सोडून ते दुसरीकडे जाणार होते, इतक्यांत डोमगांवकर* सखारामबावा यांनीं त्यांस आपल्या गांवीं नेऊन ठेविलें व तेथें आठ नऊ वर्षें त्यांची इतकी उत्तम प्रकारें सेवा केली कीं त्यांच्या कृपाप्रसादेंकरून तेही शेवटीं मोठे सत्पुरुष झाले. नंतर

---

* **सखारामबोवा डोमगांवकरः**—"कल्याण गोसावी यांच्या शिष्यपरंपरेंत हा एक मोठा नामांकित पुरुष होऊन गेला. वेदांतपर कीर्तन करून श्रुतिस्मृतिप्रतिपाद्य वक्तृत्व करणारा पुरुष यासारखा अलीकडच्या काळांत मागें झाला नाहीं व पुढें होणार नाहीं. आम्ही यांचें कीर्तन स्वतः ऐकिलेलें आहे. वारकरी मंडळींत नामांकित कीर्तन करणारे भाऊ काटकर यांस जें कीर्तनाचें उत्तम वळण लागलें, तें येथूनच लागलें होतें. एवढी यांची योग्यता असतांही खऱ्या खऱ्या सत्पुरुषाच्या ठिकाणीं यांची भक्ति अवर्णनीय होती. यांचे चिरंजीव दासबावा हे हल्लीं डोमगांव येथें विद्यमान आहेत."

(शके १८०२)

**भारतवर्षीय अर्वाचीन कोश.**

थोड्याच दिवसांनीं सखारामबावा हैदराबाद येथें जाऊन समाधिस्थ झाले. नंतर हंसराजस्वामी *परंडा येथें येऊन राहिले. तेथें ते 'करतलभिक्षा तरुतलवासः' अशा स्थितींत असतां कांहीं विकृतीनें त्यांचे पाय लुळे होऊन त्यांची त्वरित गमनशक्ति कुंठित झाली. त्यामुळें आपल्या शिष्यांसहवर्तमान शेवटपर्यंत ते परंडा येथेंच राहिले.

हंसराजस्वामींचें ज्ञान जसें अगाध होतें, त्याचप्रमाणें त्यांचें वैराग्यही प्रखर होतें. ते आपल्या वयाच्या ९० व्या वर्षीं शके १७७७ वैशाख शुद्ध ८ या दिवशीं, परंडा येथें समाधिस्थ झाले. हंसराजस्वामींच्या एका शिष्यानें हंसपद्धति नामक एक ग्रंथ केला आहे, त्याचीं ११ अष्टकें आहेत. या ग्रंथाच्या ७ व्या अष्टकांत हंसराजस्वामींचें विस्तृत चरित्र दिलें आहे. स्वामी समाधिस्थ झाले, त्यावेळीं पूर्णानंद व योगानंद हे दोन शिष्य त्यांच्या सन्निध होते, ह्यापैकीं योगानंद हे देशस्थ आश्वलायन ब्राह्मण, सोनपेठ येथें राहत असत. हे मोठे विद्वान् असून विद्यारण्यकृत पंचदशीवर यांची मराठी ओंवीबद्ध टीका आहे. यांची समाधि शके १७८८ च्या सुमारास सोनारी येथें झाली. हंसपद्धति व योगानंदकृत मराठी पंचदशी हे दोन्ही ग्रंथ अप्रकाशित आहेत. हंसराजस्वामींनीं जे ग्रंथ लिहिले, ते येणेंप्रमाणें:—

१ **कथाकल्पलता**—याचीं अठरा पूर्व व अठरा उत्तर प्रकरणें आहेत. वेदांतविषय ज्यांस मुळींच गोड लागत नाहीं अथवा समजत नाहीं, त्यांस त्याची गोडी लागावी अशा प्रकारच्या रूपकाच्या तऱ्हेनें यांत गोष्टी सांगितल्या आहेत. याची ओंवीसंख्या सुमारें १०,००० आहे.

---

* हंसराजस्वामी परंडा येथें असतां, भारतवर्षीय अर्वाचीन कोशाचे कर्ते कै० रघुनाथराव गोडबोले यांनीं शके १७७२ च्या सुमारास त्यांजकडून गुरूपदेश घेतला.

२ वेदेश्वरी—ही संस्कृत शिवगीतेवर मराठी ओवीबद्ध टीका आहे. हा ग्रंथ छापून प्रसिद्ध झाला असून, त्याची ग्रंथसंख्या सुमारें ६००० आहे.

३ लघुवाक्यवृत्ति—श्रीमच्छंकराचार्यकृत संस्कृत लघुवाक्यवृत्तीवर मराठी ओवीबद्ध टीका. ओवीसंख्या सुमारें ५६०० आहे. हा ग्रंथ छापून प्रसिद्ध झाला आहे.

४ सदाचार—आचार्यांच्या संस्कृत सदाचार ग्रंथावर प्राकृत ओवीबद्ध टीका. ओवीसंख्या २०६४. हाही ग्रंथ प्रसिद्ध झाला आहे.

५ आगमसार—उपनिषदांतील सिद्धांतांचें सप्रमाण विवेचन या ग्रंथांत केलें आहे. ओवीसंख्या ३५००. पांच समासांची एक पंचिका, अशा याच्या १४ पंचिका आहेत व सात सात पंचिकांचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे त्याचे दोन विभाग आहेत. हा ग्रंथ स्वामींनीं शके १७६१ त लिहिला.

६ ईशावास्योपनिषदावर मराठी ओवीबद्ध टीका. ग्रंथसंख्या५००.

७ संकेतकुबडी—या ओवीबद्ध ग्रंथांत दासबोधाच्या २० समासांतला सगळा भावार्थ सांगितला आहे. याच्या ओंव्या सुमारें ६५० आहेत.

८चूडालाख्यान—संस्कृत योगवासिष्ठांतर्गत चूडालाख्यानावर अभंगबद्ध टीका. याचीं बावीस शतकें असून अभंगसंख्या २२०० आहे.

९ तत्त्वझाडा—हा गद्यग्रंथ वेदांतपर आहे.

१० अमृतानुभव समश्लोकी—ज्ञानदेवकृत अमृतानुभवावर समश्लोकी ओवीबद्ध टीका संख्या १०००.

११ वेद नामक वेदांतपर पदें सुमारें १००.

ह्या अकरा ग्रंथांची श्लोकसंख्या सुमारें ३५००० होते, यावरून हंसराजस्वामींच्या अत्राढव्य ग्रंथरचनेची वाचकांस सहज कल्पना होईल. ग्रंथरचनेची पद्धति 'पदच्छेदः पदार्थोक्तिर्विग्रहो वाक्ययोजना। आक्षेपस्य समाधानं व्याख्यानं पंचलक्षणं ॥' या संस्कृत श्लोकांत सांगितली आहे, तिला अनुसरून हंसराजस्वामींनीं आपले ग्रंथ लिहिले आहेत. आरंभीं मंगलाचरण करून, पुढें अनुबंध चतुष्टय सांगून नंतर मूळ ग्रंथाचें व्याख्यान करण्याची ही पद्धति फक्त हंसराजस्वामींच्याच ग्रंथांत आढळते. हंसराजस्वामींची पारमार्थिक योग्यता फार मोठी होती, त्यामुळें त्यांचे ग्रंथही तशाच योग्यतेचे आहेत. त्यांच्या ग्रंथांसंबंधानें भारतवर्षीय अर्वाचीन कोशकर्त्यांनीं असें लिहिलें आहे:—"हे ग्रंथ इतके उत्तम आहेत कीं, ज्या कोणाला त्याच्या गुरू-पासून कांहीं श्रवण मात्र झालें असेल आणि मनन—निदिध्यास झालें नसून गुरूचा वियोग झाला असेल, त्यानें आपल्या अधिकारा-प्रमाणें ते ते ग्रंथ विचारपूर्वक पाहिले असतां व त्यांत लिहिल्या-प्रमाणें साधन केलें असतां स्वरूपसाक्षात्कार हटकून व्हावयाचाच. म्हणून ह्यांच्या ग्रंथांची बरोबरी, वेदांतप्रकरणीं कोणत्याच प्राकृत ग्रंथास करितां येत नाहीं असें मार्मिक लोकांचें म्हणणें आहे." भारत-वर्षीय अर्वाचीन कोशकार हंसराजस्वामींचे प्रत्यक्ष शिष्य होते, तेव्हां वरील अभिप्रायाच्या प्रथम भागांत त्यांनीं आपला स्वतःचा अनुभवच व्यक्त केला असेल, असें मानण्यास हरकत नाहीं. द्वितीय भागांतील विधान मात्र थोडेंसें आक्षेपजनक होईल असें वाटतें; कारण साधु म्हटले म्हणजे सगळे सारखे, त्यांचे मोक्षसंपादनाचे मार्ग कदाचित् भिन्न असले, तरी त्यांचें ध्येय एकच असणार. अशा स्थितींत ज्ञानदेव, मुकुंदराज, दासोपंत, शिवकल्याण, रंग-नाथ, केशवस्वामी, रामदास, तुकाराम, एकनाथ, सोहिरोबा, जय-राम, शेखमहमद, इत्यादिकांच्या ग्रंथांशीं हंसराजस्वामींच्या ग्रंथांची

तुलना करून त्यांची प्रतवारी लावीत बसण्यांत काहीं हंशील नाहीं, असें माझ्या अल्पबुद्धीस वाटतें. वर लिहिलेले सगळेच कवि ज्ञानसंपन्न आणि अनुभवी असे सत्पुरुष होते व त्यांनीं आपापला अनुभव आपापल्या ग्रंथांत स्पष्टपणें कथन केला आहे, अर्थात् त्यांतला अमका वरिष्ठ आणि तमका कनिष्ठ असा भेदभाव बाळगण्याचा आमचा अधिकारच नाहीं. असो.

हंसराजस्वामी हे रामदासी संप्रदायी असून, समर्थांच्या दासबोधावर 'संकेत कुबडी' नामक एक लहानसा ग्रंथ त्यांनीं लिहिला आहे, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. हा ग्रंथ फारच उत्कृष्ट आहे. सगळा दासबोध वाचण्याइतकी ज्यांची वाचनशक्ति जागृत नसेल, त्यांनीं हंसराजस्वामींची ही ' 'संकेत कुबडी ' तरी अवश्य वाचावी. हंसराजस्वामींचा केवळ भक्तिमार्गावर थोडासा कटाक्ष असावा, असें त्यांच्या ग्रंथांतील कांहीं उद्गारांवरून वाटतें. असो. आतां त्यांच्या ग्रंथांतील कांहीं वेंचे येथें देतों.

अभयं सर्व भूतानां ज्ञानमाहुर्मनीषिणः ।
निजानंदे स्पृहा नान्ये वैराग्यस्यावधिर्मतः ॥ १६ ॥

**सदाचार.**

## टीका.

निर्भयता सर्व भूतांची । ज्ञाते बोलती ज्ञान हेंचि ।
अवधी जाणा वैराग्याची। ब्रह्मीं स्पृहा अन्य नसे ॥ १ ॥
भूत म्हणजे झालें । भ्रमेंकडून उद्भवलें ।
मायादि नामरूप जेतुलें । जीवेशांसह ॥
इतुक्यांचें असतां भय । तें ज्ञानही न होय ।
म्हणोनि बोलिजे निर्भय । ज्ञान तेंचि ॥ ३ ॥
येथें कोणी मंदमती । एकाचें एक भाविती ।
देह अमर करूं म्हणती । योगाभ्यासें ॥ ४ ॥

क्रूर जाती व्याघ्रसर्प । अथवा वायु अग्नि आप ।
अध्यात्मादि ताप । देहा न व्हावे ॥ ५ ॥
भूतमात्र जितुकें । तेणें देह नासूं न शके ।
तया बोलती कौतुकें । ज्ञान ऐसें ॥ ६ ॥
तरी ऐसें कदा न घडे । देह कधीं तरी पडे ।
काळाचे हातीं सांपडे । तेव्हां निर्भय कैसा ? ॥ ७ ॥
अरे हें जितुकें उत्पन्न । भय तया असे दारुण ।
तेथें देहाची गणती कोण । निर्भयत्वाची ॥ ८ ॥
वायु चंद्र आणि अर्क । भयरूपचि असे पावक ।
मृत्यूसीही असे धाक । परमेश्वराचा ॥ ९ ॥
माया अविद्या नसती । जीवेशही त्यासवें जाती ।
तेथें असे काळभीति । कल्पांतरूप ॥ १० ॥
तस्मात् जें जें दिसे भासे । शून्यासहित सर्व नासे ।
काळही भय वाहतसे । महाकाळाचें ॥ ११ ॥
असो हें सर्व भयरूप । निर्भयत्व नसे अल्प ।
एक जाणिजे स्वस्वरूप । अद्वय जें कां ॥ १२ ॥
तेंचि एक निर्भय । येर हें बोलणें काय ।
द्वैतीं अवश्य भय होय । बोलिली श्रुति ॥ १३ ॥
बहु कासया बोलणें । ब्रह्म जाणे साधकपणें ।
तेंही निर्भय न होणें । भिन्नत्वामुळें ॥ १४ ॥
यास्तव जो ब्रह्म अभिन्न । सांडूनियां ध्यातृध्यान ।
होय निजांगें आपण । तेंचि ज्ञान निर्भय ॥ १५ ॥
स्वयें अंगें ब्रह्म झाला । मग कोणाचें भय त्याला ।
सर्व नामरूपभ्रमाला । झाला अधिष्ठान ॥ १६ ॥
सर्पे रज्जूच खादली । हे वार्ता नाहीं ऐकिली ।
तेंवि ब्रह्मीं भीति नाहीं बोलिली । नामरूपाची ॥ १७ ॥
तस्मात् निर्भय ब्रह्मरूप । तेंचि ज्ञात्याचें स्वरूप ।
सर्व भूतांचें आपेंआप । अभय जालें ॥ १८ ॥

पूर्ण ज्ञाते ऐसें बोलती । हेचि ज्ञानाची चरम स्थिति ।
यावीण अन्य जें म्हणती । तें विपरीत ज्ञान ॥ १९ ॥
ऐशी हे सीमा ज्ञानाची । तुज निरूपिली साची ।
आतां अवधी वैराग्याची । सावध ऐकावीं ॥ २० ॥
नामरूप त्यागावें । अंगें ब्रह्मचि होआवें ।
स्वानुभवें तृप्ति पावावें । स्पृहा ऐशी ॥ २१ ॥
निजानंद रूप पाहुनी । जें जें दिसे भिन्नपणीं ।
तें तें मिथ्यात्वें मानी । शुक्ति रजत जैसें ॥ २२ ॥
करोनियां खपुष्पमाळा । कोण शोभा घालितां गळां ।
तैसा हा मायिक मेळा । येथें स्पृहा कैंची ॥ २३ ॥
तस्मात् मायिकाचा त्याग । ब्रह्मरूप होय अंग ।
हेचि अवधी उमग । वैराग्याची ॥ २४ ॥
विचारें सर्व त्यागिलें जेणें । त्यागितांही उरूं न देणें ।
साधकही अभिन्नपणें । हेंचि वैराग्य ॥ २५ ॥
ब्रह्मादि तृणांत । अर्थात् होती मिथ्याभूत ।
मीपणाचा होतां अंत । वैराग्य लाभे ॥ २६ ॥
ऐशिया वैराग्याविण । कदां न राहे ब्रह्मज्ञान ।
आणि पूर्ण नसतां ज्ञान । वैराग्यही नव्हे ॥ २७ ॥
तस्मात् ज्ञान वैराग्य दोन्ही । एकमेकां साह्यपणीं ।
जैसे अंधपंगू मिळोनी । मार्ग चालती ॥ २८ ॥
ज्ञान पंगू वैराग्याविण । वैराग्य अंध नसतां ज्ञान ।
एवं मिळती हे जरी दोन । समाधान तेव्हां ॥ २९ ॥
वैराग्यें नामरूप त्यागावें । ज्ञानें ब्रह्म तें जाणावें ।
पुढें द्वैत टाकून व्हावें । निजांगें ब्रह्म ॥ ३० ॥
हें ऐकोनी देवदत्त । नम्रपणें प्रश्न करित ।
जरी निजांगें ब्रह्म होत । तया लाभ दोहींचा ॥ ३१ ॥
तरी आतां जी सद्गुरू । सांगा उपाय कोणता करूं ।
निजांगें ब्रह्म निर्धारू । होईन कैसा ॥ ३२ ॥

गुरु म्हणती आधीं जाणावें । ब्रह्मज्ञान प्रांजळ व्हावें ।
मग हळूहळू स्वभावें । होईजे अंगें ॥ ३३ ॥
ब्रह्मज्ञान होय कैसें । आक्षेपिसी जरी ऐसें ।
तरी श्रवणमननेवीण नसे । साधन दुसरें ॥ ३४ ॥

सदाचार ग्रंथाच्या शेवटीं हंसराजस्वामी म्हणतातः—

एवं शंकरें वेदार्थ संस्कृतीं । काढिला वेदांतसंमतीं ।
त्याचाची अर्थ हा प्राकृतीं । हेहि कृति स्वामीची ॥ १ ॥
ग्रंथ संपतां स्तुति उत्तरें । बोलताती अपारें ।
परी अर्थासी कारण येरें । चाड नाहीं ॥ २ ॥

ग्रंथसमाप्तीच्या वेळीं ग्रंथपठणाची फलश्रुति सांगण्याचा कांहीं कवींचा प्रघात आहे; पण हंसराज म्हणतात ' आपल्या ग्रंथाची आपणच स्तुति करावी, हें प्रशस्त नाहीं; ज्या हेतूनें ग्रंथरचना केली, तो हेतु कितपत सिद्ध झाला, हें पाहावें म्हणजे झालें.'

हा सदाचार ग्रंथ निर्णयसागर छापखान्याच्या मालकांनीं, हंसराजस्वामींच्या एका शिष्यानें शके १८०४ मध्यें केलेल्या एका प्रतीवरून छापला आहे. प्रतीच्या शेवटीं शिष्य म्हणतोः—

'हा ग्रंथ आचार्यें आरंभितां । मंगल केलेंसे स्वमुखता ॥
त्याहूनें मुळामाजी इतर नसतां । जें कां होतें अधिक ॥ १ ॥
तें अधिक मंगल शंकरानंदाचें । जें नव्हे मुख्य शंकराचार्यांचें ।
काज नसे येथें तयाचें । हें हंसरायें जाणून ॥ २ ॥
**मजशीं आज्ञापिलें येऊन । स्वप्नामाजी दृष्टांत देऊन ।**
कीं संख्या तें करीं न्यून । सश्लोक सटीक ॥ ३ ॥
इतुकेनें आम्हां संतोष । होईल जाणून विशेष ।
प्रति करविली हे अशेष । सकल बुधवरदें हंसांकितें ॥ ४ ॥
शके अठराशें चारोत्तरीं । श्रावणमासीं सुदिनाभीतरीं ।
लेखन पूर्ण झालें निर्धारीं । हंसकृपें करोनी ॥ ५ ॥

वाक्यवृत्ती ग्रंथांत हंसराजस्वामींनीं परमेश्वराची व्याख्या सांगितली आहे:—

ज्याच्या भयें सूर्य चंद्र चालती । ज्याच्या भयें वायू प्राण वाहती ।
ज्याच्या भयें अग्नीसी ज्योति । मृत्यु धांवे ज्या भयें ॥ १ ॥
भूमीतें धारण द्रवत्व आपीं । काळही युगादि क्षण मापी ।
ब्रह्मा विष्णू शिवप्रतापी । जयाच्या भयें ॥ २ ॥
ऐस अंतर्यामीं एकला । अंतरीं नियामकत्वें राहिला ।
सर्वं नियंतिया करूं लागला । नियंतृत्व ॥ ३ ॥
सर्वांचें ज्या ज्या रीतीं होणार । त्या त्याचा प्रेरक निर्धार ।
त्यावांचून तृणही साचार । पडिलें न हाले ॥ ४ ॥
ऐसा नियंता सर्वांमाजी । अलिप्तत्वें राहून सहजीं ।
प्रेरणा करी होणार जी जी । ब्रह्मादि कीटकांत ॥ ॥
स्फूर्ति विद्याविद्या ज्ञानाज्ञान । मनबुद्धि इंद्रियप्राण ।
हें ब्रह्मादि कीटकांत देहीं समान । असे जयापरी ॥ ६ ॥
तैसेंचि बुद्धींत प्रतिबिंब जयाचें । तो जीवजीवन करी जडाचें ।
वृत्तींत भासकत्व तया ईशाचें । नाम ईशन शक्तीस्तव ॥ ७ ॥
ईशन म्हणिजे प्रेरणा करावी । होणाराऐशी बुद्धि योजावी ।
त्या रीती जीवें सुख–दुःखें भोगावीं । पराधीनत्वें ॥ ८ ॥
स्वतंत्रपणें प्रेरणा करी । परी कर्तृत्वाचा अभिमान न धरी ।
म्हणून अलिप्त निरहंकारी । बंधन न पावे ॥ ९ ॥
एवं रज–सत्व–तमात्मक । त्रिगुण उत्पत्ति स्थिति लयकारक ।
यया तीन्ही गुणांसि प्रवर्तक । तो येक ईश्वर ॥ १० ॥
तरी तो ईश्वर कोठें राहतसे । त्रिगुणांसी कैसा प्रेरीतसे ।
म्हणाल तरी अवधारा अल्पसें । बोलोनि दाऊं ॥ ११ ॥
ईश्वर जरी सावयव असता । तरी देहाबाहेरी म्हणों येता ।
जेवीं बुद्धि तेथें जीव ऐता । तेवीं स्फूर्ति तेथें ईश्वर ॥ १२
बुद्धींत अविद्येस्तव पडिलें । प्रतिबिंब तें जीवत्वा पावलें ।
तेंवीच विद्यामायेनें चैतन्य फळलें । स्फुर्तींत तो ईश्वर ॥ १३ ॥
जीवासी स्वतंत्रता असेना । कारण कीं कल्पिलें तैसें घडेना ।
म्हणोनि ईश्वर करीतसे प्रेरणा । प्रारब्ध उदया ऐसी ॥ १४ ॥
प्रारब्धभोग असे जीवासी । तें सुख–दुःख नव्हे ईश्वरासी ।

म्हणोनि जीव नव्हे तो स्वतंत्रत्वेंसी । प्रेरणा मात्र करी ॥ १५ ॥
जीवाचें होणार नव्हे स्वाधीन । परतंत्रत्वें भोगी आपण ।
म्हणून प्रेरक एक असे ईशान । चालक बुद्धीचा ॥ १६ ॥
असो जीव जैसा बुद्धिआंत । राहत असे सदोदित ।
तेंवींच ईश्वर गुणांसहित । स्फूर्तीत वसे ॥ १७ ॥
ब्रह्मादि कीटकांत एकला । अंतर्यामित्वें ऱ्हदयीं राहिला ।
अलिप्तपणें नियंता सर्वांला । असे स्वसामर्थ्यें ॥ १८ ॥

हंसराजांनीं कुबडी दासबोध नामक ग्रंथ लिहिला आहे, त्याच्या आरंभीं तो ग्रंथ लिहिण्याचें कारण त्यांनीं असें सांगितलें आहे:—

श्रीसज्जनगडनिवासी । जो कां सच्चित्सुखाची राशी ।
वर्णावें तयाचे स्वरूपासी । तरी अनिर्वाच्य ॥ १ ॥
मुमुक्षु साधक चातक जन । तयांचें व्हावें समाधान ।
वळोनी कृपेचा घन । दासबोधीं जीवन वर्षला ॥ २ ॥
पाहतां दासबोधाच्या अर्था । विचार नसे वेदांतापरता ।
निषेधिलें योगसांख्यादिकमतां । कर्तव्यता करणें कायसें ॥ ३ ॥
असो, येथें स्तवनासी । रिघाव नाहीं वाचेसी ।
साधकें येथींच्या अर्थासी । अनुभवोनि पहावें ॥ ४ ॥
नोहे इतर कथा अदृष्टफळ । प्रतीत भोजनासी केवळ ।
आतां ग्रंथींचें तात्पर्य सकळ । अल्पसंकेतें आकळूं ॥ ५ ॥
ग्रंथींचें तात्पर्य न जाणती । कोणी समुच्चयवाद म्हणती ।
अथवा त्रिकांडही काल्पिती । कोणी म्हणती व्यवहारज्ञान ॥ ६ ॥
ज्ञानहीन जे आंधळे । असतां सूर्य न देखती डोळे ।
तरी सूर्याचें तेज झांकोळे । मध्यान्हीं काई ॥ ७ ॥
असो आतां हें बहुत । जयासी साधणें आत्महित ।
तेणें दासबोधींचा निश्चितार्थ । गुरुमुखें आयकावा ॥ ८ ॥
तेथें अज्ञानाची बोळवण । ज्ञानाचें होतें विज्ञान ।
आणि अनिर्वाच्य समाधान । हे फळश्रुति हे ग्रंथीं ॥ ९ ॥
ग्रंथाचे पहातां वीस दशक । समास तरी शतक ।
परी इतुकियांचें तात्पर्य एक । जें अनिर्वाच्य अपरोक्ष ॥ १०
प्रथमापासूनि विसांवरी । संकेत दाविजे निर्धारीं ।
अनुबंध चतुष्टयाची परी । दाविली प्रथम समासीं ॥ ११ ॥
आतां नित्यानित्यविवेक । निरूपिला दोन्ही शतक ।

इहामूत्रार्थ फळभोगविरक्ति निःशंक । तृतीय दशकीं ॥ १२ ॥
शमदमादिक संपत्ति । ते दाविली नवविध भक्ती ।
आतां मुमुक्षुत्वादि आकळे मती । तो दशक पांचवा ॥ १३ ॥
साधनचतुष्टयसंपन्न झाला । तो साह्यावियाचा अधिकारी भला ।
अनिर्वाच्य समाधानी बोधला । दशमसमासीं ॥ १४ ॥
दासबोध आणि ज्ञानदशक । हे ज्ञानविज्ञानाचे जनक ।
ऐसा पूर्वार्धीं विवेक । व्यतिरेकेंसी पहावा ॥ १५ ॥
आतां ग्रंथाचें उत्तरार्ध । नित्य अपरोक्ष स्वतःसिद्ध ।
जे जे दशकींचा अनुवाद । ते ते दशकीं बोलिला ॥ १६ ॥

**रामदासी कुबडी, दशक १ ला.**

या ग्रंथाच्या शेवटीं हंसराजस्वामी म्हणतातः—

भोजनीं तृप्ति होत । तैसें ग्रंथाचें फळित ।
जें कां निश्चळ सदोदित । परब्रम्ह ॥ ३७ ॥
जें आदिअंतीं जेथें तेथें । असतचि असे सभोंवतें ।
आकाश निर्मळ निश्चळातें । दृष्टांतहीन ॥ ३८ ॥
व्यापकपणें आखडे । हें बोलणेंचि वांकुडें ।
व्याप्यावीण व्यापक कोडें । कोणास म्हणावें ॥ ३९ ॥
दृश्य नाहीं भास नाहीं । गुण नाहीं माया नाहीं ।
नाहीं नाहीं बोलणें नाहीं । शून्यासहित ॥ ४० ॥
झालें समाधानाचें फळ । हिशेब मायेचा झाला सकळ ।
निर्गुण ब्रह्म जें निश्चळ । तें अंतरीं बिंबलें ॥ ४१ ॥
भक्तांचेनि अभिमानें । कृपा केली दाशरथीनें ।
समर्थकृपेचीं वचनें । तो हा दासबोध ॥ ४२ ॥
उतरावया चंचल सागर । दासबोध झाला थोर ।
साधक पावती पैलपार । कुबडी तेथें होडगें ॥ ४३ ॥
श्रीरामदासीं अति आवडी । हातीं धरिली असे कुबडी ।
तदर्थीं शत श्रोतीं गाढी । अखंड जवळी ठेविती ॥ ४४ ॥
इतिश्री संकेत कुबडी । दासबोधींचें सार निवडी ।
वांकुडी परी आवडी । श्रीरामदासा ॥ ४५ ॥

एकंदरींत, हंसराजस्वामीची वाणी वेदांतविषयवर्णनांत अगदीं अस्खलित रीतीनें चालते, यांत संशय नाहीं.

मागें ज्या हंसपद्धति ग्रंथाचा उल्लेख केला, तो ग्रंथ हंसराज-स्वामीचे शिष्य ' चिमणकवि यांनीं लिहिला आहे. हे अकलनुर येथील राहणारे, जातीचे वाजसनेयी देशस्थ ब्राह्मण. यांनीं कांहीं दिवस न्यायगृहांत सनदी वकिलाचें काम केलें होतें. पुढें हंसराज स्वामीचा अनुग्रह झाल्यावर वकिली सोडून ते कीर्तन करूं लागले. यांस गाण्याचें अंग असून, कविताशक्तीही चांगली होती. हंसराज स्वामींचे हे तिसरे शिष्य होत. हंसपद्धति ग्रंथाचीं आठ अष्टकें असून ओवीसंख्या ५००० आहे. या ग्रंथांत गुरुपरंपरावर्णन आहे. चिमणकवींचें जन्म अकुळनेर येथें शके १७३५ त झालें व शके १७९४ मध्यें बेगमपुरा येथें ते समाधिस्थ झाले. बेगमपुऱ्यास त्यांचा मठ अद्याप आहे. ह्यांचें मूळचें नांव व्यंकोबा. हंसराजस्वामींवर यांनीं एक आरती केली आहे, ती अशी:—

जयजयजयजय आरति सद्गुरु नारायणहंसा ।
आरति ओवाळितांचि देहबुद्धि तुरे सहसा ॥ ध्रु० ॥
मायाविपिनीं बहु जिव भ्रमले उमजेना कोणा ।
व्यवहारें सुखदुःख कष्ट भोगिती नाना ॥
या तळमळिची सद्गुरुलागीं आली बहु करुणा ।
म्हणुनी समर्थ व्यक्ति धरोनी उपदेशिति ज्ञाना ॥ १ ॥
दर्शनमात्रें अधिकारातें पावती सकळ ।
व्यतिरेकानें निजरुप दाउनि तोडिति भवजाळ ॥
तेंचि अन्वयें पाहतां विरती सर्वहि तळमळ ।
यास्तव निजपदकमळीं लोळे चिमणेसें बाळ ॥ २ ॥

ह्या हंसपद्धति ग्रंथाचीं आठ अष्टकें चिमणकवींनी रचल्यावर, परंडा येथील राहणारे संजीवनकवि यांनीं आणखी तीन उपाष्टकें लिहून तीं त्या ग्रंथांत दाखल केलीं. हीं उपाष्टकें शके १७७४ त झालीं.

हंसराजस्वामी व मोगलाईतील प्रसिद्ध सिद्ध पुरुष माणिकप्रभु यांचा फार परिचय असून, त्यांची गांठ पडल्यावर ते एकमेकांशीं तासचे तास बोलत असत असें सांगतात.